श्रीशंकर.

'आर्यभिषक्'-पुस्तकावलि, अंक १ ला.

# वनौषधी-गुणादर्श.

भाग १ ला.



आवृत्ति दुसरी.

औषधीनां परां प्राप्तिं कश्चिद्वेदितुमर्हति ।
योगज्ञस्तस्य रूपज्ञस्तासां तत्त्वविदुच्यते ॥

चरकसंहितायां महर्षिरग्निवेशः ।

श्रीयुत खेमराज श्रीकृष्णदास,
अधिपति "श्रीवेङ्कटेश्वर" यंत्रालय यांच्या
छापखान्यांत छापविला.

मुंबई, शके १८२०- सन १८९८.

किंमत १२ आणे.

# अर्पणपत्रिका.

श्रीमन्महाराज सरकार सयाजीराव

गायकवाड,

सेनाखासखेलसमशेरबहादुर, राज्य बडोदें.

महाराजांची देशहितैक बुद्धी,

उदार व रसिक अंतःकरण,

देशसुधारणेचे उत्कट यत्न, विद्या-

प्रसाराविषयीं अत्यंत आस्थापूर्वक वर्तन, इ० इ० इ०

अनेक सद्गुणांनां लुब्ध होऊन, हें पुस्तक,

महाराजांचे सेवेशीं

अत्यंत पूज्य व सप्रेम बुद्धीनें आज्ञानुसार

सादर करीत आहें.

# प्रस्तावनेदाखल दोन शब्द.

आमचा आर्यवैद्यकाविषयींचा प्रयत्न सर्वश्रुत असल्यामुळें, येथें जास्त न लिहितां इतकेंच कळविणें पुरे आहे कीं, आर्यवैद्यकाच्या चिकित्साभागांत वनस्पतींचें प्राबल्य विशेष आहे; ह्मणून त्यांच्या सांगोपांग माहितीसाठीं आह्मीं हें पुस्तक, भागरूपानें प्रसिद्ध करून, त्यापैकीं ही पहिल्या भागाची द्वितीयावृत्ति लोकांपुढें मांडीत आहों.

या बाबतींत सविस्तर प्रस्तावना, याच्या ४ थ्या व ६ व्या भागांत लिहिली आहे; त्यावरून वाचकांस आमच्या या पुस्तकाच्या प्रसिद्धिकरण्याचा विचार कशा प्रकारचा आहे हें कळून येईलच.

पुष्कळांच्या मागण्या येत असल्यावरून, विद्याभिलाषी, लोकप्रिय, अनेकग्रंथप्रकाशक व विद्वत्सुहृद श्रीयुत शेठ खेमराज श्रीकृष्णदास यांच्या आश्रयानें ही द्वितीयावृत्ति बाहेर पडत असून, आणखीही पुस्तकें मराठी वाचकांसाठीं बाहेर पडून, त्यांचा जसा संस्कृत व हिंदीवाचकांवर परमोपकार झाला आहे, त्याचप्रमाणें मराठी वाचकांसाठीं त्यांचें उदार अंतःकरण, मराठी ग्रंथप्रसिद्धीस सिद्ध झालें आहे हा खरोखर या भाषेवर व भाषीयांवर त्यांचा महत् उपकार आहे. ईश्वर त्यांस चिरायु करून, देशोन्नतीस साह्य करवो अशी आह्मीं त्यापाशीं सदैव प्रार्थना करतों.

वनस्पतीच्या आकाराचीं प्रत्यक्ष चित्रें देण्याचाही विचार असून, या द्वितीयावृत्तीस आश्रय मिळेल त्या अंदाजानें तो विचार कमीजास्त कालांतरानें अमलांत येईल.

सदर्हू ग्रंथ तयार करण्याची, एकंदर १५ । २० वर्षें, आमचे मित्र वैद्य मुरलीधर एकनाथ केमकर यांनीं सतत रानावनांत फिरून मेहनत घेतली; आणि यावर आणखी आमच्याकडून परिश्रम झाला आहे यावरून या पुस्तकाची योग्यता सहज कळण्यासारखी आहे. हा आतां मार्ग झाला आहे; पुढील आक्रमण करण्यास सोपें जाईल. मित्र केमकर यांच्यासह आमचा याकामीं परिश्रम चालला आहे, आणि तो आह्मीं लोकोपयोगी पडेल अशी तजवीज करणार आहों.

# वनस्पतींची अनुक्रमणिका.

श्रीशंकर.

# वनौषधि-गुणादर्शांची विस्तृतानुक्रमणिका.

## भाग १ ला.

## (ख.)

रोगांचीं नांवें वन. नां. अनुक्रमांक.



## ( घ )



## ( च )



## ( ज )



## ( झ )



## ( ठ )



## ( ड )

## ( स. )

श्रीशंकर.

# वनौषधी-गुणादर्श.

## भाग १ ला.

### १. अक्कलकाला-कारा.

**सं०-आकल्ल. गु०-अक्कलकरो. हिं०-अकलकरहा. क०-आकळकरि. अ०-आकरकरहा. इं०-**Pallatory root. **पेलेटरी रूट. ला०-** Anacyclus pyrethrum **एनेसाइक्लस् पेरेथ्रम्.**

अक्कलकाल्याचीं झाडें लहान असतात. याची उंची सुमारें हातभर असते. हीं बंगाला, अरबस्थान, मिसर या देशांत होतात. तिकडून या वनस्पतीचें मूळ इकडे येतें. इकडे क्वचित् हीं झाडें होतात. या झाडास पिंवळीं फुलें येतात; तींही खाल्लीं असतां अक्कलकाल्याच्या कांडीप्रमाणें जिभेस मुंग्या येतात; हीं फुलें खोकल्यावर विद्यांत घेतात. अक्कलकाला हा उष्णवीर्य, बलकर, तिखट आहे आणि पडसें, सूज व वायु यांचा नाश करितो. (१.) **दांत दुखत असल्यास**-अक्कलकाला आणि कोरांटीचा पाला एकत्र कुटून दांतांखालीं धरावा. (२.) **जिह्वा शुद्ध होण्यास**-अक्कलकाला दाढेखालीं धरावा. (३.) **शेंदुराच्या विषावर**-अक्कलकाला व वेखंड पाण्यांत उगाळून द्यावें. (४.) **आकल्लकादिचूर्ण**-अक्कलकाला, सैंधव, चित्रक, आंवळकटी, मिरीं, पिंपळी, ओंवा, हरीतकी, हीं एकेक भाग व सुंठ २ भाग, यांचें चूर्ण करून, त्यास महाळुंगाच्या रसाच्या भावना देऊन, चूर्ण अथवा गोळी करावी. या चूर्णास आकल्लकादिचूर्ण अथवा अमृतप्रभा असें वैद्यशास्त्रांत नांव दिलें आहे. हें मंदाग्नि, अरुचि, खोकला, गळरोग, दमा, पडसें, पीनस, फेंपरें, उन्माद व सन्निपात यांवर हितकारक आहे. (५.) **आकल्लकादिकाढा, मूतखड्यावर**-अक्कलकाला, सराट्याचें मूळ, तुळशीचा रस, लकड्या

पाषाणभेद, एरंडमूळ, पिंपळी, ज्येष्ठमध, काशमूळ, निर्गुंडी, लवंग, सुंठ, यांचा काढा करून त्यांत वेळदोड्याची पूड टाकून, तो ७ दिवस प्यावा, ह्मणजे मोठा पीडाकारक मूतखडा व मुताबरोबर खर पडत असेल तीही दूर होते. (६) **अपस्मारावर**—अक्कलकाल्याचें चूर्ण मधांत द्यावें व नस्यही द्यावें. (७) **जिह्वारोग व मुखमाधुर्यावर**—अक्कलकाला चाऊन तोंडांत धरावा व लाळ गळूं द्यावी, अथवा थंड पाण्यांत अक्कलकाला उगाळून तोंडास फांसावा आणि लाळ गळूं द्यावी. या प्रमाणें दिवसांतून दोन तीन वेळ करावें.

## २. अंकोल. (सं.)

**गु०-अंकोल. हिं०-ढेरा, ढेरा. बं०-धल, आंकोट. क०-अंकुले. तै०-अकोलं. ता०-अंकोलं. तु०-अंकोलेडा. मला०-अंकोळं ला०-**
Alangium Lamarkii **एलेनूजियम् लामारकी.**

हें झाड बरेंच मोठें वाढतें. याचीं पानें बोट दोन बोटें रुंद असून कण्हेरीच्या पानांप्रमाणें लांबट असतात. या पानांवर रेषा असतात. हीं झाडें कंटकयुक्त व कंटकरहितही असतात. हीं बहुतेक प्रांतांत होतात. यास बोराएवढीं गोल फळें येतात. यांच्या बियांचें तेल निघतें. **अंकोल** हा तुरट, कटु, पारदशुद्धिकर, लघु, किंचित् तिखट, सारक, स्निग्ध, तीक्ष्ण, उष्ण, रूक्ष असा आहे. याचा रस—वांतिकारक; आणि विष, कफ, वातशूळ, कृमि, सूज, आम, पित्त, रक्तदोष, विसर्प, आणि कुतरें, उंदीर व मांजर यांचें विष, कटिशूळ, अतिसार, यांचा नाश करितो. **याचें बीज**—शीतल, धातुवृद्धिकर, स्वादु, अग्निमांद्यकारक, जड, रसकाळीं व पाककाळीं मधुर, बलकर, कफकर, सारक, स्निग्ध, वृष्य असें आहे, व दाह, वायु, पित्त, क्षय, रक्तदोष, कफ आणि विसर्प यांचा नाश करितें. **बियांचें तेल**—वात व कफनाशक आणि अभ्यंग केला असतां त्वग्दोषाचा नाश करितें. (१) **अतिसारावर व विषादिकांवर**—अंकोलाच्या मुळीची साल तांदुळाच्या धुणांत उगाळून मध घालून घ्यावी, ह्मणजे दुर्धरही अतिसारांचा नाश होतो, व बचनागादिक व सर्पादिकांचीं विषें दूर होतात. (२) **प्रमे-**

**ह्यावर**-अंकोळीच्या सुकलेल्या कळ्या, आंवळकटी व हळद यांचें चूर्ण मधांतून द्यावें, ह्मणजे सर्व प्रकारचे प्रमेह (परमे) दूर होतात. (३.) **कृमींवर**-मुळांचा रस काढून द्यावा; ह्मणजे रेच होऊन कृमि दूर होतात. (४) **जलोदरावर**-मुळांचा रस द्यावा, ह्मणजे साध्य असल्यास जलोदर बरें होतें. (५) **व्रणावर**-फळांतील तेल लावावें, ह्मणजे व्रण भरून येऊन बरा होतो, व चाईही जाते. (६) **त्वग्रोगावर**-फळांतील तेल लावावें, किंवा झाडाची साल वाटून लावावी. (७) **वायूनें अंग ठणकतें त्यावर**-या झाडाचीं पानें वाटून त्याचें पोटीस बांधावें. (८) पक्कीं अंकोलाचीं फळें व वेखंड हीं एका जागीं कुटून चुरा करावा; त्यांत थोडा मध घालावा. तें चूर्ण सर्व पाण्यांत कालऊन तें पाणीं आंब्याच्या झाडास घालावें. ह्मणजे आंब्याचें झाड लवकर वाढून त्यास फळेंही लवकर येतात. (९) **आंब्याच्या कोईस**-अंकोलाच्या तेलाचीं ७ पुटें द्यावीं. नंतर ती कोय जमिनींत पुरून वर पाणी घातलें असतां लागलेंच आंब्याचें झाड उगवतें. याच कृतीप्रमाणें मेथ्याही उगवतात. (१०) **अंकोलवटक**-सर्व प्रकारच्या अतिसारावर-अंकोलमूळ, पहाडमूळ व देवदार, हीं तीन औषधें समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करावें व तें तांदुळाच्या धोणांत कालवून त्याच्या बेहड्याएवढाल्या गोळ्या कराव्या. व त्यांपैकीं एक गोळी तांदुळांच्या धुणांत उगाळून द्यावी; ह्मणजे सर्व प्रकारचे अतिसार दूर होतात. दुसरा प्रकार-देवदार, अंकोल, पहाडमूळ यांचीं मुळें व कुडा, सांवरी, धायटी, लोध्र, डाळिंब यांची साल व राळ, या सर्व औषधांचीं चूर्णें समभाग घेऊन, वरीलप्रमाणें तांदुळांच्या धुणांत गोळ्या करून त्यांतील एक गोळी सकाळीं मधांतून उगाळून प्यावी, ह्मणजे सर्व प्रकारचे अतिसार दूर होतात. (११) **सुजेवर**-अंकोलाचा पाला व वारुळाची माती वाफ देऊन फडक्यांत घालून त्यानें शेकावें. (१२) **सोमनाथी ताम्रभस्म**-अंकोलाचीं फळें वाटून त्यांत शुद्ध केलेल्या तांब्याचे कंटकवेधी पत्रे घालून, गजपूट दिलें असतां एकाच पुटानें भस्म होतें. (१३) **दाहज्वरावर**-अंकोलाचें मूळ व सुंठ हीं पाण्यांत उगाळून त्याचा अंगास लेप

करावा. ह्मणजे त्वरित ज्वर निघून जाऊन दाह शांत होतो. (१४) **मूत्रावरोधावर**-अंकोल व तिलकाष्ठ यांचा क्षार, मध, दह्याचें पाणी यांबरोबर प्यावा. (१५) **कुत्र्याचे विषावर**-अंकोलमुळाचा काढा, तूप घालून प्यावा, अथवा अंकोलाचीं पानें पाण्यांत वांटून त्यांत मिऱ्यांचें चूर्ण घालून तें घ्यावें. (१६) **ग्रंथीवर**-अंकोलाचें मूळ उगाळून लेप द्यावा.

## ३. अक्रोड.

**सं०-अक्षोट. म०-अक्रोड. गु०-अखोड. हिं०-अखरोट. बं०-आखरोट. क०-चेट्टदगोनु, आखोट. तै०-डब्बकाई. फा०-चार्तगज. अ०-जौझअक्रुपम. इं०-**Walnut **वालनट् ला०-**Aleurites trailoba **एल्युरायटीस ट्रायलोबा.**

हीं झाडें हिमालयाच्या आसमंतात्, चीन व इराण या देशांत होतात. उत्तर हिंदुस्थानांत यांची बरीच लागवड होते. या झाडास ३०।४० वर्षांनंतर फळें येऊं लागतात. पिकलेलीं फळें पेरू एवढीं असतात. फळें कच्चीं व कोंवळीं असतात, तेव्हां तेथील लोक त्यांचें लोणचें घालितात. याच्या फळांचें तेल खाण्यास व जाळावयास उपयोगीं पडतें. अक्रोड हें मधुर, किंचित् आंबट, स्निग्ध, शीतल, धातुवृद्धिकर, उष्ण, रुचिप्रद, कफपित्तकर, जड, प्रिय, बलकर, कफकर, मलबंधक असें आहे; आणि वात, पित्त, क्षय, वायु, हृद्रोग, रक्तदोष, रक्तवात आणि दाह यांचा नाश करितें. (१) **मूळव्याधीवर**-अक्रोडाच्या तेलांत कांकडा भिजवून गुदांत घालून ठेवावा, ह्मणजे मोड गळून पडतात, व रोग दूर होतो. (२) **अपस्मारावर**-निर्गुंडीच्या रसांत आक्रोडाची मज्जा उगाळून अंजन करावें अथवा नस्य द्यावें. (३) **वायूपासून आलेल्या सुजेवर**-अक्रोड कांजींत उगाळून लेप करावा. (४) **स्तनांत दूध उत्पन्न होण्यास**-गव्हांचा रवा व आक्रोडाचीं पानें, समभाग एकत्र करून त्याच्या पुऱ्या करून गाईच्या तुपाशीं खाल्ल्या असतां सात दिवसांत स्त्रियांच्या स्तनांत दूध फार वाढेल. (५) **अर्श, कृमि इत्यादिकांवर**-कच्च्या आक्रोडांचा रस काढून तो द्यावा, ह्मणजे मूळव्याध, कृमि, गुल्म, संग्रहणी हे दूर होतात. (६) **रेच होण्यास**-

फळांच्या सालीचा काढा करून द्यावा, अथवा याचें तेल २ । ३ तोळे प्राशन करावें. **पाक** वगैरे औषधांत अक्रोडाचा बराच उपयोग होतो. हा एक मेवा आहे.

## ४. अगरु.

**सं०-गु. हिं०-बंगा०-क०-अगर. तु०-हागलगंध. मला०-अकिल. तै०-अगर. फा०-कराबबवा. अ०-उदगरफी. इं०-**Eaglewood **ईगलवुड. ला०-**Aquilaria agallocha. **एक्विलेरियाएगेलोका.**

कृष्णागरु, दाहागरु, काष्ठागरु, स्वाद्वगरु व मंगल्यागरु असे यांचे पांच प्रकार आहेत. हे वृक्ष मलबाराकडे होतात. अगरुचंदन हा मोठा सुगंधि आहे. अगरबत्ती करण्यास व अंगास उटी वगैरे लावण्याच्या कामीं याचा उपयोग होतो. हा धूपोपयोगीही आहे. याच्या धूपापासून मनास फार आल्हाद होतो. **अगरु**-सुगंधि, उष्ण, कडू, तिखट, स्निग्ध, मंगलकारक, रुच्य, धूपाविषयीं योग्य, पित्तकर, तीक्ष्ण असा आहे; आणि वायु, कफ, कर्णरोग, कुष्ठ, यांचा नाशक आहे; व लेपाविषयीं किंवा अंगास लावण्याविषयीं उत्तम आहे. **कृष्णागरु**-तिखट, कडू, उष्ण, लेप केला असतां शीतल पाण्याशीं घेतला असतां पित्तनाशक, पौष्टिक, लघु असा आहे; आणि कोणाच्यामतें याचें चूर्ण पित्तकारक आहे, व कर्णरोग, नेत्ररोग, त्रिदोष, दाह, त्वग्दोष, कफ आणि वायु यांचा नाश करितें. **दाहागरु**--किंचिदुष्ण, सुगंधि, तिखट, केशाची वृद्धि करणारा, कांतिकारक आणि केशशोधक असा आहे. **काष्ठागरु**.-तिखट, उष्ण, लेपाविषयीं रूक्ष, कफनाशक, असा आहे. आणि मुखरोग, वांति वायु यांचा नाश करितो. **स्वाद्वगरु**.-तुरट, उष्ण आहे आणि नस्यानें वातनाश करितो. **मंगल्यागरु**.--शीतल, सुगंध, आणि योगवाहक असा आहे. (१) **त्वग्दोषावर**--अगरुचा लेप करावा. (२) **दाहावर**-अगरुचंदनाची उटी अंगास लावावी ह्म० दाह शमतो. (३) **वल्मीकावर**-( वारुळासारखा गुडघ्यावर रोग होतो त्यास )-अगरु चंदन, वेळूची, जाईचीं पानें, निंबसाल, बिबवे, मनशीळ, हरताळ हीं कुटून त्याच्या चौपट तिळांचें तेल घेऊन त्यांत कढवून तें तेल लावावें ह्मणजे

वल्मीकरोग दूर होतो. (४) **उन्हांतून आल्यानें फार घाम येतो त्यास**--अगरु वाळा, चंदन, नागकेशर, (काळ्या रंगाचें) यांचें चूर्ण करून बोरीच्या अंतर्सालीच्या पाण्यांत कालवून शरीरास मर्दन करावें ह्म० ऊन लागून आलेला घाम नाहींसा होतो. (५) **सुवासिक उटणें**--अगरु, कापूर, केशर, लोहबाण, ऊद, लोध्र, वाळा, काळा वाळा, नागरमोथे हीं समभाग घेऊन, त्यांचें उटणें करून लाविलें असतां अंगास सुवास येतो. (६) **वस्त्रास सुगंध** येण्यासाठीं अगरूचें पाणी करून तें वस्त्रावर टाकितात. (७) **आगपैण व उठाणूची फार आग होत असल्यास** कृष्णागरुचंदन उगाळून वर लेप द्यावा.

## ५. अगस्ता.

**सं०-अगस्त्य. दे०-हादगा. वऱ्हाडी०-हेटा. गु०-अगथियो. हिं०-अगस्तिया, हथिया. बं०-बक. क०-अगसेय मरनु, चोगचि. ता०-अक्क. तु०-अगसे. मला०-अगट्टी. तै०-अवीसे. इं०**-Large flowered Agati. **लार्ज फ्लावर्ड ॲगटि. ला०**-Agati Glandiflora **ॲगटि ग्लांडिफ्लोरा.**

या झाडास हादगा असेंही ह्मणतात. हें झाड बरेंच मोठें होतें. हें बागाइतांत लावतात. यांत पांढरा व तांबडा, अशा फुलांवरून दोन जाती आहेत. यांचीं पानें आंवळीच्या पानांसारखीं असतात. यांस फुलें व शेंगा येतात. फुलांच्या वड्या व भाजी करतात. शेंगाची भाजी होते. यांच्या पाल्याचीही भाजी करितात. हें झाड सात आठ वर्षांवर टिकत नाहीं. **अगस्ता**--रूक्ष, शीतल, मधुर, वातल, त्रिदोषनाशक असा आहे; व वैवर्ण्य, कफ, श्रम, खोकला, व्रण, पिशाचबाधा, पित्त आणि चातुर्थिक ज्वर यांचा नाश करितो. याचें **पुष्प**--तुरट, कडू, किंचित् शीतल, पाककाळीं तिखट, वातकारक असें आहे. व रातांधळें, पडसें, चातुर्थिकज्वर, कफ आणि पित्त यांचा नाश करितें. याच्या **शेंगा**--सारक, बुद्धिमद, रुचिकारक, लघु, पाककाळीं मधुर, कडू, स्मृतिमद अशा आहेत; आणि त्रिदोष, शूल, कफ, पांडुरोग, विष, शोष, गुल्म यांचा नाश करितात. हिची

भाजी रूक्ष व पित्तकारक आहे. याचीं **पानें**-तिखट, कडू, जड, मधुर, किञ्चित् उष्ण अशीं आहेत. व कृमि, कफ कंडू, विष, रक्तपित्त यांचा नाश करितात. ( १ ) **सर्दी, मस्तकशूळ व चातुर्थिकज्वरावर**-आगस्त्याच्या पानांचा रस नाकांत पिळावा. ( २ ) **अर्धशिशीवर**-जिकडील कपाळ दुखत असेल तिकडील विषमबाजूच्या नाकपुडींत अगस्त्याच्या पानांचा, अगर फुलांचा रस पिळावा, ह्मणजे कफ पडून अर्धशिशी बरी होते. ( ३ ) **चित्तविभ्रमावर**-अगस्त्याच्या पाल्याच्या रसांत गूळ, सुंठ व पिंपळी हीं औषधें घालून नस्य द्यावें. ( ४ ) **फुरशाच्या विषानें पोटांत गठ्ठा धरल्यास**-पांढऱ्या अगस्त्याची साल रिठ्याच्या पाण्यांत उगाळून द्यावी. रोग निस्तोष झाल्यावर तांदुळांच्या पेजेंत तूप घालून ती सुमारें अच्छेर द्यावी. ( ५ ) **कफविकारावर**-तांबड्या अगस्त्याच्या मुळीचा अथवा सालीचा अंगरस काढून, एक तोळ्यापासून दोन तोळ्यांपर्यंत शक्तीप्रमाणें द्यावा. हें औषध मुलास देणें झाल्यास, फक्त पाल्याचा रस पांच थेंब काढून मध घालून द्यावा. **उतार** खडीसाखरेचें पाणी द्यावें. ( ६ ) **सुजेवर**-तांबड्या अगस्त्याची मुळी व काळ्या धोतऱ्याची मुळी, या दोन्ही गरम पाण्यांत एकत्र उगाळून अंगास लेप करावा, ह्मणजे सर्व प्रकारची सूज ताबडतोब नाहींशी होते. ( ७ ) **वायुबद्ध शरीर असल्यास**-तांबड्या अगस्त्याच्या मुळीवरील साल चार गुंजापर्यंत घेऊन विड्याच्या पानांत दररोज खावी, ह्मणजे वातविकार कमी होतो. ( ८ ) **मुलांच्या सर्दीवर**-मूल जन्मतःच घशांत कफाचा दोर झालेला असतो, त्यास अगस्त्याच्या पाल्याचा रस दोन थेंब काढून, त्यांत चौपट मध घालून, त्यांतील मिश्रण बोटानें त्या मुलाच्या टाळ्यांत पोंचवितांच सर्व कफ निघून पडतो व मूल हुशार होतें; याविषयीं सुईणीनें सावधगिरी ठेविली पाहिजे. ( ९ ) **अपस्मारावर**-अगस्त्याचे पानांचा रस, गोमूत्र व मिरपूड घालून द्यावा. ( १० ) **कोणत्याही**-भस्मास तांबडा रंग ( पद्मरागासारखा ) येण्याकरितां याच्या पाल्याचा रस काढून त्याचें पुट देतात.

## ६ अघाडा.

**सं०-अपामार्ग. गु०-अघेडो. हिं०-चिरचिरी, लटजीरा. मा०-सफेद-आंधी झाडो रा०-अंधाझोर्ळा बं०आंपांग क०-उत्तरणे. तै०-उत्तरेनिवि दुर्च्चाणिके. फा०--खारवासगोना अ०--आकम. ता०--नायुरु मला०--कडालाडी. इं०--Rough chaff treeरफ चाफट्री. ला०-Achyranthis aspera. एकिरॅथिस् एस्पिरा.**

ईश्वरानें वनस्पतींच्या अंगीं अपार गुण ठेविले आहेत. त्या गुणाचा शोध मात्र करणारा पाहिजे. प्राचीन ऋषिवर्यांनी अरण्यांत राहून आपल्या बुद्धिकौशल्यानें अनेक वनस्पतींच्या गुणांचा शोध लावून ठेविला, व कालांतरानें होणाऱ्या संततीची त्या वनस्पतींविषयीं नेहमीं पूज्यबुद्धि रहावी ह्मणून त्यांनीं कांहीं कांहीं वनस्पति देवतेच्या पूजेकडेही लावून दिल्या, यांत त्यांचा अतिशय दूरदर्शीपणा व्यक्त होतो. परंतु आमचा अशा उपयुक्त वनस्पतींवर आणि स्वकीय पौष्टिक व गुणावह खाद्यपेयांवर विश्वास आहे कोठें? आमच्या पैकीं पुष्कळ लोक परकीयांचे गुलाम झाले आहेत; त्यामुळें परकीयांनीं उच्छिष्ट जरी वाढलें, तरी तें त्यांनां मिष्टान्न वाटत आहे. या दुनियेंत दुधासारखा पौष्टिक पदार्थ दुसरा कोणताच नसतां, त्याचा धिक्कार करून शक्ति येण्याकरितां " काडलिव्हर आईल"-( माशाचें तेल )-च त्यांनां गोड व पौष्टिक वाटूं लागलें आहे! हेंही असो, परंतु लहान लहान छावड्यांनां देखील दूध न देतां चहाचें शक्तिहारक उष्ण पाणीच सकाळीं देण्याचा पुष्कळांनीं परिपाठ पाडला आहे! तेव्हां धन्य आहे कीं नाहीं आमच्या या लोकांची व त्यांच्या शहाणपणाची!! अशा विपरीताचरणाचा परिणामही विपरीत होणार हें सांगणें नकोच. परंतु अजूनही लोकांचे डोळे उघडत नाहींत हें आश्चर्य ह्मणावयाचें! या त्यांच्या विपरीताचरणामुळें इतर पुष्कळ लोकांचाही कल, परकीय वस्तूंकडे वळत चालला आहे, ही मात्र फार वाईट व देश धुळीस मिळवून टाकणारी गोष्ट आहे. लोकांचीं दूषित मनें स्वच्छ करण्याकरितां हा जो अपामार्ग, ( स्वच्छ करणारा ) त्याचें हें वर्णन परिणामीं मोठें हितकर होईल

असें समजावें. आघाड्यांत-पांढरा, रक्त व पाणअघाडा असे तीन प्रकार आहेत. हीं झाडें सर्वत्र होतात. अघाड्याचें झाड दंतधावनास फार उपयोगी आहे. आघाड्याचा क्षार होतो, त्यास 'अपामार्गक्षार' असें ह्मणतात. या क्षारांत स्वच्छ करण्याचा गुण आहे, ह्मणून यास 'अपामार्ग' (स्वच्छ करणारा) असें संस्कृतांत नांव आहे. पूर्वी परीट लोक याच क्षाराचा उपयोग करीत असत. **पांढरा अघाडा**–कडू, उष्ण, ग्राहक, सारक, किंचित् तिखट, कांतिकारक, पाचक, अग्निदीपक असा आहे; आणि नस्य, वांति यांविषयीं प्रशस्त; व कफ, उदर, अर्श, रक्तदोष, मेहरोग, वायु, शिबीं, अपची, दद्रु, वांति आणि आम यांचा नाश करितो. **रक्त अघाडा**–किंचित् तिखट, शीतळ, मलावष्टंभक, वांतिकर, वायु, व विष्टंभ यांनां करणारा, रूक्ष असा आहे; आणि व्रण, विष, वायु, कफ, कडू यांचा नाश करितो. याचें बीं रसकाळीं व पाककाळीं दुर्जर, गोड, शीतळ, मलावष्टंभक, रूक्ष, वांतिकर, रक्तपित्तनाशक आहे; व खोकल्याचा नाश करितें. **पाण अघाडा**–तिखट आहे; व सूज, कफ, खोकला, वायु, शोष यांचा नाश करितो. (१) **विंचवाचे दंशावरः**–अघाड्याचे तुरे अथवा मुळी पाण्यांत वाटून दंशावर लावावी. किंवा अघाड्याची मुळी पाण्यांत उगाळून, ती पाण्यांत कालवून, हें पाणी कडू लागेपर्यंत थोडथोडें प्यावयास द्यावें. पाणी कडू लागलें कीं विष उतरलें असें समजावें. (२) **उंदराचे विषावरः**–आघाड्याच्या कोंवळ्या तुऱ्याचा रस काढून तो मधाशीं ७ दिवस द्यावा. अथवा अघाड्याचें बीं मधाशीं द्यावें. (३) **कुतऱ्याचे विषावरः**–अघाड्याचें मूळ १ तोळा कुटून मधाशीं द्यावें. आणि कोरफडाचे पान व सैंधव, दंशावर बांधलें ह्मणजे ३ दिवसांत विष उतरतें. (४) **दंतशूलावरः**–आघाड्याचा रस लावावा. (५) **कर्णनादावरः**–अघाड्याच्या क्षाराचें पाणी व अघाड्याचा कल्क, यांत तिळांचें तेल सिद्ध करावें. तें कानांत घातलें असतां कर्णनाद व बधिरता हे जातात. (६) **डोळे येतात त्यावरः**–अघाड्याच्या मुळाचें चूर्ण व थोडें सैंधव, तांब्याच्या भांड्यांत घालून दह्याच्या निवळींत खलावें

व त्याचें अंजन करावें. ( ७ ) **डोळयांतील फूल झडण्यासः**- आघाड्याचें मूळ मधांत उगाळून अंजन करावें. ( ८ ) **रातांधळ्यावरः** संध्याकाळीं भोजनानंतर अघाडयाच्या मुळ्या, सुमारें १ तोळा खाण्यास देऊन निद्रा करावयास सांगावें. या प्रमाणें ३ दिवस करावें. ( ९ ) **पित्तावरः**-अघाडयाचें बीं रात्रीं ताकांत भिजत घालून सकाळीं वांटून द्यावें, ह्मणजे पित्त पडेल किंवा शमेल. वर तूपभात खावा. ( १० ) **कफावरः**-अघाडयाचीं झाडें मुळासकट आणून त्यांची राख करावी. ही राख १ पासून २ वालपर्यंत मधांतून द्यावी. ह्मणजे कफाचा नाश होतो. हीच राख, पाणी व गूळ घालून दिली असतां, जलोदर अथवा इतर अवयवांत उत्पन्न झालेली सूज उतरते. ( ११ ) **चातुर्थिकज्वरावरः**- कुमारीनें कांतलेल्या सुतानें रविवारीं आघाडयाची मुळी; चातुर्थिकादि ज्वरानें पीडित मनुष्याच्या हातांत बांधावी. ( १२ ) **रक्तार्शावरः**-अघाड्याचें बीं, तांदुळाचे धुणांत वांटून प्यावें. ह्मणजे रक्त मूळव्याधीचा नाश होतो. ( १३ ) **मस्तकरोगावर**-अघाडयाचें बियांची दुधांत खीर करून खाण्यास द्यावी ह्मणजे मस्तकरोगाचा नाश होतो, ही खीर खाल्लयानें बरेच दिवस भूक लागत नाहीं. ( १४ ) **मोडशीवर**-अघाडयाचें मूळ पाण्यांत उगाळून प्यावयास द्यावें. अथवा बियांचा कल्क करून तो तांदुळाच्या धुणांत प्यावयास द्यावा. ( १५ ) **कामीण रोगावर**-अघाडयाची मुळी ताकांत उगाळून प्यावी. ( १६ ) **पुष्पावरोधावर**-अघाड्याचें मूळ धारण केलेअसतां पुष्पावरोध व योनिशूल यांचा नाश होतो. ( १७ ) **शिब्यावर**-अघाड्याच्या क्षाराच्या पाण्यांत मालकांगोणीचें तेल घालून तें तेल सिद्ध करावें व लावावें. ( १८ ) **उपदंशावर** अघाड्याचें झाड उपटून आणून, त्याची मुळी कापून टाकून रस ४ तोळे काढावा. व त्यांत जिऱ्याची पूड पाऊण तोळा घालून तो प्यावयास द्यावा. पथ्य अळणी. या प्रमाणें ७ दिवस घ्यावें. यास उतारा, बोरीच्या अगर जास्वंदीच्या पाल्याचा रस द्यावा, ह्मणजे आग शमन होईल. ( १९ ) **पोटदुखीवर**-अघाड्याचीं चार पांच पानें चावून खावीं. अथवा पानांचा

रस द्यावा. (२०) **लवकर प्रसूत होत नसल्यासः**-रविवारीं पुष्य नक्षत्रावर स्नान करून अघाड्याची मुळी काढून आणावी. व ती अर्धरात्री टांगून ठेवावी. ही मुळी अडलेल्या स्त्रीच्या वेणीस बांधली असतां लवकर प्रसूत होते. प्रसूत झाल्याबरोबर ताबडतोब ती काढून वाहत्या पाण्यांत सोडून द्यावी. उशीर केल्यास गर्भाशय बाहेर पडण्याचा संभव आहे. पांढऱ्या अघाड्याची मुळी कंबरेस बांधावी. इचाही गुण आहे. (२१) **कंठकुब्ज सन्निपातावर**-आघाड्याचा रस व पिंपळी याचें नस्य द्यावें. (२२) **खोकल्यावर**-आघाड्याचें चूर्ण एक टांक व मिरीं १ टांक, ही एकत्र करून मधांत चाटण करून घ्यावें. (२३) **कफज्वरावर**-अघाड्याच्या पंचांगांचा काढा तीन मासे पर्यंत मध घालून द्यावा. (२४) **चातुर्थिक ज्वरावर**- रविवारीं आघाड्याचा पाला आणून गुळांत वाटून गोळया करून ठेवाव्या. गोळी हींव येण्याचे पूर्वी द्यावी. (२५) **नासार्शावर**-अघाड्याचें बीं, सैंधव व चुलीवरील घेरोसा हीं तेलांत घालून तें तेल पक्क करावें व गाळून घेऊन नाकांत घालीत जावें.[1] (२६) **अपामार्गक्षार**-अघाड्याचीं झाडें आणून वाळवावीं. नंतर त्यांची राख करून मातीच्या मडक्यांत घालावी. त्यांत राखेच्या चौपट पाणी घालून चांगली कालवावी. नंतर तसेंच तें सारी रात्र भिजत ठेऊन प्रातःकाळीं त्यावरील निवळ पाणी, लोखंडाचे कढईत काढून खालीं जाळ लावावा; तेणेंकरून तें शिजून आंतील पाणी आटून, कढईच्या बुडाला पांढरा क्षार लागून राहील तो काढून घ्यावा. या रीतीनेंच इतर क्षारवृक्षांचे क्षार काढावे. (२७) **पानथरीवर**-अघाड्याचा क्षार गुळांत कालवून खावा.

## ७. अजगरी.

**सं०-गु०-हिं०-क०-अजगरी.**

पारदबंधनाविषयीं ज्या चौसष्ट वल्ली सांगितल्या आहेत, त्यांपैकीं ही एक आहे. हिच्या अंगावर मंडलें असतात, व ही अजगर नामक सर्पा-

---

१. मुळव्याधीचे मोडाप्रमाणें नाकांत रोग होत असतो.

सारखी दिसते. या वेलीची लांबी ५ । ६ हात असून ही रसभरित असते, व हिच्यावर पानें थोडींच असतात. **उपयोगः-**ही वल्ली कार्तिकमासीं पौर्णिमेच्या दिवशीं आणून तिचे तुकडे करावे. व ते दुधांत घालून आट-वून ते दूध प्राशन करावें. व पथ्य करावें. ह्मणजे हिच्या सेवनापासून शरीर बळकट होतें, कांति चांगली होते, ऐकावयास चागलें येतें व आयुष्य वाढतें; असें सुश्रुताचार्यांनीं सांगितलें आहे.

## ८. अंजन.

अंजनाचीं झाडें कोकणप्रांतीं बरींच आहेत. हा वृक्ष साधारण दहाबारा हात उंचीचा असतो. याच्या डाहळ्यांच्या आंगास लागून सुंदर जांभळ्या रंगाचीं फुलें येतात; याच्या पानांतून पिंवळा रंग उत्पन्न होतो.

## ९. अंजनी.

हीं झाडें फक्त खानदेशांतच पाहण्यांत येतात. हें झाड बरेंच मोठें होतें. याचीं पानें आपट्याच्या पानांसारखीं, परंतु त्यांहून लहान असतात; यास बारीक शेंगा येतात. याचें लांकूड इमारतीस चांगलें आहे. या झाडाचीं पानें गुरांस खावयास उपयोगीं आहेत. चाऱ्याचा दुष्काळ पडला तर हीं पानें खाऊन गुरें जगतात; असा हा या वृक्षापासून मोठा उपयोगं आहे. तसेंच याची सालही उपयोगी आहे. तिचे दोर होतात. ( १ ) **प्रमेहावर-** अंजनीच्या मुळाचा चीक अथवा पानांचा रस काढून द्यावा. अंजनीच्या पानांचा, डोळ्यातील रोगांवर उपयोग होतो असें ह्मणतात.

## १०. अजमोदा.

गु०-अजमोद. बोडी अजमोद. हिं०-अजमोदा. बं०-बमानी० क०-अजमोद. तै०-अजमोदा, फाञ्करषस्. अ०-हवळ कतुकरफस्. ला० Celeryseed सेलेरिसी.

हा एक ओंव्याचा भेद आहे. हें झाड सांवत्सारिक आहे. हें झाड हिंदु-स्थानांत पुष्कळ ठिकाणीं होतें. बंगाल्यांत याची लागवड फार करितात. याची उंची सुमारें दीडहात असते. याला पांढऱ्या रंगाचीं बारीक फुलें

येतात. **अजमोदा**–रुचिकर, दीपक, तिखट, रूक्ष, उष्ण, विदाहक, हृद्य, वृष्य, बलकर, लघु, कडू, मलस्तंभक, ग्राहक, पाचक असा आहे; आणि आध्मान, शूल, कफ, वायु, अरुचि, उदरें, कृमि, वांति, नेत्ररोग, बस्तिशूल, दंतरोग, गुल्म आणि शुक्रदोष यांचा नाश करितो. (१) **मधुऱ्यावर**–अजमोदाचें चूर्ण करून तें मधांत कालवून द्यावें. (२) **शूळ ह्मणजे पोटदुखीवर**–अजमोदा उष्णोदकाशीं सेवन करावा. (३) **अतिसारावर**–अजमोदा, मोचरस, आलें, धायटीचें फूल यांचें चूर्ण, पाणी न घालतां घुसळलेल्या गाईच्या दह्यांतून द्यावें; ह्मणजे पाण्याच्या झोतासारखा व पांढरा असा प्रवाह ज्या अतिसाराचा असतो तोही बंद होतो. **वातविकारांवर**–अजमोदा, पिंपळी, रास्ना, गुळवेल, सुंठ, शोपा, अश्वगंधा, शतावरी यांचें चूर्ण करून तें तुपांत द्यावें. ह्मणजे हृदय, कुक्षि, कोष्ठ व कंठ यांतील वातविकाराचा अतिवेगानें नाश करील. (५) **अजीर्ण व शूल यांवर**–अजमोदा, हरीतकी, पहाडमूळ, सुंठ, मिरें व पिंपळी, यांचें चूर्ण करून तें ऊन पाण्यांत द्यावें. (६) **गर्भिणीचा जठराग्नि प्रदीप्त होण्यास**–अजमोदा, सुंठ, पिंपळी व जिरें यांचें चूर्ण मधांत द्यावें. (७) **अजमोदादिवटी सर्व वायूंवर**–अजमोदा, पिंपळी, वावडिंग, बडीशोप, नागरमोथे, मिरीं व सैंधव हीं एकेक भाग, हरीतकी ५ भाग, सुंठ १९ भाग, वृद्धदारु १० भाग व भारंगमूळ ३६ भाग, याप्रमाणें सर्वांचें चूर्ण करावें व चूर्णाच्या दुप्पट गूळ घेऊन, त्याच्या पाकांत गोळ्या, बोराच्या आटीएवढ्या कराव्या. ही गोळी ऊन पाण्याशीं घ्यावी; ह्मणजे सर्व प्रकारचे वायु दूर होतात. (८) **जीर्णज्वर, सर्दी व अंगांतून शिरशिरी येते त्यास**–अजमोदा चार मासे नित्य प्रातःकाळीं व सायंकाळीं थंड पाण्याबरोबर, चावल्याशिवाय सबंध गिळावा.

## ११. अजवला.

सं०-अर्जक. कॉं०-भालितुळस. गु०-अजवेला. हिं०-अजबला. क०-कग्गोलें. तै०-काठतुलसी फा०-पलंगमश्क. अ०-फरंमुष्क ला०-Ocimum gratissimum ओसिमम् ग्रॅटिसिमम.

याचे पांढरा व काळा असे दोन प्रकार आहेत. त्यांत पांढऱ्या अजव-

त्याला 'मालीतुळस' व काळ्या अजवल्याला 'काळी माळीतुळस' असें ह्मणतात. हें झाड सुमारें हात दीड हात उंच वाढतें. याचीं पानें तुळशीच्या पानापेक्षां मोठीं असतात. यास लांबट तुरे येतात. अजवला-तिखट, उष्ण, शीत, दाहकर, प्रिय, रूक्ष, रुच्य, दीपक; पाककाळीं लघु, पित्तकर कडू, मधुर, सुखानें प्रसव करणारा, व्रणाविषयीं हितकर; आणि वायु, कफ, नेत्ररोग, मूत्रकृच्छ्र, अरुचि, विषदोष, कावीळ, कुंभकावीळ, आनाहवायु, शूळ, अग्निमांद्य, त्वग्रोग, विषरोग, कृमि, रक्तदोष, दमा, खोकला, दद्रू, हृद्रोग, पार्श्वशूळ, ज्वर, कंडु, कुष्ठ व वांति यांचा नाश करितो. ( १ ) **पोटदुखीवर**-अजवल्याचा रस द्यावा. ( २ ) **मुलांच्या वांतीवर**-अजवल्याचें बीं वांटून मधांतून द्यावें. ( ३ ) **प्रदरावर**-अजवल्याच्या पानांचा रस तांदुळांच्या धुणाशीं द्यावा.

## १२. अंजीर.

**सं०-रामोदुंबरिकाफल.** गु०-हिं०-अंजीर. **क०-अंजूरि. तै०-मेडिपंडु.**
**अ०-तीन. इं०**-Fig tree **फिगट्री. ला०**-Ficus carica
**फाइकस् कॅरिका.**

अंजिराचें झाड बहुतकरून उष्ण प्रदेशांत होतें. अरबस्थान, इराण, तुर्कस्तान, ग्रीस व अफ्रिकेच्या दक्षिणभागांत अंजिराचीं झाडें पुष्कळ होतात. हीं झाडें हिंदुस्थानांतही पुष्कळ होतात. ही एक उंबराची जात असावी. कारण, याच्या फळाची आकृती व आंतील गीर, हीं उंबराच्या फळांच्या सारखींच असतात. उंबरास जसें फूल येत नाहीं, तसें अंजिरासही येत नाहीं. याची उंची दहा हातापेक्षां अधिक नसते. अंजिराचीं पानें मोठीं असतात. अंजिरांच्या कच्च्या फळांची भाजी होते, ही रुचीस चांगली नसते; परंतु बाधक नाहीं. पिकल्या अंजिराचा मुरंबा करितात. हा पित्तशामक व रक्तवृद्धि करणारा आहे. अंजिराच्या अंगीं रक्तवृद्धि करण्याची शक्ति आहे. ह्मणून अशक्त लोक ते सकाळीं खातात. शिशिरऋतूमध्यें थंडीच्या योगानें जेव्हां जीभ व तोंड हीं फुटतात, तेव्हां कित्येक लोक अंजिराच्या पानांची राख त्यांस घासतात. सुके अंजीर अरबस्तानां-

तून येतात. अंजिराच्या लाखेचा अलिता सर्वोत्कृष्ट होतो. **अंजीर**—शीतल, स्वादु, गुरु आहे. व रक्तदोष, दाह, वायु व पित्त यांचा नाश करितो. (१) **शरीरांतील उष्णता निघून रक्तवृद्धि होण्यास**—पिकलेला अंजीर रात्रीं सोलून खडीसाखरेच्या भुकींत घालून दवांत ठेवावा. व सकाळीं खावा. या प्रमाणें आठ पंधरा दिवस क्रम ठेवावा. (२) **पुष्टतेस**—सुक्या अंजिराचे तुकडे व बदामाचे गर ऊन पाण्यांत भिजऊन सालें काढून सुकविलेले, खडीसाखरेची पूड, वेलचीदाण्यांची पूड, केशर, चारोळी, पिस्ते, बेदाणा, हीं समभाग घेऊन, गाईच्या तुपांत ८ दिवस भिजू घालू मग नित्य सकाळीं तें मिश्रण २ तोळे पर्यंत घ्यावें. आठ वर्षांवरील मुलांस व शक्तिक्षीणांस चांगलें हितावह होऊन, थंडाई, धातुवृद्धि व रक्तवृद्धि करणारें हें उत्तम औषध आहे. (३) **दम्यावर**—अंजिरांतून गोरखचिंचेचें दळ, नित्य प्रातःकाळीं ६ मास प्रमाणें सतत सेवन करावें. (४) **गळ्यांत व जिभेजवळ सूज आल्यास**—सुक्या अंजिराचा काढा करून त्याच्या गुळण्या कराव्या. (५) **पोटीस**—अंजीर ओलें आणून ठेंचून, गळूं, बद इत्यादिकांवर बांधावे.

## १३. अर्जुनसादडा.

**सं०-अर्जुन. गु०-अर्जुनसाजडा, धोळोसाजड. हिं०-कौहा, कोह. बं०-अर्जुन. क०-तोरेमत्ति, मत्ति, सोहोन्ने, किषिमन-मारा. ते०- मद्दिचट्टु. ता०-मारुडं. मला०-मारुत. गोमं०-मत्तिकु. ला०-**Sterculiaurens **सरक्युलियायुरेन्स.** Terminalia tomentosa **टरमिनेलियाटोमेन्टोसा.**

हा एक अरण्यवृक्ष आहे. जसें ऐनाचें झाड असतें तसेंच अर्जुनसादड्याचेंही असतें. ऐनास सादडा असेंही नांव आहे. यावरून दोहोंचेंही साम्य तेव्हांच लक्ष्यांत येईल. ऐनाच्या पानांप्रमाणेंच याचीं पानें असतात. या पानाची रुंदी सुमारें ५ अंगुळें असून, तीं वीतभर लांब असतात. यास पांढरा सफेत डीक येतो. याची साल पांढुरकी असते. पांढऱ्या ऐनाची सालही बाहेरून पांढुरकी दिसते. परंतु ती वाळल्यावर लाल होते; तशी

ही साल वाळल्यावरही लाल न होतां पांढरीच राहते. हा वृक्ष बराच मोठा होतो. हीं झाडें कोंकणांत व देशावरही होतात. यांस पांढुरकीं फुलें येतात. याचें लांकूड इमारतीकामास उपयोगी पडतें. औषधांत याच्या अंतर्सालीचा उपयोग करावा. 'सारढोळ' किंवा 'कांडोळ' या झाडास कोणी कोणी याच वृक्षाचें नांव दिलें आहे. परंतु तो वृक्ष निराळा आहे. **अर्जुनसादडा**–तुरट, मधुर, शीतळ, कांतिकारक, बलकर, लघु, व्रणशोधक असा आहे. व अस्थिभंग, कफ, पित्त, श्रम, तृषा, दाह, मेह, वायु, हृद्रोग, पांडुरोग, विषबाधा, क्षतक्षय, मेदवृद्धि, रक्तदोष, घाम, दमा, क्षत व भस्मकरोग यांचा नाश करितो. ( १ ) **बिबा उततो त्यास**–अर्जुनसादड्याची साल व पानें कुटून बिबा उतल्या जागीं लेप करावा. ( २ ) **व्रण भरून येण्यास**–अर्जुनसादड्याच्या सालीच्या काढ्यानें व्रण धुवावा. म्हणजे ते लौकर भरून येतात व त्यांत कृमी वगैरे पडत नाहींत. अथवा याच्या सालीचें चूर्ण व्रणांत भरावें म्हणजे व्रण व अग्निदग्धव्रण हे लवकर भरून येतात. ( ३ ) **अस्थिभंगावर**–अर्जुनसादड्याचें चूर्ण दुधाशीं द्यावें; अथवा साल ठेंचून वर बांधावी; किंवा सालीचें चूर्ण, तूप लावून त्यावर टाकावें व पट्टा बांधावा. ( ४ ) **पित्त व हृद्रोगावर**–अर्जुनसादड्याच्या सालीचा काढा करून गाईच्या दुधांत घालून तें दूध खिरीसारखें आटवून साखर टाकून घ्यावें, म्हणजे चांगली शक्तिही येते. (५. ) **हृद्रोगावर**–अर्जुनसादड्याचें चूर्ण व गव्हाचा रवा, समभाग घेऊन, तें शेळीच्या अथवा गाईच्या दुधांत घालावें व त्यांत गाईचें तूप, त्याच्या बेतानें घालून शिजवावें. व मध आणि साखर यांबरोबर घ्यावें. (६.) **क्षय, कास व पित्त यांवर**–अर्जुनसादड्याच्या सालीच्या चूर्णास अडुळशाच्या रसाच्या २१ भावना देऊन, तें चूर्ण, मध, तूप व खडीसाखर यांच्याशीं घ्यावें. ( ७. ) **हृद्रोग, रक्तपित्त व जीर्णज्वर यांवर**–अर्जुनसादड्याच्या सालीचें चूर्ण, तूप, दूध, मध अगर गुळाचें पाणी, यांपैकीं कोणत्या तरी एका अनुपानाबरोबर द्यावें. म्हणजे वरील रोग दूर होऊन तें घेणारा पुष्कळ दिवस जगतो. (८. ) **हृद्रोगावर**–अर्जुनसादड्याच्या

अंतर्सालीचा कल्क करून, त्याच्या चौपट तूप व तुपाच्या चौपट अर्जुनसादड्याच्या पानांचा अथवा साळीचा रस त्यांत घालून, तूप शेष राहीपर्यंत मंदाग्नीवर कढवावें व तें सेवन करावें. मस्तकशूलावर लेप करण्यास हें घृत उत्तम आहे. ( ९. ) **मूत्रावरोधापासून झालेल्या उदावर्तावर**—अर्जुनसादड्याच्या अंतर्सालीचा काढा द्यावा. (१०.) **कृमींवर**—अर्जुनवृक्षाचीं फुलें, वावडिंग, पिठवण, बिबवा, वाळा, सुरूचा डीक, राळ, चंदन व कोष्ठ यांचें चूर्ण एकत्र करून, त्याचा धूर एक वेळ घेतला असतां कृमिनाश होतो, व हा धूप अंथरुणास दिला असतां ढेंकूण व पिसा मरतात. ( ११. ) **रक्तातिसारावर**—अर्जुनवृक्षाची साल दुधांत वांटून मध घालून प्यावी. ( १२. ) **वातरोगांवर**—अर्जुनवृक्षाच्या सालीचें चूर्ण, मध व लोणी यांत कालवून लेप करावा. अथवा अर्जुनसादड्याची साल, मंजिष्ठ व अडुळसा यांचा लेप मधांत करावा. ( १३. ) **हृद्रोगावर**—गहूं व अर्जुनसादडा, यांचें चूर्ण, शेळीचेदुधांत गाईचें तूप घालून शिजवावें. आणि मध साखर यांबरोबर खावें. तें मनुष्याचा उद्धत हृद्रोग शांत करील. ( १४. ) **तारुण्यपीटिकेवर**—अर्जुनवृक्षाच्या सालीचा दुधांत वांटून लेप करावा.

## १४. अडुळसा.

**सं० अटरुष. गु० अरडुशी हिं० अरुसा, अडूसा, बांसा. वं० बासक.**
**क० आड सोगे. तै० आडासारं, आडापाकु. ता०--अडाडोडाई.**
**तु० येडू, मईडी तप्पु मळा०--अटालोटकं. ला०**
Adhatoda Vasica **आधा टोडावासिका ॥**

अडुळशाचीं झाडें सर्वत्र प्रसिद्ध आहेत, यांत पांढरा व काळा अशा दोन जाति आहेत. पांढऱ्या अडुळशाचा रंग पांढरा व काळ्या अडुळशाच्या झाडाचा रंग हिरवट असतो. व पान कुड्याच्या पानासारखें, परंतु मृदु असतें. या पानावर पांढरे किंवा कोणत्याही तऱ्हेचे डाग असत नाहींत. हा अडुळसा पांढऱ्या अडुळशापेक्षां फार उष्ण व कफनाशक आहे. पांढऱ्या अडुळशाच्या पानांचा रंग हिरवा असून, त्यावर पांढऱ्या रंगाचे पट्टे

असतात. अडुळशाचीं फुलें पांढरीं असतात. अडुळशाचें झाड पुरुष दोन पुरुष उंच वाढतें. याचें लांकुड मऊ व हलकें असल्यामुळें याचा कोळसा दारूंत घालण्याच्या कामीं पडतो, अडुळसा शीतवीर्य, हृद्य, लघु, तिखट, कडू, स्वर्य आहे. व खोकला, कावीळ, शैत्यपित्त, विषयंता, ज्वर, कफ, श्वास, मेह, क्षय, कुष्ठ, अरुचि, तृषा, आणि वांति यांचा नाश करितो. (१.) **श्वास, कास, रक्तपित्त, व कफक्षय** यांवर–अडुळशाच्या पानांचा फुलांसहित रस काढून मधाशीं द्यावा. कितीही दिवसांचा दमा, खोकला असला तरी तो व कफक्षय हे दूर होतात. (२.) **कफपित्त, ज्वर, रक्तपित्त व कावीळ यांवर**–अडुळशाच्या पानांचा फुलांसहित रस काढून, त्यांत साखर व मध घालून तो द्यावा. (३.) **रक्तपित्तावर**–अडुळशाच्या रसाच्या सात भावना हरीतकीस देऊन ती सेवन करावी. अथवा मध व अडुळशाचा रस समभाग घेऊन तो सेवन करावा. (४.) **सुखप्रसूति होण्यास**–अडुळशाचें मूळ उगाळून नाभि व....यांस लेप करावा व केळीचा कांदा कंबरेस बांधावा. (५.) **श्वासावर**–अडुळशाचा रस व गाईचें लोणी एकत्र कालवून त्यांतून त्रिफलाचूर्ण द्यावें. (६.) **खरजेवर**–कोंवळीं अडुळशाचीं पानें व आंबेहळद, हीं गोमूत्राशीं एकत्र वांटून, त्याचा खरजेवर लेप करावा किंवा पानें पाण्यांत कढवून त्यानें स्नान करावें. (७.) **पित्तजनित प्रदरावर**–अडुळशाच्या रसांत मध घालून द्यावा. (८.) **श्वेत प्रदरावर**–अडुळशाच्या मुळींचा रस मधाशीं द्यावा. ह्मणजे पांढऱ्या धुपणीचा नाश होतो. (९.) **मुलांच्या कफविकारावर**–अडुळशाचीं ओलीं पानें घेऊन त्याचा पुटपाकानें रस काढावा. **पुटपाकाचीकृतिः**–पानें केळीच्या पानांत बांधून वरून मातीचा लपेटा देऊन, फोपाट्यांत भाजून नंतर बाहेर काढून, वरील केळीचें पान काढून, अडुळशाचीं पानें हातावर चोळून रस काढावा. हा रस सुमारें २० थेंब व तल्या टांकणखाराची लाही दोन गुंजा व मध चार मासे; हीं सर्व एकत्र खलून चाटण करून ठेवावें. हें चाटण दिवसांतून चार पांच वेळां मुलाच्या शक्तिप्रमाणें चाट

द्यावें; तेणेंकरून कफाचा नाश होऊन मुलें हुशार होतात (१०.) **खोकला, क्षय, श्वास व रक्तपित्त यांवर**-अडुळशाच्या पानाला वाफ देऊन हातावर चोळून रस काढावा. त्यांत खडीसाखर घालून मधासारखा दाट होईपर्यंत पाक करावा. मग त्यांत बेहड्याचें चूर्ण व हळदीचें चूर्ण घालून ठेवावें व तें वरचेवर चाटवीत जावें. (११.) **कफ फार दाटत असला तर**-गरम चहांत अडुळशाचा रस, खडीसाखर, मध व दोन गुंजा पादेलोण, हीं घालून द्यावें. (१२.) **कासश्वासावर-अडुळ**शाच्या काढ्यांत साखर व मध घालून द्यावा. किंवा अडुळशाच्या रसांत मध व सैंधव घालून द्यावें. (१३.) **कफज्वरावर**-अडुळसा, नागरमोथे, धमासा, सुंठ, भारंगमूळ, यांचा काढा द्यावा. अडुळशाचीं व कुळरीचीं पानें यांचा काढा मध घालून द्यावा.(१४.) **विंचवाचे विषावर**-काळ्या अडुळशाची मुळी थंड पाण्यांत उगाळून लावावी. (१५.) **देवीचा आजार न येण्यास**-अडुळशाचा रस व ज्येष्ठमध हीं द्यावीं ह्मणजे देवीचा आजार येत नाहीं. (१६.) **खोकल्यावर**-अडुळशाच्या रसांत तेल्या टाकणखाराची लाही मध घालून द्यावी (१७.) **क्षयादिकांवर**-अडुळशाच्या पानांचा काढा, मध व खडीसाखर घालून द्यावा ह्मणजे क्षय, रक्तपित्त, कास, कफ व पित्तजन्य ज्वर हे दूर होतात. (१८.) **त्रिदोषावर**-अडुळशाच्या पिकल्या पानांस वाफ देऊन, त्यांचा रस काढून तो व आल्याचा रस एकत्र करून, त्यांत थोडा तुळसीचा रस घालून, मध व ज्येष्ठमध उगाळून द्यावें (१९.) **रक्तपित्तावर-अडुळ**शाच्या पानांचा हिम करून प्यावा. (२०.) **मुखरोगावर**-अडुळशाच्या रसांत मध मिश्र करून, त्यांत उपरसालीचें मूळ उगाळून लेप करावा. (२१.) **कफज्वर व खोकला यांवर**-अडुळसा, गुळवेल व रिंगणी यांचा काढा मध घालून द्यावा. (२२.) **रक्तपित्तज्वर, श्वास, कास व ज्वर** यांवर-अडुळसा, द्राक्षें व हरीतकी यांचा काढा, मध व साखर घालून द्यावा. (२३.) **मूत्राघातावर.**-अडुळशाचा काढा द्यावा. (२४.) **दुर्धरसूज, श्वास, कास, ज्वर, ओकारी** यांवर-अडुळसा, गुळवेल, डोरली यांचा काढा, मध घालून द्यावा.

# १५. अतिविष.

**सं० अतिविषा. गु० अतवस. हिं० अंतीस. बं० आतइच क० अति विषा अतिबजि. तै०- अतिवासा. ला०** Aconitum heterophyllum **एकोनिटम हिटरो फाइलम.**

अतिविषाचीं झाडें हिमालयावर व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत डोंगरावर होतात. या झाडाच्या मुळ्या अथवा कंद काढून आणतात; त्यास अतिविष ह्मणतात. यांत पांढरें, काळें व पिंवळें असे तीन प्रकार आहेत. याची साल वस्त्रें रंगविण्याच्या कामांत उपयोगीं पडते. औषधांत पांढऱ्याचा उपयोग होतो. अतिविष फार कडु असतें. अतिविष सर्व प्रकारच्या ज्वरांवर उत्तम औषध आहे. हें लहान मुलांच्या औषधांत फारच येतें. बालकांच्या घुटींत अतिविष हें मुख्य आहे. अतिविष–किंचिदुष्ण, तीक्ष्ण, अग्निदीपक, ग्राहि, त्रिदोष पचविणारें, कफपित्तज्वर, आमातिसार, कास, विष, यकृत, वांति, तृषा, कृमि, अर्श, पडसें, पित्तोदर, अतिसार, व सर्व व्याधि यांचें नाशक आहे. ( १. ) मुलांचा **खोकला, दमा, ताप, व ओकारी**, यांजवर–अतिविषाचें चूर्ण तारतम्य पाहून मधांतून द्यावें. ( २. ) **लहान मुलांच्या ज्वरावर व वांतीवर**– अतिविष व नागरमोथे यांचें चूर्ण मधांतून द्यावें. ( ३. ) **पित्तातिसारावर**–अतिविष, कुड्याची साल, व इंद्रजव, यांचें चूर्ण, तांदुळाच्या धुवणांशीं मध घालून द्यावें. ( ४. ) **दमा व खोकला** यांजवर–अतिविषाचें तीन किंवा चार मासे चूर्ण घेऊन, तें मधांत कालवून सर्व रात्रींत तीन किंवा चार वेळां चाटलें असतां दमा व खोकला जातो. ( ५. ) **संग्रहणी, सर्वज्वर, अरोचक, व अग्निमांद्य** यांवर **अतिविषादि काढा**–अतिविष, नागरमोथे, वाळा, धायटीचें फूल, कुड्याची साल, लोध्र व पहाडमूळ, यांचा काढा करून तो द्यावा, ह्मणजे वरील सर्व रोग दूर होऊन धातूची वृद्धि होते. ( ६. ) **तृषेवर**–अतिविष व वेखंड यांचा काढा द्यावा. ( ७. ) **मुलांच्या आमातिसारावर**–सुंठ, अतिविष व नागरमोथे यांचा काढा द्यावा. ( ८. ) **मुलांच्या** सर्व प्रकारच्या **अतिसारा-**

वर-अतिविषाचें चूर्ण गुळांत अगर मधांत द्यावें. ( ९. ) **बळंतरोगावर**- अतिविष मधांत द्यावें. (१०.) **संग्रहणीवर**-अतिविष, सुंठ, व गुळवेल यांचा काढा द्यावा.

## १६. अनंत.

**गु० हिं०-पिंडीतगर. क० पिंडितगर तै० तगरपादिका मु० ला०**
Gardenia floridunda **गार्डेनिया फ्लोरिडंडा.**

हें झाड बरेंच मोठें वाढतें. हें झाड कोंकणप्रांतीं फार आढळतें. याचीं पानें लांबट व जाड असतात. हें झाड फार शोभिवंत दिसतें. या झाडास फुलें श्रावणांत, गोंडेतगरीच्या फुलांसारखीं झुपकेदार येतात. हीं फुलें फार शोभिवंत दिसतात. यांस वास सुवासिक मधुर असा येतो, यांत तांबडा व पांढरा अशा दोन जाति आहेत. हें झाड गोंडेतगरीच्या जातीचें आहे. ( १. ) **नंद वायूवर** [ अनंत वातावर ]-ज्या स्त्रिया पूर्ण मास होण्या पूर्वीं प्रसूत होतात व त्यामुळें नंदनामक वायु मस्तकीं चढतो, त्या योगानें मस्तक जड होतें, फिरतें, दिवा लाविला असतां दिसत नाहीं, डोळ्यांपुढें अंधेऱ्या येतात, दांतखीळ बसते; शिरा तांठतात, त्यास-अनंताच्या झाडाची उत्तर दिशेकडील मुळी काढून आणून थंड पाण्यांत गंधाप्रमाणें उगाळून, सर्व मस्तकास लेप द्यावा. व ताळवेवर चोळीत रहावें. व मुळीचा एक तुकडा वेणींत खोंचून ठेवावा. व शक्तीप्रमाणें थंड पाण्यांत मुळी उगाळून पोटांतही द्यावी. **पथ्य**-हुलगे शिजवून, त्याचें पाणी पिण्यास द्यावें. व शिजलेले हुलगे खाण्यास देऊन गुण वाटल्यावर तूपभात द्यावा. ( २. ) **सर्पाच्या विषावर**-अनंताची मुळी व रिठा पाण्यांत उगाळून द्यावा. (३.) **प्रसूत स्त्रियांच्या मस्तकशूळावर**-अनंतमूळ व भारंगमूळ, ऊन पाण्यांत उगाळून लाविलें असतां त्वरित गुण येतो असें वनौषधिप्रकाशकारांचें मत आहे.

# १७.अननस.

सं० अनानस. गु० अनंनास हिं० अनंनास. क० अनासु, हनासु. ता० तै० पारंगिताळेतु पारंगी पेकाकायि मळा० अनानस. इं० Pine Apple पाईन एपल. ला० Ananassa Sativa अननासा सेटिवा.

अननसाच्या झाडास केवळ्याच्या झाडांसारख्या पाती असतात. हीं झाडें बहुधा कुंपणाच्या बाजूनें लावतात, कारण या झाडांच्या पातींस कांटे असतात, त्यामुळें जनावरांचा आंत रिघाव होत नाहीं. या झाडास मध्यभागीं फळ येतें व या फळास अननस ह्मणतात. याच्या सर्वांगास कांटे असतात. याचा शेंडा कापून जमिनींत लावला असतां, रुजून त्याचें झाड होतें. या फळाचा रंग तांबूस किंवा पिंवळट असतो. अननसाचा मुरंबा होतो. अननस खाण्यास स्वादिष्ट असतें. याचा मधला कठीण गाभा टाकून खावा. तो खाण्यास उपयोगीं नाहीं; तो अपकार करितो. पण हा खाण्यांत आल्यास त्यावर कांदा, दहीं व साखर हीं खावीं; ह्मणजे बाधा होत नाहीं. अननसाच्या पातीच्या उत्तम दोऱ्या होतात. अननस अनशेपोटीं कधींही खाऊं नये. खाल्लयास विषाप्रमाणें बाधक होतो. अननस गर्भिणीस वर्ज्य आहे. अननस हिरवा असतां रुचिकर, हृद्य, गुरु, कफपित्तकारक, व श्रम, क्लम यांचा नाशक आहे; तोच पिकला असतां गोड, पित्तनाशक, रसविकार, आतपविकार यांचा नाशक आहे. ( १. ) **अजीर्णावर**–सुपक्वअननसाचे बारीक तुकडे करून त्यांवर मिरें व सैंधव यांची पूड घालून खावें. ( २. ) **जंतावर**–अननस बराच खावा; ह्मणजे जंताचें पाणी होईल. ( ३. ) **बहुमूत्ररोगावर**–पक्व अननसाची साल व आंतील कठीण गाभा काढून टाकून, बाकीच्या भागाचा रस काढावा. त्या रसांत अंबर, जिरें, जायफळ, पिंपळी, पादेलोण, यांची पूड करून घालावी. अंबर कमी मानानें घालावा. हें शक्तीप्रमाणें घ्यावें. अथवा अननसाचे तुकडे पिंपळीचें चूर्ण घालून खावे. ( ४. ) **पोटांत केश गेल्यास**–पक्व अननस खावा, ह्मणजे केशापासून होणारी पीडा दूर होते.

## १८. अंबाडा.

**सं० आम्रातक. गु० अभेडा. हिं० अंबाडा-रा० क०-आंबाळे कापि तै० आभाटं अंबाळम ता०- काट्टमा. मला० अंबालं इं०** Spondias Ekminut **स्पॉंडिआस एकमिनट्**, Hog plum, wild mango **हॉग प्लम्, वाईल्ड म्यांगो ला०-** Spondias Mangifera **स्पोंडिआस मेंगिफेरा.**

अंबाड्याचा वृक्ष मोठा होतो. कोंकण व कर्नाटक या देशांत हे वृक्ष पुष्कळ होतात. याचीं पानें रामफळीच्या पानासारखीं असतात. याचें लांकूड इमारतीस उपयोगीं पडत नाहीं. याचें फळ फार आंबट व पोफळाएवढें मोठें असतें. त्यांत आंब्यासारखा बांठा असतो. हें फळ आंबट असतें. यामुळें चिंचेबद्दल याचा उपयोग करितात. कोंवळ्या फळाचें लोणचें घालितात. अंबाड्यास मोहर आंब्यासारखाच येतो. एकच पदार्थ सर्वकाळ खाल्यानें मनुष्यास वीट येईल; ह्मणून त्याच्या सुखाकरितां दयाळू परमेश्वरानें दुसरे आंबट पदार्थः—चिंच, निंबू, आंबा, कौठ, द्राक्षें, रातांबा, बिंबलें, करमर इ० उत्पन्न करून ठवले आहेत. **अंबाडा**-गुरु, उष्ण, तुरट, आंबट, रुचिकारक, सारक, कंठास हितकर, पित्त, कफ, व रक्त यांना करणारा व आमवायु, आम यांचा नाश करितो. तो पिकला असतां तुरट, शीत, जड, वृष्य, बलकर, मधुर, तृप्तिकर, कफकर, स्निग्ध, धातुवर्धक, मलस्तंभक व वायु, कफ, पित्त, रक्तदोष, दाह, क्षतरोग, क्षय यांचा नाशक आहे. याचें कोंवळें पान रुचिकर, ग्राहक, व अग्निदीपक आहे. (१)**अम्लपित्तावर**—अंबाड्याचीं कोंवळीं फळें आणून, त्यांचा रस काढून एक तोळाभर रसांत ९ तोळे खडीसाखर व चार गुंजा मिरपूड घालून द्यावें, हें औषध ७ दि० दुवक्तां घ्यावें. पथ्य करावें ( २ ) **आग्याघोणसाच्या विषावर**—अंबाड्याच्या झाडाची साल ३ भाग, कुणकाची साल २ भाग, खुरचाफ्यांची साल १ भाग घेऊन, त्यांचा रस काढावा. त्यांत घणसरीचें पाळ उगाळून जनावरास प्रत्येक वेळीं अच्छेर पासून एकशेरपर्यंत व मनुष्यास नवटांकपासून पावशेरपर्यंत शक्तीप्रमाणें द्यावें.

हें औषध, विषाचा जोर कमी होईपर्यंत दोन तीन वेळ द्यावें. मनुष्यास उतार तूपभात.

## १९. अंबाडी.

**सं. अंबष्टा. गु०-अंबाडी. हिं० अंमारी, मोईआ क० पुंडी, पुंडीबाज पुंडियानारु बं०-माचिका पंजाबी-तुसुकडा.**

अंबाडी देशावर फार होते. अंबाडीचें झाड चार पांच हात उंच असतें. हें सरळ वाढतें. कोंवळेपणीं याच्या पाल्याची भाजी करितात. याच्या बियांचें तेल निघतें. हें तेल, करडी किंवा भुयमूग यांच्या साह्यानें काढतात. झाडें सुकल्यावर तीं भिजूं घालून, त्यांवरील वाख काढून घेतात. त्याचे गोणपाट, दोऱ्या, कागद वगैरे अनेक जिन्नस होतात अंबाडीचें स्वतंत्र शेत कोणी पेरीत नाहींत. दुष्काळांत गरीब लोक अंबाड्याच्या भाकरीवरच दिवस काढतात. यांतच एक दुसऱ्या जातीची अंबाडी आहे. त्यास "विलायती अंबाडी" असें ह्मणतात. या झाडावर जीं बोंडें येतात, त्यांवरील सालपटें तांबड्या रंगाचीं असून, आंबसुलाप्रमाणें आंबट असल्यामुळें, तीं सुकवून ठेवून उपयोगांत आणतात. हीं पित्तशामक आहेत. अंबाडीच्या सणकाड्या, गंधकाचें पाणी करून त्यांत बुडवितात व विस्तव पेटविण्याच्या कामीं त्यांचा उपयोग करितात. ( १. ) **पित्तांशावर**-तांबड्या [ विलायती ] अंबाडीचीं आममुळें पाण्यांत शिजवून, त्या पाण्यांत मिरपूड, हिंग व गूळ घालून तें प्यावें ( २. ) **खवड्यावर**-अंबाडीच्या पाल्याच्या रसांत आंवळसरा गंधक खलून लावावा. ( ३. ) **हातास जळवात असल्यास**-अंबाडीच्या पाल्यांत मीठ घालून त्याचा वफारा द्यावा. व गरम आहे तोंच हातावर बांधावा दिवस ७. ( ४. ) **तेलापासून झालेल्या अजीर्णावर**-अंबाडीची भाजी तांदुळाच्या कण्या घालून शिजवावी आणि ती खावी ( ५. ) **गुरांस दूध जास्त सुटण्यास**-अंबाड्या भरडून शिजवाव्या व त्यांत तेल, गूळ घालून दुभत्या गुरांस खाऊं घालाव्या. ह्मणजे त्यांस दूध जास्त सुटतें.

## २०. अबई.

**सं० महाशिंबी कों० खरसंबळ कोयतेवाल. गु० परबोलिया, वालौर. हिं० गोईजिया सेव, सेम, बं० श्वेत सिम. क० शंबीकाई तै० कार चिकटु. अ० गलाफूल गोल ला.** Canavalia ensiformis **केना वेलिया एन् सिफोरमिस.**

या वेलास खरसंबळ, कोयतेवाल, पठारी, अशीं नांवें आहेत. हा मोठा वाढतो. हे मृगाच्या सुमारास लावतात, अश्विनाच्या सुमारास यास शेंगा येतात. त्या सुमारें पाऊणहात लांब असून, शेवटास कोयत्यासारख्या वांकलेल्या असतात. त्यांची भाजी करितात व लोणच्यांतही घालतात. या शेंगा कोंवळ्या असतांनाच खावयाच्या उपयोगी आहेत, यांस फार दर्प असून, भाजी फार खाल्ली असतां घेरी येते. किंवा दुसरा उपद्रव होतो, ही भाजी शिजवून एक वेळ वेळून टाकावी लागते, **अबई**–पांढरी व तांबडी–जड, शितळ, कफकर, रसकाळीं मधुर, बलकर, व पित्तवायु यांचा नाश करिते, काळी अबई–उष्ण, गुरु, बल्य, रुचिमद, शुक्रवृद्धि-कारक, अग्निमांद्यजनक, मलस्तंभक, तुरट, मादक, व कफवातनाशक आणि पित्तकर अशी आहे. ( १ ) **प्लीहोदर** ह्म० कवलु अ० पानथरी वर–खरसंबळीचें पाळ गोमूत्रांत उगाळून द्यावें. दि० ७. ( २. ) **वाट सरल्यास**–खरसंबळीचा रस प्रथम देऊन, नंतर वर कारलीचा रस द्यावा. हें औषध शक्ति पाहून नवटांकपर्यंत द्यावें. उतार तूप.

## २१. अंबेहळद.

**सं० आम्रनिशा. गु०–आंबाहळदर. हिं० आंबाहळदी क० हळि अरषणु, काडअरासिणु. ता० कस्तुरी मंजल. क० तु०–आंने मंजल. मला०–कत्तुमञ्जळ मै०–फारुपा सुपु, अडिळ यासुपु इं०–**Mango ginger **म्यांगोजिंजिर** Curcu maromatica **करक्यूमारारोमेटिका.**

हीं झाडें रानांत होतात. हिचीं झाडेंवगैरे हळदी प्रमाणें असतात. या हळदीच्या गांठी मोठ्या असून तीस दर्प फार असतो. ही हळद बागा-

इती हळदीप्रमाणें मसाला इत्यादिकांच्या उपयोगी पडत नाहीं. परंतु इचें लोणचें घालतात. आंबेहळद ही मोठी रक्तविकारनाशक आहे. अंगास लावावयाच्या मसाल्यांत ही घालतात. ही अंगास लावल्यानें कंडूचें शमन होतें. **अंबेहळद**—कडू, आंबट, रुचिप्रद, लघु, अग्निदीपक, उष्ण, तुरट, सारक, व कफ, उग्रव्रण, खोकला, दमा, उचकी, ज्वर, सन्निपातज्वर, शूळ, वायु, कंडु, व्रण, मुखरोग व रक्तदोष, यांचा नाश करिते. (१.) **कंडू व खरूज** यांवर—अंबेहळद व कडूजिरे एकत्र वाटून अंगास लावावें. म्हणजे कंडू दूर होतो. अंबेहळद व कडूजिरे यांचें बारीक चूर्ण करून, तुपांत खलून खरजेस लावावें. म्हणजे खरूज दूर होते. (२.) **ठेंच लागून पडल्यामुळें** अ० कोणताही आघात होऊन **रक्त सांखळल्यास** त्यावर—अंबेहळद व रक्तयाबोळ, हीं पाण्यांत उगाळून ऊन करून दुखल्या भागास त्याचा लेप द्यावा, म्हणजे त्वरित गुण पडतो. (३.) **देवी** किंवा **गोंवर** यांपासून अंगावर कांटा उठतो त्यावर—आंबेहळद, कडूजिरे, बावँच्या, टाकळ्याचें बीं व आंवळकटी हीं गोमूत्रांत भिजत घालून वाटून रोज अंगास लावून स्नान करावें. (४.) **जंतावर**—आंबेहळद व सैंधव एकत्र वाटून शक्तिप्रमाणें द्यावें व वर ऊन पाणी प्यावें. अथवा सागरगोटीच्या पाल्याच्या रसांत आंबेहळद उगाळून पोटांत द्यावी. (५.) **मुलांस वांग** (मुल जन्मल्यापासून १०।१५ दिवसांच्या आंत त्याच्या अंगावर पुटकुळ्या येऊन त्यांत केंस होतो त्यास म्हणतात.) आला तर—आंबेहळद जाईच्या रसांत उगाळून लावावी.

## २२. अबोली.

**सं० अम्लान. गु० रातो कांटा अशेळीयो. हिं० लालकटसरैया.**
**बं० रक्तझिंटी. क० कंपु गोरंठे गिड. तै० इर्रा गोरटा.**

कोरांटीप्रमाणेंच हें झाड असतें. हें झाड हात दीडहात उंच वाढतें यास तांबडीं किंवा पिंवळीं फुलें बारमासही येतात. हीं फुलें लहान असतात. यांस वास अगदीं नसतो. **अबोली**—कडू, उष्ण, वर्णकर, सुंदरताकारक अशी आहे आणि वायु, सूज, ज्वर, शूळ, आध्मान, दमा,

खोकला, मुखरोग, बस्तिरोग यांचा नाश करिते. ( १. ) पांढऱ्या धुपणीवर–हिची मुळी १ तोळा घेऊन ती दुधांत शिजवून, तें सुमारें छटांक घ्यावें.

## २३. अमरवेल.

सं० अमरवल्लरी. म० अमरवेल, आकाशवेल, अंतरवेल, सोनवेल. गु० अमरवेल. हिं० अमरवेल, आकाशवबरी. क० बेलुबळिळ, नेळमुदबळिळ, शाविगेबळिळ. अमरवळ्ळी तै० इंद्रजाल, पांपाळिगे. फा० कनवाल ब्युस्लासीई. अ० अफतिमून. ता० कोत्तान, इंदिरावल्ली, नांवे. मला० आकाशवल्लि ला० Cuseutareflxa कसकुटारीफ्लेक्सा.

अंब्याच्या झाडावर एक वेलीप्रमाणें वनस्पति उगवते; तीस अमरवेल असें ह्मणतात. या वेलीचें मूळ त्या वृक्षांतच असतें. ज्या प्रमाणें बांदें ( वृक्षादनी ) असतें, त्याप्रमाणेंच ही वेल असते. अमरवेल ही किंचित तिखट, मधुर, प्रिय, अग्निदिपक असून नेत्ररोग, कफ, आम व पित्त यांचा नाश करिते.

## २४. अम्लवेतस.

गु० अंमलबेद. वऱ्हाडी. सुळेनिंबू. हिं० अम्लबेत, थैकल. क० अम्लवेतस. फा० तुर्षक. इं० Commonsoral कॉमनसोरेल.ला० Acidozeyfolia आसिडोझीफोलिया.

महाळुंगाप्रमाणें ही एक निंबाची जात आहे. अम्लवेतसाचीं झाडें काशीकडे होतात. हें फळ फारच आंबट आहे. यास हरभऱ्याच्या आंबेसारखा वास येतो. या फळांत पोलादी सुई टोंचून ठेविली असतां ती विरघळते; असा या फळांत प्रभाव आहे. अम्लवेतस हें पोटांतील उदर व गुल्म वगैरे रोगांवर वस्ताद आहे. पुष्कळ औषधांत याच्या रसायनाचा उपयोग होतो. अम्लवेतस हें तुरट, आंबट, कडू, तिखट, अग्निदीपक, उष्ण, लघु, रूक्ष, पथ्यकारक, मलाचा भेद करणारें असें आहे व कफवात, कफार्श, गुल्म, मूत्राश्मरी, अरुचि, श्रम, तृषा, हृद्रोग, हिक्का, शूल, प्लीहा, अजीर्ण, आनाहवायु, उदावर्त, आध्मान, कुष्ठ व वांति यांचा नाश करितें.

## २५. अराटी.

**सं० आरी. गु० खेरवेल्य हिं० वल्लिखदिर, मट्टिकफन. क० सीगुरि.**
**इं० Acaeiopenata एकेशियापिनेटा.**

अराटीचीं झाडें कंटकयुक्त असून, तीं वेलीप्रमाणें पसरतात. हीस "वल्ली-खदिर" असेंही संस्कृत नांव आहे. खैराच्या झाडासारखींच हिचीं पानें असतात. अराटीचा कुंपणाकडे उपयोग होतो. अराटी ही कडू, तुरट, तिखट, उष्ण, रसकाळीं व पाककाळीं आंबट, रक्तकोपन अशी आहे. आणि वात, कास, पित्तरोग यांचा नाश करिते.

## २६. आल.

**सं० अच्युतवृक्ष. गु० हिं० आल.**

या झाडास मुसलमानी भाषेंत "सुरंजी" असें ह्मणतात. हें झाड पुष्कळ वर्षें राहिल्यास हशीयाच्या झाडाएवढें होतें. त्याचीं पानें हशीयाच्या पानांप्रमाणें किंवा मोहाच्या पानांप्रमाणें असतात. ह्या झाडास बाराही महिने फुलें येतात. फुलांचा रंग पांढरा असून त्यांस थोडा मधुर वास येतो. याचीं फळें हशीयाच्या फुलाप्रमाणें असून, तीं कोणी कोणी लोणच्यांत घालतात. या झाडाची लागवड खानदेश व वऱ्हाड या प्रांतांत फार होते. याच्या मुळ्यांचा रंग काढतात. आलचीं झाडें रंगाकरितां तयार होण्यास तीन वर्षें लागतात. वऱ्हाडांत याचीं मोठमोठीं शेतें लावितात. याच्या मुळ्यांत जितकी बारीक मुळी असते, तितका तिचा रंग चांगला निघतो. या मुळ्यांचा पक्का खारवी रंग होतो. सत्रंज्या पासोड्या वगैरे याच्या रंगांत रंगवितात.

## २७. आलें.

**गु० आदुं. हिं० अद्रक. सं० आर्द्रक, आदा आंदी. क० अल्ल.**
**फा० जिंजिबिलवर अ० जिंजिबिलइतब.**

आल्याचें झाड सुमारें एक हात उंच वाढतें, तें वाढूं लागलें ह्मणजे त्यास नव्या पसरट मुळ्या येतात. आलें सुकवून त्याची सुंठ करितात.

सुंठीचें तेल निघतें. बंगाल, मद्रास व जमेका बेट येथून पुष्कळ सुंठ इकडे येते. आलें हें सुंठीपेक्षां सौम्य आहे. आल्याचा पाक करितात त्यास आले पाक ह्मणतात. आलें हें पाचक, सारक, अग्निप्रदीपक, रुचिप्रद व कंठास हितकर असें आहे. व सूज, कफ, वायु, कंठरोग, खोकला, दमा, आनाहवायु, मलबद्ध, वांति, व शूळ यांचा नाश करितें. ( १. ) **आलेपाक**-आल्याचा रस काढून त्यांत पाणी घालावें. नंतर साखर घालून पाक करावा. त्यांत केशर, वेलची, जायफळ, जायपत्री, व लवंग, हीं घालून तो भरून ठेवावा. हा श्वास, कास, अग्निमांद्य, अरुचि यांवर प्रशस्त आहे. ( २. ) **अजीर्णादिकांवर**-आल्याच्या रसांत निंबूरस व सैंधव हीं घालून तें प्राशन करावें. ह्मणजे अजीर्ण दूर होऊन अग्नि प्रदीप्त होतो; व वायू, मलबद्धता, आमवात यांचा नाश होतो. ( ३. ) **मूर्च्छा वायूचा झटका** येतो त्यावर-सुंठ उगाळून अंजन करावें ( ४. ) **योनिशूळावर**-सुंठीची पूड एरंडेलांत कालवून लेप करावा. अथवा सुंठ व एरंडमूळ यांचा लेप करावा. ( ५. ) **अजीर्णावर**-सुंठ व जवाखार यांचें चूर्ण तुपांत अगर ऊन पाण्यांत द्यावें. ( ६. ) **आमवातावर**-एरंडमुळाच्या रसांत सुंठीचें चूर्ण कालवून गोळा करून त्यावर एरंडाचीं पानें गुंडाळून वर चिकणमातीनें सारवून पुटपाक कृतीनें फोंपाट्यांत भाजून, नंतर तो गोळा बाहेर काढून पिळून रस काढून, त्यांत मध घालून द्यावा. ( ७. ) **आमवातावर व पोटशूळावर**-सुंठीच्या काढ्यांत एरंडेल घालून द्यावें. ह्मणजे आमवात, कंबर व पाठ या ठिकाणचा शूळ, सर्वांगशूळ व पोटशूळ हे बरे होतात. ( ८. ) **संग्रहणी, आंव, प्लीहा, आमवातादिकांवर**-सुंठीचा कल्क करून त्यांत तूप घालून शिजवावें. तें तूप सेवन केलें असतां प्लीहा, आमवात हे दूर होतात, वायूचें अनुलोमन होतें, व ग्रहणीरोग सत्वर जातो. ( ९. ) **कासश्वासावर**-आल्याचा रस मधांत घालून द्यावा. अ० सुंठ, ब्राह्मी यांचा काढा, मध, साखर घालून द्यावा. ( १०. ) **वृषणवायूवर**-आल्याच्या रसांत मध घालून द्यावा, ह्मणजे अरोचक व पडसें हे दूर होतात. ( ११. ) **अतिसारावर**-आल्याच

रस, नाभीला चोळावा. ह्मणजे दुःसाध्यही अतिसार दूर होतो. ( १२. ) **उदररोगावर**-पाण्याबरोबर आल्याचा रस द्यावा. ( १३. ) **अग्निमांद्यावर**-आल्याचा रस व निंबाचा रस समभाग घेऊन, त्यांत तितकेच सैंधव मिश्र करून, भोजनाच्या पूर्वी प्राशन करावें, ह्मणजे अग्निमांद्य दूर होतें. भोजनारंभीं हे तिन्हीं पदार्थ भक्षण केले असतां अग्नि प्रदीप्त होऊन जिव्हा, कंठ, हृदय यांची शुद्धि होते. स्वरभेद, सूज, मलावष्टंभ, श्वास, कफ, खोकला, वायु यांचा नाश होतो व धातुवृद्धि होते. ( १४. ) **गर्भिणीच्या विषमज्वरावर**-दोन अथवा तीन मासे सुंठ, शेळीच्या दुधांत वांटून द्यावी. ( १५. ) **क्षुधा लागत नसल्यास**-सुंठीचें चूर्ण १ मासा, दोन तोळे पाण्यांत घालून द्यावें. ( १६. ) **खोकल्यावर**-आल्याचा रस, निंबूरस व मध समभाग करून, त्यांत पिंपळी घालून दिवसांतून दोन तीन वेळ हें मिश्रण घ्यावें. ( १७. ) **जीर्णज्वरास**-ताकाच्या निवळींत सुंठ उगाळून द्यावी. दि० २१. ( १८. ) **अम्लपित्तास**-सुंठ, आंवळकटी व खडीसाखर बारीक कुटून, चांगला खल करून, सकाळीं खावी. ( १९. ) **हृद्रोग, अग्निमांद्य, श्वास, कास, अरुचि, पडसें, उदर, पाण्यापासून शूळ यांवर**-सुंठीचा काढा द्यावा. येणें करून कांति, चित्त व नेत्र हे प्रसन्न राहतात. ( २० ) **मुळव्याधीवर**-सुंठीचें चूर्ण ताकांतून द्यावें. ( २१. ) **नासारोगावर**-सुंठ २ तोळे घेऊन ती अर्धाशेर पाण्यांत घालून कढवावी व तें दोन वेळां पोटांत घ्यावें. ( २२. ) **पडशावर**-आलें अगर सुंठ, दालचिनी व खडीसाखर यांचा काढा द्यावा. ( २३. ) **अम्लपित्तास**-सुंठीचें चूर्ण ६ मासे, गेरू १ तोळा, याचा विड्याचे पानांचे रसांत खल करून, वाटाण्याप्रमाणें गोळ्या कराव्या. दररोज दोन गोळ्या सांज सकाळीं दूध व बतासे यांत द्याव्या. ( २४. ) **परिणाम शूलावर**-सुंठ, तीळ, गूळ, हीं एकत्र कुटून गाईचे दुधांत शिजवून द्यावीं. ( २५ ) **मुलांच्या आम संग्रहणीवर**-सुंठ, थंड पाण्यांत गंधाप्रमाणे उगाळून, तितकेंच तूप आणि गूळ किंवा खडीसाखर घालून, शिजवून, चाटण तयार करावें व

थोडथोड्या अवकाशानें चाटवावें. हें मोठ्या मनुष्यासही द्यावें. ( २६. ) **श्वेतप्रदरावर**–दररोज प्रातःकाळीं व रात्रीं निजावयाचे वेळीं, प्रत्येक वेळेस गाईचे १४ तोळे दुधांत २१ तोळे पाणी व ४ मासे सुंठ घालून, अग्नीवर आटवून, पाणी जाऊन १४ तोळे किंवा त्याहून थोडें कमी दूध अवशिष्ट राहिल्यावर त्यांतील सुंठीचे तुकडे काढून टाकून, त्यांत ६ किंवा ४ मासे खडीसाखरेची पूड मिश्र करून घ्यावी. या प्रमाणें २१ दिवस सेवन केलें असतां जोरदार श्वेतप्रदराचाही निखालस नाश होईल. ( २७. ) **वीर्यवृद्धी होण्यास**–एक तोळा सुंठीची बारीक पूड करून, एक भांडें अग्नीवर ठेवून, त्यांत दोन तोळेपर्यंत तूप घालावें. तें तूप चांगलें तापल्यावर, त्यांत ही सुंठीचीं पूड घालून तांबूस होईपर्यंत तळावी व १ तोळा गूळ, ५ तोळे पाण्यांत कालवून, तें पाणी त्यांत घालून पाणीं आटून शिऱ्यासारखा गोळा होईपर्यंत किंवा मोकळा होईपर्यंत ढवळीत राहून पक्क करावा. हें प्रत्यहीं प्रातःकाळीं एकवेळ प्रमाणें १४ दिवस घ्यावें. ह्मणजे अंगांतील वातसंचार, अंगास कळा येणें, अग्निमांद्य, अतिसार, आमांश, व पित्तविकार हे दूर होतात. ( २८. ) **डोळे येतात त्यास**–सुंठ व कडूनिंबाचीं पानें एकत्र वाटून, त्यांत थोडें सैंधव घालून त्याची वडी करून थोडी गरम करून, ती डोळ्यांवर बांधावी. ह्मणजे सूज व कंडू दूर होतो. ( २९. ) **अर्धशिशीवर**–पाण्यांत अगर दुधांत सुंठ उगाळून त्याचें नस्य द्यावें व लेप करावा. अ० आलें व गूळ एकत्र कुटून त्याची पुरचुंडी करून नाकांत रस पिळावा ह्मणजे त्वरित गुण येतो. ( ३०. ) **सुजेवर**–सुंठीची पूड गुळांत कालवून पुनर्नव्याचे रसांत अथवा काढ्यांत द्यावी. ( ३१. ) **कटि, ऊरु, पृष्ठि, त्रिक, ( माकडहाड ) यासंबंधी वायु, गुल्म, शूल, गृध्रसी, उदावर्त, हनुग्रह यांजवर**–आल्याच्या रसांत अ० महाळुंगाच्या रसांत तूप घालून द्यावें. ( ३२. ) **कफरोगावर**–सुंठ व तिचे चौपट खडीसाखर घालून काढा करून द्यावा, ( हा हृद्रोगावरही द्यावा. ) अथवा आल्याच्या रसांत दुप्पट खडीसाखर किंवा गूळ घालून चाटण करून द्यावें. ( यानें सर्दीच्या

योगानें ज्या ढेकरा येतात त्याही बंद होतात. ) किंवा आल्याचा रस, मध, साखर एकत्र करून द्यावें. ( ३३. ) **भांगेवर उतारा**–गाईचे दुधांत सुंठ द्यावी. अ० सात वेळ थंड पाण्यांत १ तोळापर्यंत सुंठ उगाळून द्यावी. ( ३४. ) **डोळ्यांत श्वेत फुलें पडतात याजवर**–गाईचे दुधांत सुंठ उगाळून अंजन करावें. ( ३५. ) **पक्षाघातावर**–गाईचें तूप २८ तोळे घेऊन त्यांत सुंठीचें चूर्ण २८ तोळे परतावें. नंतर त्यांत सोललेल्या लसणीच्या कांड्या २८ तोळे घालून, अग्नि, बळ वगैरे पाहून एक तोळ्यापर्यंत द्यावें. याच्या योगानें पक्षाघात, हनुस्तंभ, कटिभंग, बाहुपीडा वगैरे विकार दूर होतात. ( ३६. ) **वातशूळावर**–सुंठ व एरंडमूळ यांच्या काढ्यांत भाजलेला हिंग व पादेलोण घालून तो द्यावा. ( ३७. ) **आमातिसारावर**–१ तोळा सुंठ पाण्यांत उगाळून, त्यांत तूप व गूळ तोळा तोळा घालून, हें मिश्रण चांगलें पक्क करून चाटण द्यावें. ( ३८. ) **ओकारीवर**–आल्याचा व कांद्याचा रस एक एक तोळा मिश्र करून द्यावा. ( ३९. ) **पित्तविकारावर**–अर्ध तोळा सुंठीची पूड, त्यांत ४ गुंजा सैंधवाची पूड मिश्र करून, नित्य सूर्योदयापूर्वीं पाण्याचे घोटाशीं गिळावी. ( ४०. ) **बहुमूत्ररोगावर**–आल्याचा रस, खडीसाखर घालून नित्य दुवक्त घ्यावा. ( ४१. ) **पित्तविकारावर**–७ तोळे गाईचें दूध घेऊन, त्यांत अर्धतोळ्यापासून १ तोळ्यापर्यंत सुंठ उगाळावी. व तें दूध आटवून खव्यासारखी गोळी करून साखर घालून प्रत्यहीं रात्रीं निजतेवेळीं खावी. वर पाणी पिऊं नये. याप्रमाणें बरेच दिवस घ्यावें. ( ४२. ) **भ्रमयुक्त पित्तावर**–आल्याचा रस दोन तोळे व गाईचें दूध सात तोळे एकत्र करून, निमें आटवावें व खडीसाखरेची पूड घालून निजतेवेळीं घ्यावें. ( ४३. ) **भ्रमयुक्तपित्तावर**–आल्याचा रस २ तोळे, आंवळ्याचा रस दोन तोळे, पिठीसाखर दोन तोळे आणि गाईचें तूप दोन तोळे, हीं सर्व एकत्र करून निमें आटेतों पर्यंत कढवून, नित्य प्रातःकाळीं व सायंकाळीं याप्रमाणें देत जावें. ( ४४. ) **वातभ्रमावर**–सुंठ अथवा ओंवा, यांचे चूर्णाचें भस्म द्यावें. ( तपकिरीप्रमाणें हळूच नाकांत ओढावें )

( ४५. ) **आमांशावर**—सुंठ, बडीशेप, खसखस व खारीक, हीं औषधें समभाग घेऊन,प्रत्येकाचे दोन भाग करावे. त्यांतील एकभाग तुपावर तळून, पुनः सर्व औषधें एकत्र करून,कुटून बारीक चूर्ण करावें व सर्व चूर्णाबरोबर पिठीसाखर मिश्र करून, हें मिश्रण प्रतिवेळीं १तोळा प्रमाणें दिवसांतून ३ वेळां घ्यावें. ( ४६. ) **आमवातावर**—सुंठ ४ भाग व बडीशेप१ भाग एकत्र करून, पैकीं निमें तुपांत तळून, मग सर्वांचें चूर्ण करावें. हें नित्य गुळांत कालवून सेवन करावें. ( ४७. ) **अरुचीवर**—आलें व सैंधव द्यावें. ( ४८.) **दंतशूलावर**—सुंठीची पूड एक भाग व तुरटी दोन भाग एकत्र करून, तें दिवसांतून २।३ वेळ दांतांस लावावें. ह्मणजे त्वरित शुद्ध राहतो. ( ४९. ) **सन्निपातज्वरांत तंद्रा ( मूर्च्छा ) येते त्यावर**—सुंठ, मिरे, पिंपळी यांचें चूर्ण नाकांत फुंकावें.(५०.) **दुर्जल ज्वरावर**—सुंठ व जवखार यांचें चूर्ण ऊन पाण्याशीं द्यावें. (५१.) **सर्व शूलांवर**—सुंठ, सज्जीखार व हिंग यांचें चूर्ण ऊन्ह पाण्याशीं द्यावें. ह्मणजे क्षणांत सर्व शूलांचा नाश होतो. ( ५२. ) **स्वर पडते त्यास**—सुंठीचे काढ्यांत हळद व गूळ घालून तो प्राशन करावा. (५३.) **अग्निमांद्य व कृमींवर**-सुंठ व वावडिंग यांचें चूर्ण मधांत द्यावें.

## २८. अशोक.

गु०-आशुपालो. हिं०-आशोक.क. बं०-आशोक,अशोक.लै०-अशोकभानु भक्ता०-अशोकं. ला०-Jonesia Asoca जोनो सिया, असोका.

हें झाड आंब्याच्या झाडाएवढें मोठें असतें. याचीं पानें कांहीं अंशीं आंब्याच्या पानापेक्षां लांब व कुरळीदार असून भरदार, सुशोभित असतात. याची छाया दाट असते.हें झाड शोभायमान असतें; ह्मणून हें बागांत व देवळांत लावतात. याचीं फुलें तांबूस रंगाचीं असतात. **अशोक**-मधुर, शीत, अस्थीला सांधणारा,प्रिय,सुगंधि,क्रिमिकारक,तुरट,उष्ण,कडु,शरीराची कांति करणारा,स्त्रियांच्या शोकाचा नाशक, ग्राहक, पित्तहर, व दाह, गुल्म, उदर शूल, आध्मान, विष, अर्श, व्रण, संपूर्ण तृषा, शोथ,अपची, रक्तरोग यांचा

नाश करितो. ( १. ) **रक्तप्रदरावर**-अशोकाच्या सालीचा दुधांत आणि पाण्यांत मिळून, दुग्धावशेष काढा करून, तो शीत झाल्यावर द्यावा; ह्मणजे तीव्र रक्तप्रदराचाही नाश होईल. ( २ ) **सर्वप्रदरांवर**-अशोकाची साल वाटून, तींत रसांजन घालून, तांदुळाचे धुणांत मध घालून द्यावी.

## २९. अष्टवर्ग.

**जीवक व ऋषभक**-हे हिमालयाच्या शिखरावर उत्पन्न होतात. हे दोन्ही कंद लसुणाच्या कंदाप्रमाणें असतात. यांचीं पानें बारीक असतात. जीवकाचा आकार कुंचासारखा आणि ऋषभकाचा आकार बैलाच्या शिंगासारखा असतो. हे दोन्हीं कंद बलवर्धक, थंड, वीर्य व कफवृद्धिकर, मधुर: आणि पित्त, दाह, रक्तदोष, कृशता व क्षय यांचा नाश करितात. **मेदा व महामेदा** हे दोन्हीं कंद, मोरंग वगैरे स्थलीं उत्पन्न होतात. जो कंद नखानें कापला जातो व ज्यांतून मेद-धातूचा जसा रस स्रवतो, त्याप्रमाणें जो सफेत कंद होतो, तो **मेदा. महामेदा** हा कंद सुकलेल्या आल्याप्रमाणें असतो. तो अगदीं सफेत रंगाचा असतो. या दोहोंचे वेल असतात. **मेदा व महामेदा** हे गुरु, मधुर, वीर्यवर्धक, स्तन्य ( स्तनांतील दूध वाढविणारे. ), कफवर्धक, शरीरांतील तत्वांची वृद्धि करणारे, शीतल; व पित्त, रक्तदोष, वात, ज्वर यांचा नाश करणारे आहेत. **काकोली व क्षीरकाकोली**-ज्या ठिकाणीं मेदा व महामेदा होतात, त्याच ठिकाणीं काकोली व क्षीरकाकोली यांची उत्पत्ति होते. काकोली व क्षीरकाकोली यांचा कंद आस्कंधाच्या कंदाप्रमाणें असतो. त्यांतून दूध स्रवतें. व त्याचा वास येतो. काकोलीचा वर्ण किंचित् काळा असतो व क्षीरकाकोलीचा पांढरा असतो. दोन्ही काकोल्या शीत, वीर्यवर्धक, मधुर, गुरु, शरीरांतील धातूंची वृद्धि करणाऱ्या आणि वायु, दाह, रक्तपित्त, शोष ज्वर, यांचा नाश करणाऱ्या आहेत. **वृद्धि व ऋद्धि**-ऋद्धि व वृद्धि हे दोन्हीं कंद कोरायामल देशांत उत्पन्न होतात. यांचे वेल असतात. या कंदास छिद्रें असून, यावर पांढरे केश असतात. **ऋद्धीचा** कंद गांठी-

सारखा असून, इचें फळ वामावर्त असतें. आणि वृद्धीचें फळ दक्षिणावर्त असतें. ऋद्धि ही बलवर्धक, त्रिदोषघ्न, वीर्यवर्धक, मधुर, गुरु, प्राणरक्षक, ऐश्वर्यकारक, आणि रक्तपित्तनाशक आहे. वृद्धी ही गर्भप्रद, शीत, पुष्टिदायक, मधुर, वीर्यवर्धक; आणि रक्तपित्त, क्षत ( व्रण ), कास, क्षय, यांची, नाशक आहे. हा अष्टवर्गप्रतिनिधि राजासही दुर्लभ आहे; ह्मणून वैद्यांनीं तत्समान गुणांच्या औषधी घ्याव्या. मेदा व महामेदा, यांच्या अभावीं शतावरी घ्यावी. जीवक व ऋषभक यांच्या अभावीं भुय-कोहाळा घ्यावा. काकोली व क्षीरकाकोली यांच्या अभावीं आस्कंद घ्यावा. ऋद्धि व वृद्धि यांच्या अभावीं डुकरकंद घ्यावा.

## ३०. असाणा.

**सं०आसन. कों०-हसाणी. गु०-आसन हिं०-असन. क०-हिरियहोन्नेयभरनु.**

हें झाड मोठें वाढतें. याचें लांकूड इमारतीकामास उपयोगीं आहे. असण्याचीं पानें मोठीं असून लांबट असतात. या झाडावर फळें बारीक येतात. अपक्व फळाचा रंग हिरवा असतो. नंतर पिंवळा होत जाऊन पिकल्यावर काळा होतो. हीं फळें रुचीस कडू आहेत. असाण्याची अंतर्साल लालरंगाची असते. **असाणा** हा भेदनीय आणि मूत्रसंग्रहणी, कुष्ठ यांचा नाशक आहे. ( १. ) **अतिसार व संग्रहणीवर**-असाण्याच्या सालीचें चूर्ण साखरेशीं द्यावें, अथवा पाण्यांत साल वाटून प्यावी.

## ३१. अहांळीव.

**सं० आहलिव. गु०-अशेळीयो. हिं. हालो. फा०हालम तुख्म तरतिज. अ०हबररशाद. करद्दा कम बजरुळ जिरजर. इं०**Common cress
**कामन् क्रेस. ला०** Lepidium Sativum

अहाळिवाचीं झाडें खानदेशामध्यें पाटाच्या अथवा नदीच्या कांठीं पेरतात. हीं झाडें लहान असतात. अहांळिवाचा रंग तांबूस असून, हें बारीक व चपटें असतें. हे उष्ण, कडू, पुष्टिदायक असें असून त्वचेचा दोष वायु व गुल्म यांचा नाश करणारें आहे. ( १. ) **अहांळिवाची खीर**-

प्रथम दूध उकळत ठेवून नंतर त्यांत अहाळीव टाकावें; व तें चांगलें मऊ होऊन, दूध इतर खिरीसारखें अळलें ह्मणजे त्यांत गूळ अथवा साखर घालावी; ह्मणजे तयार होते. ही खीर वायूचा नाश करून, कमरेस बळकटी, धातुपुष्टि करिते. ही बाळंतिणीस दूध अधिक यावें ह्मणून देतात. ( २. ) **वायूच्या योगानें जुलाब** होऊं लागल्यास अहांळिवाचें चूर्ण पिटीसाखरेशीं घ्यावें, ह्मणजे बंद होतात. ( ३. ) **अहांळिवाचा लेप**-त्वचेचा दोष अथवा रक्त सांचलें असल्यास किंवा वायूनें सांध्यांत कळा होत असल्यास, अहांळिव पाण्यांत कालवून लेप द्यावा, ह्मणजे त्याचा ओढा बसून बरें होतें. ( ४. ) **कटिशूळ व गृध्रसी वायु** यांवर-अहांळिवाची खीर करून तींत गूळ अथवा साखर घालून द्यावी. ( ५. ) **उचकीवर**-अहांळीव कुटून पाण्यांत भिजूं घालून नंतर तें कोळून द्यावें; ( ६. ) **अहांळिवाचे लाडू धातुपुष्टतेस.**-ओले नारळ किसून त्यांत नारळाच्या बेतानें गूळ व आहांळीव घालून गूळ मिळेपर्यंत त्याचा पाक करून, नंतर निवाल्यावर त्याचे लाडू बांधून ते खावे. **दुसरा प्रकार.**-१० तोळे अहांळीव घेऊन तुपांत परतावें, नंतर गव्हांचा रवा पक्का शेर घेऊन तोही तुपांत परतावा, उडदाच्या डाळीचें पीठ पक्का पावशेर घेऊन, तेंही तुपांत परतावें. मग तूप पक्का शेर घेऊन, तूप व साखरेचा पाक करून, त्यांत तें पीठ व बेदाणा, बदाम, चारोळ्या, पिस्ते, वेलची, जायफळ, जायपत्री, पिंपळमूळ, हीं टाकून वड्या किंवा लाडू करावे. वड्या करिताना अहांळीव खालीं घालून नंतर पाक त्यावर घालून मग वड्या किंवा लाडू करावे. हा पाक हिंवाळ्यांत खावा. हा चांगला पौष्टिक आहे.

## ३२. अळई.

हीं झाडें डोंगराळ प्रदेशांत फार होतात. हीं कोकणांत पुष्कळ आहेत. हें झाड सुमारें पुरुष दीडपुरुष उंच वाढतें. याचीं पानें फार मोठीं नसतात. या पानांचा आकार कांहींसा टाकळ्याच्या पानासारखा

असतो. अळईची साल फार थंड आहे. अळईस "ओंवी" असेंही ह्मण-तात. ( १ ) **कोणत्याही प्रकारची गांठ** किंवा **उठाणू** वगैरे बसण्यास–अळईची मुळी उगाळून तिचा लेप द्यावा ह्मणजे तीन दिवसांत गांठ बसून जाते. ( २. ) **मुखरोगावर.**–अळईच्या झाडाची साल तोंडांत धरावी, व जो द्रव येईल तो तोंडांत घोळवून थुंकावा. ( ३. ) **इंद्रियास आंतील बाजूनें चट्टे पडतात त्यांस.**–अळईच्या सालीचा रस २ तोळे काढून त्यांत जिरें व खडीसाखर घालून द्यावा. ( ४. ) **मधुमेहावर.**–अळईच्या सालीचा काढा करून नित्य रात्रौ निजते वेळीं घेत जावा. ( ५. ) **आंवरक्तयुक्त अतिसारावर.**– अळईची साल वांटून प्यावी. **दुसरा प्रकार.**–अळईच्या झाडास कोयत्यानें दुखवून त्यांतून जो रस येईल तो द्रोणांत धरून बाटलींत भरावा. नंतर हा रस नित्य साखरेंतून घ्यावा. अथवा याच्या सालीचा काढा करून खडीसाखर घालून घ्यावा.

## ३३. अळंबें.

**सं०**–भूछत्र. **गु०** फुग्य. **हिं०** छत्तोना, छाता, सांपकी छत्री. **बं०** कोडक-छाता, ब्यांगेरछाता. **क०** आळंबि, नाई छत्तरिगे. **इं०** Mushroom मशरूम्. **ला**. Fungi फंगाई.

ही मोठी चमत्कारिक वनस्पति आहे. या वनस्पतीच्या रचनेवरून ईश्वराचें पूर्ण चातुर्य दिसून येतें. अळंब्याचें छत्र उकिरड्यावर सडलेल्या पदार्थांवर, थाळलेल्या शेणावर व कित्येक ठिकाणीं चांगल्या जमिनींतही होतें. यांत सात आठ जाति आहेत, आणि त्यांतही दोन प्रकार आहेत. एक विषारी व दुसरें गोडें. विषारी अळंबें खाल्लें असतां मोठे अनर्थकारक परिमाण होतात. अंमल चढतो, पोट फुगतें, वांती होते व मन भ्रमिष्ट होतें, यास्तव माहितीवांचून तें खाऊं नये. गोडें अळंबही चांगलें पाचनीय पदार्थ नव्हे. तें पुष्कळ खाल्लें असतां लवकर पचन होत नाहीं. अळंब्यांत **प्रसिद्ध जाति** आहेत त्याः–चुडयें. चितळें, गवतें, कुबळें,

कुरडी, तेलंगी, भुयफोड, मोगराळे. कुत्रें हें एक हात उंच असून त्याच्या वरचें छत्र लहान असतें. चितळें हें साधारण. गवतें हें बारीक असतें. कुबळें हें बारीक बोटासारखें, करटी हें अगदीं लहान असतें; तेलंगी हें सर्वांहून उत्कृष्ट आहे, याच्या छत्राचा व्यास हात दीडहात देखील असतो. फुयफोड हें वाटोळें असून याचें छत्र होत नाहीं, हें कोसल्यासारखें फुगीर असतें. मोग्राळयाचे मोग्र्यासारखे किंचित् टोंकदार कळे असतात. अळंब्याचें बीं अति सूक्ष्म असतें. अळंब्याची भाजी चांगली होते. कित्येक लोक अळंब्यास मूर्खपणानें शिवत देखल नाहींत. अळंबीं शीत, बलकर भेदक, मधुर, त्रिदोषकारक, वृष्य, कफमद अशीं आहेत. कृष्णअळंबें-मधुर, उष्ण, गुरु आहे. पांढरें अळंबें-पाककाळीं गुरु आहे व लाल अल्प दोषकारक आहे. (१.) **लहान वांसरांस फोड** होतात, त्यांवर-भुय फोड ताकांत वांटून त्यांत २ गुंजापर्यंत हिंग कालवून द्यावें व औषध देतांच त्या वांसराच्या पाटीचा कणा जमिनीस लावावा. (२.) **देवी, गोंवर** पोटांत न पडण्यास-जेव्हां अळंब्याचे कळे असतात त्याच वेळीं ते काढून सुकवून ठेवावे. जेव्हां देवी किंवा गोंवराचा ताप मुलांस येतो तेव्हां हे कळे ऊन्ह पाण्यांत वांटून कपडछान करून द्यावे, ह्मणजे देवी पोटांत न पडतां अंगावर तरतरीत उठतात. (३.) **बेंबींत फोड** येतो त्यावर-सुकलेलें अळंबें व पर्जन्यकाळीं गुरांच्या शिंगास मातीच्या आश्रयानें जीं पाळें फुटतात तीं एकत्र करून त्यांचा लेप करावा. (४) **मूळव्याधीस धुरी**-सुकलेलीं अळंबीं, गुरांच्या शिंगाचीं पाळें व भांग यांची धुरी द्यावी.

## ३४. अळू.

सं-अलुक. गु०-अळू, अळवी. हिं०-आलु. वऱ्हाडी-धोपा. क. गेणसु. तै०-श्यामा कुर्रा. अ०-हुयां, कळकाश. इं- Great leaved caledium ग्रेट्‌ लीव्ह्ड केले डियम्. ला. Erum indicum एरम् इंडिकम्.

अळवाचे कंद असतात, त्यांपासून याची उत्पत्ति होते. अळवांत अनेक जाति आहेत. राजाळूं, धावआळू, काळेंआळूं, पानआळूं, रुखआळूं (वृक्षा-

वरीलआळूं. ), मार्डाआळूं, मुंडलें आळूं, गिमआळूं व रानआळूं ( तरी ) सर्वांत काळें अळूं उत्तम आहे. अळवाची भाजी सर्वत्र प्रसिद्ध आहे. कित्येक अळवांस मोठे कांदे होतात, व कित्येकांस बारीक मुंडल्या असतात, त्या उकडून किंवा भाजी करून खातात. अळवाचे साधारण गुण शीतळ, अग्निप्रदीपक, मलावष्टंभक, बलाची वृद्धि करणारें, तसेच स्तनांत दूध वाढविणारें असे आहेत. अळूंच्या सेवनानें मलमूत्र हीं पुष्कळ होतात. आणि कफ, वायु यांची वृद्धि होते; व रक्तपित्ताचा नाश होतो. या कंदाच्या अंगीं धातु वाढविण्याची शक्ति आहे. ( १. ) **फुरशाच्या विषावर**–आळवाचा पाला व मिरें वांटून खाण्यास द्यावीं, व भारंगीचा रस पोटांत द्यावा आणि डांकीस व डसलेले ठिकाणीं चोळावा. ( २. ) **खडकावरील कोळी डसल्यास**–झाडावरील राजाळूच्या मुळ्य भाजून वांटून त्यांची बोरा एवढी गोळी पोटांत द्यावी. उतार तूप ( ३. ) **नळवायु व तिडीक** यांस–आळवांच्या पाल्याचा रस द्यावा. दिवस ३. ( ४. ) **वायुगोळ्यास**–आळवाची देंटी पानासुद्धां शिजवून त्याचें पाणी, तूप घालून द्यावें. दिवस ३. ( ५. ) **पित्तास**–आळवाचे पाल्याचा रस जिऱ्याची पूड घालून द्यावा. ( ६. ) **स्तनांत दूध जास्त** वाढण्यास–अळवाची भाजी नित्य खावी; फार खाऊं नये. ( ७. ) **कृमीवर**–रान आळूचा कांदा भाजून त्याची राख पाण्यांत अगर मधांत द्यावी. ( ८. ) **फोड फुटण्यास**–आळवाची देंटी जाळून त्याची राख तेलांत लावावी.

## २५. आइन.

**सं० रक्तार्जुन. गु. साजडन. हिं० ऐन. क–कॆंपुमत्ति. तै. इरांमद्दी.**

ला. Terminatie glabra **टरमिनेलिया ग्लेब्रा.**

आइनाचे वृक्ष मोठमोठे होतात. या झाडाचें लांकूड मजबूत असतें. या लांकडाचीं गलबतें बांधतात व हें लांकूड इमारती कामासही उपयोगीं पडतें. आइनाचीं पानें लांबट असतात. आइनांत पांढरा व काळा अशा

दोन जाति आहेत. पांढऱ्या आइनाचें लाकूड पांढऱ्या रंगाचें असतें. आइनाची साल कोळी लोकांस जाळीं रंगविण्यास लागते. यास "सादडा" असेंही ह्मणतात. ( १. ) **आगंतुक जखमेवर**-पांढऱ्या आइनाच्या सालीची भुकणी करून ती जखमेवर लावावी ह्मणजे ती त्वरित भरते. ( २ ) **लहान बांसरांस दुधाच्या योगानें पोटांत दुधगा रोग होतो त्यास**-आइनाच्या कोंवळ्या तुवऱ्या खाऊं घालाव्या. ( ३. ) **अलवातावर**-आइनाच्या तुवऱ्या, बोरीचा पाला व आंवळकाठी हीं एकत्र वांटून त्याचा रस, तळहात व तळपाय यांस मर्दन करीत जावा. ( ४. ) **सूज फुटल्यास**-आइनाच्या सालीचा व काळ्या तुळशीचा रस काढावा, यास राप असें ह्मणतात. ह्यांत तांदुळाचा कोंडा घालून आंबील करून ती लावावी. ( ५. ) **पक्षाघातावर**-ऐनाची राख वर बांधावी ह्मणजे तो भाग उष्ण होऊन त्याचें जडत्व जातें. ( ६. ) **कफावर**-हीच राख मधांत द्यावी.

## ३६. आग्या.

**सं०**तीक्ष्णाभा. **गु०**आगियो. **हिं०**दादमारी. **क०** चुर्चांगिड. **ला०** Ammania vesicatoria **एमानिया वेसिकेटोरिया.**

आग्याचें झाड सुमारें हात दीडहात उंच वाढतें. याचीं पानें जाईच्या पानाएवढीं व आकारानेंही तशींच असतात. या झाडावर सफेत रंगाचीं लहान बोंडें येतात, हीं अंगास लागलीं तर अंगाची आग होते. नाचणी, हरीक वगैरे धान्याच्या शेतांत हीं झाडें फार झालीं तर तें सर्व शेत जळून जातें, इतकी या झाडाची आग आहे. यावरून यास " आग्या " हें नांव योग्य आहे. **आग्या**-बलकर, कडू, तिखट, विबंधनाशक, हृद्य, उष्ण, बस्तिशुद्धिकारकः व रक्तपित्त, अरोचक यांचा नाश करितो. ( १. ) **कोड्रूचे विषारावर**-आग्याच्या झाडाचें पाणी घालून रस काढून तो अर्धाशेरपर्यंत द्यावा. गुरांस देणें झाल्यास चार शेरपर्यंत द्यावा. झाडें सुकलेलीं असल्यास त्याची पूड करून पाण्यांत कालवून द्यावी.

( २. ) **ज्वरावर**-आग्याचीं झाडें, नागरमोथे व सुंठ यांचा काढा द्यावा. ( ३. ) **लुतीवर**-आग्याचीं सुकलेलीं पानें तोळा १, काजळीचीं सुकलेलीं पानें तोळा १, अघाड्याचीं पानें तोळा १ घेऊन त्यांची काळी राख करावी व ती करडीच्या तेलांत खलून लावीत जावी.

## ३७. आपटा.

**सं०-अश्मंतक. गु०-आशेत्री. कों०-सिद्ध. गु०-आशोंदरो. हिं०-सिरहटा, असिमिलौश. क०-अस्मर, आरि, आसु. ला०-**Gmelina arboria **मिलाईना आर्बोरिया.**

हें जंगली झाड आहे. याचीं पानें कांचनाच्या पानासारखीं असतात, परंतु हीं त्याच्या पानापेक्षां जाड व मोठीं असतात, यास लांबट शेंगा येतात. याचें लांकूड जाळण्याखेरीज फारसें उपयोगीं पडत नाहीं. याचीं पानें तंबाखूच्या विड्या करण्यास उपयोगीं पडतात. या निरर्थक व निर्लज्ज व्यसनापासून लोकांचें अतिशय नुकसान होत आहे; परंतु हा प्रकार सध्या मोठ्या प्रतिष्ठितपणाचा होऊन बसला आहे. हा संगतीचा परिणाम ! हें व्यसन ज्या दिवशीं आमच्या लोकांतून नाहींसें होईल तो सुदिन समजला पाहिजे. याच्या अंतरसालीचे बंदुकीचे तोडे होतात, ते, ही साल चांगली शिजवून मग वाळवून कुटून त्याचे करितात. याच्या अंतरसालीचे मजबूत व टिकाऊ असे दोरही होतात. याची शेंग बाळघुटींत उगाळून देतात. **आपटा**-तुरट, आंबट, शीतळ, ग्राहक असा आहे; आणि वात, पित्त, कफ, मेह, दाह, तृषा, विषरोग, वांति, पिशाचबाधा, गंडमाला, व्रण, विषमज्वर, कंठरोग, रक्तविकार, गळगंड, अतिसार यांचा नाश करितो. याच्या **शेंगा**-तुरट, शीतळ, ग्राहक, स्वादु, रूक्ष, गुरु, दोषद्रावक, मलरोधक, आध्मानकारक; व कफ, वायु यांचा नाश करितात. ( १. ) **वातगुल्म व शूळावर**-आपट्याच्या पाल्याच्या रसांत मिऱ्यांची पूड व तिळांचें तेल ७ थेंब घालून द्यावें. ( २. ) **परम्यावर**-आपट्याचा पाला रात्रीं पाण्यांत भिजत घालून ठेवावा; व त्याचा सकाळीं चार पैसेभार रस काढून त्यांत दोन पैसेभार खडी साखर

घालून द्यावा. ( ३. ) **प्रसूत लवकर होत नसल्यास**-एकाद्या लहान मुलास नग्न करून स्नान घालावें व त्याजकडून आपट्याच्या झाडाची साल, त्या झाडावर त्याची छाया पडूं न देतां दांतांनीं काढवावी. ती त्याणें तशीच तोंडांत धरून आणून, प्रसूत होणाऱ्या स्त्रियेच्या मस्तकावर थुंकावी म्हणजे प्रसूत होईल. (४.) **नाळगुदास**-आपट्याचा पाला, कारलीचा पाला, व माका हीं तिन्हीं समभाग घेऊन वांटून रस काढावा व त्यांत वारुळांतील कुडयाचें पाळ उगाळून तें पाजावें म्हणजे नाळगुद बरें होतें. ( ५. ) **खर पडते त्यावर**-आपट्याच्या कोंवळ्या डिऱ्यांचा रस व गाईचें दूध एकत्र करून, त्यांत खडीसाखर घालून तें द्यावें. ( ६. ) **ज्वरांत कपाळ दुखतें** त्यास-आपट्याचीं पानें वांटून लेप करावा.(७.) **द्वितीय मासांत गर्भ स्त्रवत असल्यास**-आपट्याची साल, काळे तीळ, मंजिष्ठ व शतावरी यांचें चूर्ण दुधांत द्यावें. (८.) **नाळगुदावर**-आपटा, कारली, भांबुर्डी व माका यांच्या पाल्याचा रस एकत्र काढून त्यांत मिरपूड व तूप घालून द्यावें. दि. ३. औषध लागल्यास उतार तूपभात द्यावा. तुपाशिवाय मुलांच्या पोटांतील डब्यावरही याचा उपयोग होतो. ( ९. ) **सुजेवर**-आपट्याच्या पानांचा कल्क दुधांत द्यावा.

## ३८. आंबटवेल.

**सं०**-अम्ला, अम्लपर्णी. **गु०**-खारखटुंबा. **हि०**-रामचना. **क०**-हेओलि. **ला०**-Vitispentaphylla. **विटसपेन्टाफायला.**

या वेलास देशावर कडमडवेली असें ह्मणतात. पावसाळ्यांत या वेलाच्या कंदास अंकुर फुटतात. हे वेल पांढरे असून किंचित् डांगराच्या कोंवळ्या अंकुरासारखे दिसतात. याचीं पानें बरींच जाड असतात. ही भाजी अतिशय आंबट आहे, तिचा आंबटपणा चिंचेपेक्षांही अधिक असतो. या सृष्टींतील सर्व उद्भिदपदार्थांच्या स्वादाचें वर्णन करणें कठीण; कारण, जो तो पदार्थ पहावा त्याचा स्वाद निराळा. हा सारक, अग्निदीपक आणि मदास हरण करणारा असा आहे.

## ३९. आंबटी.

**सं०-क्षुद्राम्ला. गु०-आंबोली, हिं०-अरूल, अम्लिलोना. क०-पुलंचु-णिसे, ता०-पुळियारे, तै०-पुलिंचिता. मला०-पुळियारळ. गों०-तल-तुप्पि. ला०-**Oxalis Corniculllato **ऑक्सेलिस् कार्निक्युलेटा.**

आंबटीचीं झाडें ओलसर मळे जमिनींत उन्हाळे दिवसांत रुजतात. या झाडास अंबोती असेंही ह्मणतात. हीं झाडें जमीनीबरोबर वेलासारखीं वाढतात. याचीं पानें चिंचेप्रमाणें आंबट लागतात. या झाडावर भाल्या-सारखीं टोंकदार व लांबट फळें येतात. (१.) अफूवर आंबटीच्या पानांचा रस द्यावा. (२.) **पित्तानें मस्तक जड** होतें त्यावर–आंब-टीचीं झाडें बारीक वांटून ती गोळी थंड पाण्यांत कालवून उकळी येई पर्यंत कढवावी. नंतर त्यांत थोडा पांढऱ्या कांद्याचा रस घालावा. थंड झाल्यावर मस्तकास लेप द्यावा, व हेंच औषध थोडें टाळवेवर चोळावें, यानें इतका त्वरित गुण येतो कीं, लावलेला लेप सुकतांच मस्तकाचें जडत्व उतरतें. (३.) **शीतपित्त** ह्म० आंगावर पित्ताचे लाल चट्टे उठतात त्यावर--आंबटीच्या पाल्याचा रस काढून त्यांत मिरपूड आणि पातळ केलेलें तूप घालून अंगास लावावें. (४.) **दाहावर**–आंबटीच्या पाल्याच्या रसाचा आंगास लेप करावा.

## ४०. आंबा.

**सं०-आम्र, गु०-आंबो. हिं०-आम. क०-माविनमारा, माविपहण्णु, तै०-मामिंडिचेट्टु. मवि, आम. ता०-मामरं. तु०-कक्कु. मला०-मावु. का०-आंबा. अ०-अबज. इं०-**Mango tree **म्यांगोट्री. ला०-**Mangifer indica **मॅंगीफेरा इंडिका.**

हा वृक्ष बहुतकरून उष्ण देशांत होतो. हिन्दुस्थानांत जितकी आंबराई आहे तितकी कोणत्याही देशांत नाहीं. आंब्याचा वृक्ष फारच मोठा होतो. रानांत व डोंगरांत हीं झाडें लावल्यावांचून उगवतात. त्यांस रायवळ आंबे असें ह्मणतात. बागाइती व उंचे जे आहेत त्यांस इरसाल आंबे असें ह्मणतात. आंब्याचें कलम करून जीं झाडें तयार करितात, त्यांस कलमी

आंबे ह्मणतात. कलमी आंब्याचें झाड लहान असतें. आंब्याच्या रूपावरून व गुणावरून आंब्यास अनेक नांवें मिळालीं आहेत. आंब्यांत मुख्य दोन जाति आहेत. कापा आणि रसाळ. ज्या फळाचा रस पातळ असतो तो रसाळ आणि कापून खाण्यास योग्य व रस घट्ट असतो तो कापा. आंब्याचें झाड शेकडों वर्षें वांचतें. आंब्याच्या वृक्षास वर्षांतून एक वेळ आंबे लागतात. आंब्याचें फळ खाण्यास अतिशय मधुर व गोड आहे. हें गरिबांपासून श्रीमंतापर्यंत सर्वांस खावयास मिळतें. गरिब लोक तर आंब्याच्या दिवसांत आंब्यावरच आपली उपजीविका करितात. उन्हाळ्यांत उन्हाच्या तापानें वाटसरू लोक थकले असतां आंबा खाऊन समाधान पावतात. आंब्याची छाया शीतळ असून फारच आराम देणारी आहे. थकून भागून आलेले लोक या वृक्षाच्या छायेखालीं बसून आराम पावतात. आंब्याचें लांकूड इमारतीकामास उपयोगीं पडतें. आंब्याच्या चिकाचा गोंद होऊन राळ होते. तीही पुष्कळ कामास येते. आंब्याच्या फळाचे पुष्कळ पदार्थ होतात. पाडाच्या आंब्याचा मुरंबा होतो; हा रक्तशुद्धिकर आहे. आंब्याचीं दोनचार प्रकारचीं लोणचीं होतात. कच्या आंब्याचा गूळ घालून गुळांबा करितात. कच्चे आंबे सोलून कापून वाळविले असतां आंबोशी होते. हिचा उपयोग, चिंचेच्या ठिकाणीं करितात. चिंचेपेक्षां ही पथ्यास व रुचीस प्रशस्त आहे. रंगारी लोकही रंगांत घालितात. तसेंच कच्या आंब्याचें गूळ अथवा साखर घालून सार फार चांगलें होतें, त्यास पन्हें असें ह्मणतात. आंबट आंब्याचें रायतें करितात. आंब्याचा बांठा भाजून फोडिला ह्मणजे जी कोय निघते ती खाण्यास चांगली लागते. कोंकणांत शेंकडो कुणबी उन्हाळ्यांत आंब्यावर व पावसाळ्यांत भाताचें पीक निघेपर्यंत या कोयांवर निर्वाह करितात. ते या कोयांतील गिराच्या पिठाच्या भाकरी करून खातात. या पिठाच्या पापड्या व घिरडींही होतात. आंब्याच्या बाठ्यांतील कोय, चांभार लोक चामड्यास काळा रंग देण्यासाठीं घांसतात. कोयांचें तेल निघतें तें औषधी आहे. ग्रीष्मऋतूंत लोकांस सुख व्हावें ह्मणून ईश्वरानें

या ऋतूंत अशीं रसभरित व मधुर फळें उत्पन्न केलीं आहेत, ह्यावरून ईश्वराची कृपा मनुष्यावर केवढी आहे याचा विचार करावा. **आंबा कोंवळा**–तुरट, उष्ण, सुगंधि, आंबट, क्षाराच्या योगानें रुचिकर, ग्राहक, रूक्ष व कांतिकर; पित्त, वात, कफ, रक्तदोष यांना उत्पन्न करणारा; व कंठरोग, प्रमेह, योनिदोष, व्रण व अतिसार यांचा नाशक आहे. **आढींत पिकलेला इरसाल आंबा**–मधुर, शीतल, जड, बलकर, धातुवर्धक, पुष्टिकर, त्रिदोषनाशक, कफकर, अग्निदीपक, वृष्य, मलस्तंभक, प्रिय, स्निग्ध, तुरट, सुखकारक, कांतिवर्धक असा आहे; आणि वायु, तृषा, दाह, पित्त, श्वास, श्रम, अरुचि यांचा नाश करतो. (१.) **आमातिसार** व **मोडशी** यांवर–आंब्याची कोय दह्यांत वांटून द्यावी. (२.) **जंतावर**–आंब्याच्या कोईचें चूर्ण द्यावें. (३.) **गर्भिणीच्या अतिसारावर**–आंब्याची कोय भाजून खावयास द्यावी, (४.) **रक्तार्श व प्रदर यांवर**–आंब्याच्या कोईचें चूर्ण मधांतून द्यावें. ह्मणजे रक्त, मूळव्याध व धुपणी यांचा नाश होतो. (५.) **घामोळ्यावर**–आंबा भाजून त्याचा बलक अंगांस लावावा. (६.) **थंडीनें पाय उकलतात त्यास**–आंब्याचा चीक घालावा. (७.) **रांजणवाडीस**–आंब्यांच्या डिखाचा अगर आंब्याचें पान तोडलें असतां जो चीक येतो तो लावावा. (८.) **तिडक्या प्रमेहावर**–आंब्याच्या अंतरसालीचा रस ४ तोळे व चुन्याची निवळी १ तोळा यांचें मिश्रण करून तें ताबडतोब द्यावें. असें ७ दिवस घ्यावें. (९.) **नाकांतून रक्त पडतें** त्यावर–आंब्याच्या कोईचा रस काढून तो नाकांत पिळावा. (१०.) **उष्ण ज्वरावर**–आंब्याचें मूळ शेंडीस अगर हातास बांधावें. (११.) **दाह व अतिसार** यांवर–आंब्याची अंतरसाल दह्यांत वाटून १ तोळापर्यंत द्यावी. (१२.) **रक्तातिसारांवर**–आंब्यांच्या पानांचा अंगरस २ तोळे, मध १ तोळा, तूप -॥- तोळा व दूध १ तोळा मिळवून द्यावें. (१३.) **अतिसारावर**–आंब्याच्या चिकापासून राळ होते तिचें चूर्ण, साखर व तूप यांशीं द्यावें. (१४.) **उपदंशावर**–आंब्याच्या सालीचा अंगरस, शेळी-

च्या दुधांत मिश्र करून द्यावा, ह्मणजे उपदंश व तत्संबंधी व्रण याची पीडा दूर होते. (१५.) **रक्तातिसारावर**-आंब्याची कोय ताकांत अ० तांदुळाचे धुणांत वांटून द्यावी. अ० आंब्याची साल दुधांत वाटून मध घालून द्यावी.(१६.)**रक्ताची उलटी होते त्यावर**-आंब्याच्या कोईचा रस काढून नाकांत पिळावा. (१७.) **मूळव्याधीवर**-आंब्याच्या वाळलेल्या पानांचें चूर्ण करून त्याचें धूम्रपान करावें.(१८.)**सर्व प्रकारच्या उष्णतेवर**-आंब्याची अंतरसाल, उंबराच्या मूळावरील साल व वडाच्या पारंब्या, यांचा रस काढून, त्यांत जिरें व खडीसाखर घालून द्यावें. (१९.) **रक्तातिसारावर**-आंब्याची अंतरसाल दुधांत वांटून मध घालून प्यावी. (२०) **कानांतील तिडकांस**-आंब्यातील मोख (आंठी) वांटून एरंडेलांत कढवून तें तेल गाळून कानांत घालावें.(२१.) मस्तकांत दारुण रोग होतो त्याबर आंब्याची कोय व बाळहिरडे यांचें चूर्ण दुधांत वांटून लेप करावा. (२२.) **संग्रहणीवर आम्रादियवागू**.-आंबा, आंबाडा, जांभूळ या तिन्हींची साल १६ तोळे घेऊन त्यांत २५६ तोळे पाणी घालून अर्धे पाणी राही तोंपर्यंत कढवून गाळून त्यांत १६ तोळे तांदूळ घालून पुनः कढवून घणसर करावें; त्याला आम्रादियवागु ह्मणतात. ही भक्षिली असतां संग्रहणी दूर होते. (२३.) **रक्तातिसारावर**-आंबा, जांभूळ व अर्जुनसादडा यांच्या साली ४ तोळे घेऊन त्यांचें वाळवून चूर्ण करावें. मग २४ तोळे पाणी मडक्यांत घालून त्यांत तें चूर्ण टाकून रात्रीस भिजत घालून प्रातःकाळीं तें पाणी गाळून त्यांत मध घालून प्यावें (२४.) **अंडवृद्धीवर**-आंब्याच्या झाडावरील गांठ गोमूत्रांत उगाळून लेप द्यावा व शेंकावें. (२५.) **धुपणीवर**-काप्या आंब्याचा सुकलेला मोहर तुपांत तळून साखर घालून गोळी करून द्यावी. (२६.) **स्वरभंगावर**-आंब्याच्या पानांचा काढा मध घालून द्यावा. (२७.) **मोडशीवर**-दोन अडीच तोळे बाळआंबे दह्यांत वांटून द्यावे.

# ४१. आलुबुखार:

**सं०-आरुक. गु०-आलु. हिं०-आलुबुखार. क०-आरुक. फा०-आलुस्या. अ०-इज्जासू. इं०-Cherryplum चेरीप्लम. का०-Prunus bakhariensis प्रुनस बाखेरियन्सिस.**

आलुबुखाराच्या झाडाची उंची सुमारें १० हात असते. हीं झाडें पर्शिया, अरबस्तान व ग्रीस येथें होतात. तेथून हीं फळें इकडे येतात. या फळाचा आकार दीर्घवर्तुळाकार असून तें एक बाजूस फुगीर असतें. त्याचा रंग बाहेरून तांबुस काळसर असतो व आंतील गर पिंवळा असतो. याची बी गुळगुळीत बदामाचे आकृतीप्रमाणें असते. हें फळ चांगलें परिपक्क झालें असतां याचा स्वाद आंबुस, गोड, रुचिकर व शरीरास हितावह आहे; परंतु हीं फळें पुष्कळ भक्षिलीं असतां पोटांत वायु, मुरडा होऊन संग्रहणी होते. **आलुबुखार**-ग्राहक, तुरट, हृद्य, शीत, जड, मलस्तंभक, ग्राही, भेदक, उष्ण आणि कफपित्त यांचा नाश करणारा, पाचक, आंबट, मधुर, मुखप्रिय, मुखाला स्वच्छ करणारा असा आहे. आणि मेह, गुल्म, अर्श, रक्तवात यांचा नाशक आहे. तो पिकला असतां मधुर, जड आहे; व कफ, पित्त यांना करणारा, उष्ण, रुचकर, धातुवर्धक, प्रिय; व मेह, अर्श, ज्वर, वायु यांचा नाश करितो. ( १. ) **मलबद्धतेवर**-आलुबुखार पाण्यांत उकळून तें पाणी द्यावें म्हणजे शौचास साफ होतें. ( २. ) **रेच होण्यास**-आलुबुखार मंदाग्नीवर चार तास शिजवून नंतर त्यास दोन वेताच्या चाळण्यामध्यें घालून दाबून त्यांतील पाणी काढून टाकावें, व शेष पाणी राहिलें असेल तें केंसाच्या चाळण्यांत दाबून काढावें. मग तो कुच्चा भांड्यांत घालून तें भांडे मंदाग्नीवर ठेवून परतून परतून वाळवावा. नंतर हा कुच्चा रेच होण्यासाठीं द्यावा ( ३. ) **शोषावर**-आलुबुखार तोंडांत धरावा.

## ४२. आंवळी.

सं. आमलकी. गु. आमळानुं झाड. हिं. आमल, अमरो. बं. आमलकी. क० तु० नल्लिमारा. तै० उसरकाय, वेल्ली. ता०-नेल्लिभारं. मला०-आमलकं, नेल्लि. फा. आम्लह्म. अ० अमृलज. इं०-Emblic myroblan एंब्लिकामिरोबेलन्. ला० Phylanthus amblica फिलँथस् एंब्लिका.

भरतखंडांत आंवळीचीं झाडें पुष्कळ ठिकाणीं होतात. हें झाड बरेंच उंच असतें. याचीं पानें शमीच्या पानांसारखीं असतात. आंवळीस कार्तिकमासीं आंवळे येतात. हें फळ साधारण सुपारीएवढें असतें. आंवळ्यांत दोन जाति आहेत. रान आंवळा व पांढरा आंवळा. आंवळ्याचा मुरंबा करितात. तो पित्तावर चांगला आहे. त्याचें लोणचें होतें. आंवळें सुकविलें ह्मणजे याची आंवळकटी होते. आंवळीच्या लांकडापासून पांढरा कात होतो. आंवळकाठी वाटून आंगास लावितात. आंवळकाठीचें रायतें होतें. वैद्यकांत ज्यास त्रिफळा ह्मणतात, त्यांत आंवळकाठी येते. हिरडा, बेहडा, आंवळकाठी ह्या तीन पदार्थांस त्रिफळा संज्ञा आहे. **आंवळा**–किंचित् तिखट, गोड, कडू, आंबट, तुरट, शीत; जरा व व्याधि यांचा नाशक, वृष्य, केश्य, सारक, हितकर, अरुचिनाशक आहे. आणि रक्तपित्त, प्रमेह, विष, ज्वर, वांति, आध्मान, बद्धविट्कता, सूज, शोप, तहान, रक्तविकार, त्रिदोष यांचा नाश करितो. आंवळकाटी–कडू, आंबट, तिखट, मधुर, तुरट, केश्य, भग्नसंधानकर, धातुवर्धक, नेत्र्य आहे; व अंगाला लाविली असतां कांतिकारक; व पित्त, कफ, घर्म, मेह, विष, त्रिदोष यांचा नाश करिते. ( १. ) **पांढऱ्या धुपणीवर**–आंवळकटीच्या बिया पाण्यांत वांटून त्यांत साखर व मध घालून तें घ्यावें. दिवस ३. ( २. ) **सर्व ज्वरावर आमलकादि चूर्ण व आमलकादि काढा**–आवळकठी, चित्रकमूळ, बाळहिरडे, पिंपळी व सैंधव हीं पांच औषधें समभाग घेऊन चूर्ण करून घेतलें असतां सारे ज्वर दूर होतात. तसेंच आंवळकठी, चित्रक, बाळहिरडे, पिंपळी यांचा काढा करून घेतला असतां त्यानेंही ज्वर दूर होतात.

( ३. ) **पित्तावर आंवळ्याचा मुरंबा**—एक शेर आंवळ्यांस सुयांनीं जवळ जवळ, बींपर्यंत भोंकें पडतील असे टोंचे मारून, चुन्याच्या निवळीचे पाण्यांत कांहीं वेळ टाकावे, ह्मणजे त्यांचा राप निघून जातो. मग आधण आलेल्या दोन शेर पाण्यांत टाकून थोडे उकळावे आणि बाहेर काढून वस्त्रानें पुसून कोरडे करावे. नंतर साखरेची किंवा खडी साखरेची चार तारी चांचणी करून तींत ते आंवळे बुडवून ठेवावे. हा मुरंबा चार पांच वर्षे चांगला टिकतो. हा भक्षण केल्यानें पित्त शमन होऊन पुष्टताही येते. ( ४. ) **आंवळ्याची कोचकई**—इरसाल आंवळ्यांस किंचित् वाफ देऊन त्यांचीं टरफळें बारीक वांटावीं. नंतर त्यांत जिरें, मिरें, पिंपळी, सुंठ, धणे, दालचिनी, सैंधव, पादेलोण, हिरडे, मीठ, हीं बारीक करून घालावीं व त्याच्या वड्या किंवा गोळ्या करून वाळवाव्या. या गोळ्या फार रुचिकर व पाचक आहेत. ( ५. ) **खरजेवर**—आंवळकठी जाळून ती तेलांत खलून लावावी. ( ६. ) **स्वरभेदावर**—गाईच्या दुधांत आंवळकठीचें चूर्ण द्यावें. (७.)**अशुद्ध अभ्रक भक्षणापासून होणाऱ्या विकारांवर**-आंवळ्यांचा रस अथवा आंवळे पाण्यांत टाकून तीन दिवस खावे, ह्मणजे सर्व विकार शांत होतात.( ८. ) **उचकी व श्वासावर**—आंवळ्याचा अंगरस, मध व पिंपळी घालून द्यावा. ( ९. ) **रक्तपितीवर**—आंवळकठी एरँडेलांत तळून साखरेबरोबर सांजसकाळ घेऊन ऊन पाण्याचा घोट घ्यावा.( १०. )**ओकारीवर**—आंवळकठीचें चूर्ण, चंदनाच्या गंधांत कालवून मधांत द्यावें. ( ११. ) **प्रमेहावर**—आंवळ्याचा रस काढून अ०आंवळकठीचा काढा करून त्यांत दोन मासे हळदीची पूड व मध घालून द्यावें. ( १२. ) **जरा न येण्यास**—आंवळकठी पाण्यांत वांटून आंगास लावून नंतर कांहीं वेळानें स्नान करीत जावें. याप्रमाणें नित्य क्रम ठेवल्यास वार्धक्य येणार नाहीं व केश पांढरे होणार नाहींत. ( १३. ) **डोळ्यांची आग शांत होण्यास**—आंवळकाठी आणि तीळ, रात्रीं पाण्यांत भिजूं घालून सकाळीं वाटून डोळ्यांस लावावें. नंतर एका तासानें स्नान करावें ह्मणजे डोळे हमेश थंड राहून आग होणार नाहीं.( १४.)**पित्ता-**

**वर आंवळकठीचें चूर्ण**-त्याचे द्विगुणित साखर व त्याचे दुप्पट साजूक तूप हीं एकत्र करून द्यावीं. ( १५. ) **ज्वरांत शोष पडतो त्यावर**-आंवळकठी आणि द्राक्षें वाटून तुपाशीं मिळवून तोंडास चोळावें व तोंडांत धरावें, ह्मणजे जिह्वा, तालु, गळा यांचा शोष शांत होतो (१६.) **ज्वरांत अरोचक झाल्यास**-आंवळकठी, द्राक्षें व साखर यांचा कल्क करून तो तोंडांत धरावयास द्यावा. ( १७. ) **मूत्रकृच्छ्र ह्म० उन्हाळीवर**-आंवळ्यांचा व उंसाचा रस एकत्र करून द्यावा. ( १८. ) **आम्लपित्तावर**-आंवळकठीचें चूर्ण, केळीच्या कांद्याचें रसांत द्यावें. ( १९. ) **नाकांतून रक्त पडतें त्यास**-तुपांत आंवळकठी भाजून कांजींत वाटावी व तिचा मस्तकास लेप करावा. ( २०. ) **योनिदाहावर**-आंवळ्याचा रस साखर घालून प्यावा. (२१.)**बहुमूत्रावर**-आंवळीच्या पाल्याचा रस पावशेर काढून त्यांत दारुहळद उगाळावी व त्यांत खडीसाखर टांक १ घालून तें प्यावें.(२२.)**प्रमेहावर**--आंवळीच्या पानांचा रस पावशेर व ताक पावशेर एकत्र करूज प्यावें. (२३.) **रेचक**--आंवळीच्या सालीच्या रसांत मिरपूड, पांच लवंगा व वेळा वांटून तो द्यावा. उतार तूपभात. (२४.) **अंगावर पित्त उठतें त्यास**-आंवळकठी रात्रीं गोमूत्रांत भिजत घालून ठेवावी व सकाळीं वांटून त्यांत नारळाचा अंगरस मिळवून अंगास चोळावा. ( २५. ) **शरीराची कांति चांगली होण्यास**-आंवळकठी अगर भाजलेले आवळे व गोडे तीळ एकत्र बारीक वाटून दररोज अंगास चोळावें व कांहीं वेळानें ऊन पाण्यानें स्नान करावें. (२६.) **वीर्यवृद्धीवर**-आंवळ्याचा रस व तूप एकत्र करून घ्यावें.(२७.)**जरा दूर होण्यास**-आंवळकठीचें चूर्ण व तिळाचें चूर्ण सममाग, एकत्र करून तूप व मध यांत २० दिवस मातःकाळीं घ्यावें. ( २८. ) **दिव्य देह होण्यास**-आंवळकठीचें चूर्ण व आस्कंदाचें चूर्ण सममाग, तूप व मध यांबरोबर शिशिरऋतूंत घ्यावें. ( २९. ) **नाकांतून रक्त पडतें त्यास**--आंवळकठी तुपांत भाजून कांजींत वांटून मस्तकास लेप करावा. ( ३०. ) **मस्तकशूलावर**-आंवळीचें चूर्ण, तूप व साखर एकवट करून मातःकाळीं

भक्षावें. ( ३१. ) **पित्तशूळावर**--आंवळीचें चूर्ण मधांत द्यावें. ( ३२.) **मूर्च्छेवर**--आंवळ्यांचा रस, तूप घालून द्यावा. ( ३३. ) **रक्तपित्तावर**--आंवळकठीचें चूर्ण, साखर व तूप यांत द्यावें. अथवा आंवळ्याचा किंवा हरीतकीचा मुरंबा द्यावा. ( ३४. ) **लघवी लाल होत असल्यास**--आंवळकठी मासे ३, संचळ मासे २, सैंधव तोळे २, यांचें चूर्ण करून तें शक्तीप्रमाणें पाव शेर पाण्यांतून घ्यावें. (३५.) **रक्तातिसारावर**--आंवळकठीच्या अंगरसांत मध, तूप व दूध मिळवून द्यावें. (३६.) **अम्लपित्तावर**--आंवळकठी एक तोळा रात्रौ भिजत घालावी.दुसरे दिवशीं सकाळीं त्यांत तीन मासे सुंठ व एक मासा जिरें घालून बारीक वाटून गोळी करावी. ती गोळी सात तोळे दुधांत कालवून त्यांत दोन तोळे खडीसाखर टाकून तें प्यावें. ( ३७. ) **मुलांच्या अतिसारावर**--आंवळकठी, चित्रक, बाळहिरडें, पिंपळी व पादेलोण यांचें चूर्ण करून तें नित्य सकळीं व रात्रौ निजते वेळीं ऊन पाण्याशीं शक्त्यनुरूप द्यावें. ( ३८. ) **पित्तविकारावर**--आंवळकठी १ तोळा, रात्रीं कल्हईच्या भांड्यांत भीजूं घालून सकाळीं वांटून गाईच्या सात तोळे दुधांत कालवून तें प्यावें; म्हणजे पित्तविकार दूर होऊन शक्ति वाढते. ( ३९.) **कामीण रोगावर**--आंवळकाठी, हळद व गेरू उगाळून त्यांचें अंजन करावें. ( ४०. ) **धातुपुष्टतेस**--आंवळकठी व गोखरू या प्रत्येकाचें चूर्ण दोन मासे आणि गुळवेलीचें सत्व १ मासा, हीं तूप--साखरेंत घालून रोज सकाळीं खावीं; म्हणजे धातुस्थानची उष्णता जाऊन ती पुष्ट होते. ( ४१. ) **पांढऱ्या धुपणीवर**--आंवळ्यांचा रस किंवा चूर्ण मधाशीं द्यावें.

## ४३. आशा.

हीं झाडें कोंकण व बंगाल या प्रांतांत पुष्कळ होतात. त्रावणकोर प्रांतांतील जुनाट झाडांच्या गर्भांतील लांकडापासून तामीळ लोक एक रंग तयार करितात. याच्या पानांचा रस फार कडू आहे. ( १. ) **मुलांच्या पोटदुखीवर व जंतावर**--यांच्या पानांचा रस एक चमचाभर घेऊन त्यांत थोडें केशर घालून तो ३ दिवस पाजावा; म्हणजे मलशुद्धी साफ होऊन मुलांस अन्न चांगलें जिरूं लागतें व तोंडावर लाली ही येते.

# ४४: आस्कंध.

**सं. अश्वगंधा.गु०आसंध. हिं असगंध. देश० ढोरगुंज. बं०-अश्वगंधा.क०-अंगर बेरु, हिरेबेरु. आभाकिरे हिरेमद्दिनबेरु. तै०-पिल्लीआंड्रा, पेन्नेरु, अश्वगंधी. ता०-अश्वगंडि. मला०-अमुकिरं, पिवरे. फा०-बेहेमनबररी. इं०-**Winbe cherry **पिंटर चेरी.ला०**Physalis somnifere **फायसेलिस सोम्निफेरा.**

यास 'आसंध' 'अजगंध' असेंही ह्मणतात. देशावर यास 'ढोरगुंज' असें ह्मणतात, हें झाड खानदेश, नासिक, वऱ्हाड व घाटावर बहुतेक ठिकाणीं आढळतें. याची उंची सुमारें दोन हात भरते. हें झाड राखून ठेवल्यास ४।५ वर्षे राहतें. याचीं पानें आकारानें कोरांठ्यासारखीं असून त्यांपेक्षां मोठीं असतात. या झाडावर हरभऱ्याएवढीं गुंजेप्रमाणें लाल फळें येतात. यांत रिंगणीच्या फळाप्रमाणें बीं असतें. याच्या मुळांस आस्कंध असें ह्मणतात. आस्कंधाचा पाक करितात, तो उत्तम पुष्टिकारक आहे. **आस्कंध**—रसायन,तुरट, धातुवृद्धिकर, किंचित् तिखट,बलकर, कांतिकारक, मधुगंध, शरीराला पुष्टी देणारा, वृष्य, उष्ण, लघु; व वात, क्षय, दमा, खोकला, व्रण, श्वेतकुष्ठ, कफ, विष, कृमि, सूज, क्षतक्षय, कंडू यांचा नाश करितो. ( १. ) **वीर्यवृद्धीवर**—आस्कंधाचें चूर्ण, तूप व मध विषम भागानें घेऊन, त्यांतून सायंकाळीं घ्यावें व वर दूध प्यावें(२.) **गर्भिणीस पुष्टिकर योग**—आस्कंधाचा काढा करून द्यावा ह्मणजे गर्भिणीची पुष्टि होते व बालक सशक्त उपजतें. ( ३. ) **जरा दूर होण्यास**—आस्कंधाचें चूर्ण दूधांत द्यावें, ( ४. ) **लहान मुलांस शक्ती येण्यास**—आस्कंधाचें चूर्ण दुधांत द्यावें अथवा आस्कंध १ भाग, दूध ८ भाग,यांत तूप घालून पचन करावें; तें बालकाला दिलें असतां बळ वाढवितें. ( ५. ) **दृष्टि स्वच्छ होण्यास**—आस्कंधाचें चूर्ण, आंवळ्याचा रस व ज्येष्ठमधाचें चूर्ण यांशीं द्यावें. ( ६. ) **सर्व रोग दूर होण्यास**—आस्कंधाचें चूर्ण १ तोळा, गुळवेलीचें चूर्ण १ तोळा अथवा गुळवेलीचें सत्व १ मासा, मधाशीं द्यावें. ( ७. )**त्वचागत रोगास**—आस्कंधाचें चूर्ण तेलांत अंगांस लावावें. ( ८. ) **गर्भधारणास**—आस्कंधाचा काढा दूध घालून आटवावा व त्यांत तूप घालून तें ऋतुस्नात स्त्रीला प्रकाशनार्थ द्यावें. ( ९. ) **प्रदर**

**व धातुविकारांवर**–आस्कंधाचें चूर्ण ३ मासे व खडीसाखर १ तोळा हीं सकाळीं गाईचे दुधांत टाकून द्यावीं. याप्रमाणें सायंकाळींही द्यावें. ह्मणजे वरील विकार दूर होऊन धातुवृद्धि होते व शक्तिही येते. ( १० ) **वीर्यवृद्धी व धातुस्तंभनास**–आस्कंध तोळे १० व वरधारा तोळे १० हीं दोन्हीं औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें; आणि तुपाच्या राबलेल्या मडक्यांत तें भरावें. नंतर त्यांतील चूर्ण १ तोळा घेऊन गाईच्या निरशा दुधांत टाकून घ्यावें. ( ११. ) **धातुक्षयावर**–आस्कंध, साखर, तूप, मध, पिंपळी हीं एकत्र करून घ्यावीं. पथ्य दूधभात. ( १२. ) **स्तनांत दूध येण्यास**–आस्कंध, भुई कोहोळा व ज्येष्ठमध यांचा काढा, गाईचें दूध घालून द्यावा. ( १३. ) **सूज, गलग्रंथि** यांवर, व्रण पिकण्यास आणि फुटण्यास––आस्कंधाचें ओलें मूळ गोमूत्रांत वांटून लेप द्यावा. अथवा पाण्यांत वांटून गरम करून लेप द्यावा. ( १४. ) **वायूस**–गुळांत आस्कंधाचें चूर्ण घालून गोळी करून द्यावें. ( १५ ) **गुरांस विष घातल्यास**––आस्कंधाचें ओलें मूळ ताकांत वांटून पाजावें. ( १६. ) **ऊरुस्तंभावर**–आस्कंध वांटून ऊन करून लेप द्यावा. ( १७. ) **वायूस**–आस्कंध व शतावरी यांचें चूर्ण, मध, तूप यांशीं द्यावें. ( १८. ) **अर्धशिशीस**––आस्कंधाचें चूर्ण ओढावें. ( १९. ) **नारूवर**––आस्कंध तेलाशीं किंवा ताकाशीं वाटून लेप द्यावा. ( २०. ) **कटिशूळ** ह्मणजे कंबर **दुखते त्यावर**–आस्कंध व खडीसाखर यांचें चूर्ण तुपाशीं खावें. (२१) **दुखवलेल्या बैलास**–आस्कंधाच्या ओल्या मुळया चाराव्या ह्मणजे बैल बरा होतो.

## ४५: इंद्रावणी.

**सं. इंद्रवारुणी. गु. इंदरवरणी. हिं. इंद्रायन. बं. राखालशशा. क. हामेक्क. तै. एतिपुछा.. फा. खुर्पजातलख. अ. हंजल. इं०**
Colocynth **कोलोसिंथ. ला.** Citruleus colocynthis
**सिट्रुलस्कोलोसिंथिस्.**

हीस "कडू इंद्रावण" असेंही ह्मणतात. इंद्रावणीचे वेल असतात. या वेलाचीं पानें थेट कलिंगडाच्या पानासारखीं असून, त्यापेक्षां बारीक अ-

सतात. पिकलेल्या फळाचा रंग पिंवळा असतो. यांत दोन भेद आहेत. जें फळ सुमारें आंब्या एवढें असतें, त्यास घोडइंद्रावण ह्मणतात. दुसरे जातीचें फळ निंबां एवढे असतें, हीं फळें अतिशय कडू आहेत. देशावर इंद्रावणाचे वेल पुष्कळ होतात. इंद्रावण हें तीव्ररेचक आहे. **इंद्रावणी**–पाककाळीं तिखट, कडू, शीत, सारक, उष्णवीर्य व लघु आहे, व गुल्म, पित्त, उदर, कफ, कृमि, कुष्ठ, ज्वर, व्रण, श्वास, कास, ग्रंथिमेह, मूढगर्भ, कावीळ, प्लीहा, शुष्कगर्भ, गलगंड, विष, आनाहवायु, अपची, आमदोष, दूष्योत्तर सर्व उदरें, पांडु, कंठरोग, श्लीपद यांचा नाश करिते. ही कंवडळाहून गुणांनीं अधिक आहे. ( १. ) **सर्पदंशावर**–इंद्रावणीचें मूळ विड्यांत द्यावें. ( २ ) **खोकल्यावर**–इंद्रावणांत मिरीं भरून तीं सावलींत सुकवावीं व त्यांतील नित्य सात मिरीं मधपिंपळीशीं सेवन करावीं. ( ३. ) **दंतकृमींवर**–इंद्रावणाचें पिकलेलें फळ तापलेल्या तव्यावर टाकून, त्याचा धूर दांतांस द्यावा ह्मणजे दांतांतील किडे पडतात. ( ४.) **पोटांतील डब्यावर**–इंद्रावणाचें फळ ह्मशीच्या मुतांत उगाळून थोडेसें पाजावें अथवा ह्मशीच्या मूत्रांत शिजवून त्या मूत्रासुद्धां खलून त्यांतून एक वाल, व पापडखार एक गुंज हीं दोन्हीं औषधें सात दिवस मधांत द्यावीं. ( ५. ) **विटाळ येण्यास**--कडू इंद्रावणीचें मूळ योनींत ठेवावें, अथवा हिचीं फळें लोण्याशी खावीं. ( ६. ) **स्तनरोगावर**–कडु इंद्रावणीचें मूळ उगाळून लेप करावा. ( ७. ) **शूळावर**–इंद्रावणीचें मूळ पाण्यांत उगाळून त्यांत सुंठ, मिरीं व पिंपळी एकेक मासा घालून घ्यावें. (८.) **संधिवातावर**--इंद्रावणीचें मूळ, पिंपळी व यांचे ४ पट गूळ, हीं एकत्र करून तें एक तोळा रोज भक्षीत जावें. ( ९. ) **अंडवृद्धीवर**--इंद्रावणीचें मूळ एरंडेलांत उगाळून गाईच्या दुधाशीं मिश्र करून ३ दिवस घ्यावें. ( १० ) **गांठ** अथवा **फोड** याचा **दाह** होत असल्यास–इंद्रावणाचें फळ व मुळी थंड पाण्यांत एकत्र करून उगाळून वरचेवर लेप करीत जावा. ( ११ ) **नखविषावर**–इंद्रावणीचें मूळ व फळ, व काजऱ्याची बी, हीं गोमूत्रांत उगाळून लेप करावा. ( १२. )

**योनिशूळावर**--इंद्रावणीचें मूळ शेळीच्या तुपांत किंवा दुधांत उगाळून लेप द्यावा, व पोटांतहीं घ्यावें. ( १३. ) **मुलांच्या पोटांत भार झाला** असल्यास--इंद्रावणीचें मूळ उगाळून पोटावर लेप द्यावा; व समुद्रफळ गाईच्या दुधांत उगाळून शक्तीप्रमाणें द्यावें; ह्यणजे वमन होऊन मलद्वारानें सर्व भार निघून जातो. (१४.) **गंडमाळेवर**--इंद्रावणीच्या मूळाची साल व कडू शेवग्याची साल, समभाग एकत्र कुटून, ती भुकटी गुडगुडींत ओढावी. ( १५. ) **ढांस व उमासा** यांवर--इंद्रावणीचें फळ पोखरून, त्यांत अर्धतोळा बाळहिरड्याची भुकी दहा दिवस भरून ठेवावीं. त्याचें, अकरावे दिवसापासून एक वाल चूर्ण मधांत घ्यावें. ( १६.) **शीघ्रप्रसूतीस**--इंद्रावणीचें मूळ केशास बांधावें. ( १७. ) **रक्तगुल्मावर**--रिठ्याचे पाण्यांत इंद्रावणीचें मूळ उगाळून द्यावें. अथवा इंद्रावणीचें मूळ योनींत ठेवावें. ( १८. ) **पाठें** व सर्व प्रकारचे **फोडांवर**--कडू इंद्रावणीचें मूळ उगाळून लेप करावा.

## ४६. इफळ.

समुद्राच्या खाडींत ज्या ठिकाणीं अतिशय चिखल आणि जें ठिकाण भरतीच्या वेळीं अगदीं बुडून जातें, त्या ठिकाणीं देखील मोठीं झाडें होतात. तीं तीन चार मतीचीं असतात. त्यांत कांजळ, इफळ हीं मात्र लोकांस माहीत आहेत. इफळीचें झाड, सहा सात हातापेक्षां बहुधा उंच होत नाहीं, आणि त्याचा विस्तार बराच होतो. त्याच्या बहुतेक डाहळ्या समुद्रांत बुडालेल्या असतात. जरी याचें रोप गोड्या जमिनीवर लावून, त्याला पाणी शिंपडलें व त्याची बहुत बर्दास्त ठेविली, तरी तें जगत नाहीं. या झाडाचा पाला गुरांस खावयास उपयोगीं पडतो व लांकडें सर्पणाच्या उपयोगीं पडतात. हीं लांकडें फार चिवट व कठीण असतात. तीं जाळलीं असतां त्यांपासून एक प्रकारचा क्षार उत्पन्न होतो. तो परीट लोकांस वस्त्रें धुवावयास उपयोगीं पडतो. तसाच बायकांसही केश स्वच्छ करावयास उपयोगीं पडतो.

# ४७. इसबगोल.

**सं०-स्निग्धजीर. गु०-उथमुं जीरुं. हिं०-ईसबगोल. क०-इसबगोलु. तै०-इसपगुल. ता०-इसप्पुकोलविरै. फा०-इस्पगुल. अ०-बाझरेकातून. इं०-**Isphagul seed **इस्फागुलसीड. ला०-**Plantags Isphagula **प्लँटेगो इस्फागुल.**

इसबगोलाची उत्पत्ति मिसरदेश व पर्शिया येथें होते. तेथून हें इकडे येतें. हें बीं आकारानें पिसूसारखें आहे. याच्या झाडाची उंची एक हात असते, व पानें बारीक असून लांब लांब असतात. या झाडावर गव्हांसारख्या ओंब्या येतात, त्यांत हें बीं असतें. यांत तीन जाति आहेत. पांढरें, तांबडें व काळें. पैकीं काळ्याची औषधांत योजना करीत नाहींत. पांढरें सर्वांत उत्तम आहे. इसबगोलाची बारीक पूड केलेली मनुष्यानें भक्षिली असतां शौच बंद होऊन मरतें या करितां अशी पूड न देण्याविषयीं जपावें. इसबगोलाचें बीं पाण्यांत घालून खूप चोळलें असतां तळाशीं जाऊन बसतें. ( १. ) **सोमलाच्या विषावर**-इसबगोलाचा लुआब काढून ( पाण्यांत भिजू घालून कोळून गाळून घेऊन ) त्यांत बेदाणा, दहीं व गुलाबाचें पाणी हीं मिश्र करून प्यावीं; ह्मणजे विष उतरतें. ( २. ) **उष्णतेपासून तृषा लागते ती जाण्यास**-इसबगोल पाण्यांत घालून तें पाणी गाळून प्यावें. हें पाणी पौष्टिकही आहे. ( ३. ) **ज्वरातिसार, रक्तातिसार, जीर्णातिसार, रक्तार्श, रक्तस्राव, ज्वर, प्रमेह व दाह** यांवर-दोन पासून चार तोळे पर्यंत इसबगोल, रात्रीं पाण्यांत भिजत घालावें. सकाळीं हातानें चुरून त्यांत २ तोळे खडीसाखर घालून घ्यावें; ह्मणजे वरील सर्व रोग दूर होतात. ( ४. ) **शौच बंद झाला तर**-चार मासे इसबगोल सात मासे पाण्यांत भिजत घालून तें पाणी गाळून घेऊन, त्यांत बदामाचें तेल व साखर घालून घ्यावें; म्हणजे कांहीं वेळानें रेच होऊन कोठा शुद्ध होतो. ( ५ ) **मुलांच्या रक्तसंग्रहणीवर**-इसबगोल व खडीसाखर चावून खाण्यास द्यावी. ( ६. ) **धातुपुष्टतेस**-इसबगोल २ भाग, एलची-

दाणे १ भाग व खडीसाखर ३ भाग, रात्रौ पाण्यांत भिजत घालून सकाळीं तें कोळून गाळून प्यावें, किंवा याची फकी घेऊन वर गाईच्या दुधाचे एक दोन घोट घ्यावे. ( ७. ) **आमांशावर**—इसबगोल १ तोळा व खडी साखर १ तोळा एकत्र करून चाऊन खावें. याप्रमाणें दिवसांतून दोन चार वेळ घ्यावें. ( ८. ) **ज्वरातिसारावर**—इसबगोलाचा काढा द्यावा.

## ४८. इसेस.

**सं० श्रीवेष्ट. गु० हिं० विशेषधूप. क० श्रीवेष्ट. इं०** Gumcopoal Sandarack **गमूकोपल सँन्डारॉक. ला०** Trachilobium Hornimannianum. **ट्रेकिलोबियम् हार्निमेनिएनम्.**

इसेसाचे वृक्ष हिमालयपर्वतांत पुष्कळ आहेत. ह्या झाडाच्या निरनिराळ्या जातींपासून जो चीक निघतो, त्याला धूप, इसेस, लोबान, ऊद असें ह्मणतात. त्याच्या दोन तीन जाति आहेत. ह्या देशांत बुशेर येथून हा डीक येतो. इसेस, औषधासाठीं व धूपासाठीं उपयोगीं पडतो. इसेसाचीं झाडें अरबस्तानांत व आफ्रिकेच्या पूर्वकिनाऱ्यावर पुष्कळ आहेत. तिकडूनही हा इसेस इकडे येतो. इसेस हा व्रण शोधन करणारा आहे. यास " विशेष धूप " असेंही ह्मणतात. इसेस—तिखट, कडू, स्निग्ध, तुरट, मधुर, सारक, उष्ण, व्रणरोपण; व पित्त, कफ, रक्तदोष, वायु, योनिदोष, ग्रहपीडा, मस्तकशूळ, नेत्ररोग, कंठरोग, व्रण, राक्षसपीडा, पीनस, अजीर्ण, आध्मान वायु, दुर्गंध, घाम, कंडु, विष, वातरक्त, विसर्प, कुष्ठ व कास यांचा नाश करितो. ( १. ) **व्रणावर मलम**—इसेस, तिळांचें तेल व मेण, हीं अग्नीवर वितळून पातळ झालीं ह्मणजे तें मिश्रण गाळून ठेवावें व व्रणावर लावावें.

## ४९. ईडनिंबू.

**सं० जंबीर. को० चोरनिंबू. गु० दोडिंगालिंबू. हिं०—गंभिरी. बं०—गोंडालिंबू. क०—कंचिले, दोड्डुलीकायी, काडलिंबे. मला०—कट्टुकुरुन्तु. ते०—जंभिर, अडविनि. ता०—कट्टेलुमिच्चे. तु० केपेरिपुळी. ला०—**Atalantia monophylla **अटलान्टिया मोनोफायला.**

ही एक निंबाचीच जात आहे. हिंदुस्थानच्या सर्व प्रदेशांत हें झाड आढळतें. हें फळ नारिंग वगैरे निंबाहून मोठें असतें. याची साल खर-

बरीत व तीवर टेंगळें आलेली अशी असते. पिकल्यावर साल
रंग स्वच्छ पिंवळा होतो व त्यांस वासही उत्तम येतो. यांत लहा
मोठी अशा दोन जाति आहेत. त्यांचीं पानें व फुलें एकसारखीं
सतात. परंतु जी लहान जात आहे, तिच्या फळाची साल कांहीं पा
असते, व जी मोठी आहे तिची साल जाड असते. याचें उत्तम त
स्वादिष्ठ लोणचें होतें. याच्या रसाचें " लेमोनेड " करितात. **ईडनि**
आंबट, तुरट, कडू, सारक, उष्ण; व कफ, पित्त यांचें नाशक अ
( १. ) **मोरचूताच्या विषावर**–ईडनिंबाचा रस शर्करायुक्त घ्या
( २. ) **अम्लपित्तावर**–सायंकाळी लघु ईडनिंबाचा रस प्यावा.

## ५०. उटकटारी.

**सं० उत्कटा. गु० उटकटो. हिं० उटकटावा. क० ब्रह्मदंडी, इं०** Thistle **थिस्टल. ला०** Tricholapis glaberrina **ट्रिकोलेपिस् ग्लेबारिना,** Echinops echinatus **एकिनोपस् एकिनटस्.**

हिला उताटी व कांटेचुबूक असेंही म्हणतात. हिंदुस्थानी भा
हीस उडिंगण व श्वेत घुघुची असें म्हणतात. ही वनस्पति हिं
स्थानांतील बहुतेक प्रांतांत होते. या झाडाची उंची सुमारें हात दोन ह
असते. याचें फळ वाटोळें असून त्यावर लांब लांब कांटे असतात व
पांढरा असतो. हिचीं पानें किंचित् कोपरे कातरल्या सारखीं असून, त्यां
पृष्ठभागीं व नोकेवर सफेत रंगाचे कांटे असतात. उन्हाळ्यांत हीं झ
सुकून गेलीं ह्मणजे पुनः पावसाळ्यांत त्याच जाग्यावर झाडें उगवता
या वनस्पतीचें मूळ व बीज हें मोठें औषधि आहे. हीस " ब्रह्मदंडी
असेंही ह्मणतात. **उटकटारी**–रुचिदायक, उष्ण, कडू, वृष्य अ
आहे. व मूत्रकृच्छ्र, पित्त, वायु, मेह, तृषा, हृद्रोग, विस्फोट यांचा न
करिते. हिचें बीज-शीतळ, वृष्य, तृप्तिकर व मधुर आहे. ( १. ) **मुलां
डांग्या खोकला होतो** त्यास–उटकटारीची मुळी, शस्त्र न लावि
शनिवारीं अगर अदितवारीं काढून मुलांच्या गळ्यांत बांधावी. ( २
**प्रमेह, मूत्रकृच्छ्र व वीर्यवृद्धि यांवर**–उटकारीच्या मुळीची स

वाळवून, कुटून वस्त्रगाळ चूर्ण करून ठेवावें, व रात्रीं मोगलीबे- तोळा व खडीसाखर २ तोळे, मिळून पावशेर पाण्यांत भिजत ातःकाळीं त्याचा बलक वस्त्रानें गाळून काढावा. नंतर त्यांत त्या सहा मासे चूर्ण घालून घेत जावें, ह्मणजे फार दिवसांचा प्रमेह, च्छ्र, धातु मूत्राबरोबर जात असल्यास बंद करते, व वीर्यवृद्धि, ही करिते. (३.) **सुखप्रसव होण्यास**—उटकटारीचें मूळ केशास ावें; बाळंत होतांच सोडून टाकावें. (४.) **सर्प व विंचू यांचे विषा- वर**—उटकटारीचें मूळ उगाळून लेप करावा व तें पोटांतही द्यावें. ५.) **धातुपुष्टतेस**—उटकटारीचें मूळ, गोखरू व कवचबीज यांचा ंत पाक करून सेवन करावा; अ० उटकटारीच्या मुळाचें चूर्ण दुधांत ून सेवन केलें असतां उत्कृष्ट पौरुष येतें. (६.) **खोकल्यावर**— कटारीचें मूळ वांटून प्यावें अगर मूळाचें चूर्ण मधांत द्यावें.

## ५१. उंडण.

**सं० पुन्नाग. गु० हिं० पुन्नाग. बं० पुन्नाग. ता० पुने, पुन्नागं. तै० नमेरु, पोन्ना. क० खेसुरिगे, नमेरुमारा. तु० पोन्नेडा मारा, मल्ला० पोन्नाक. इं०** Alexadrian Laurel **अलेक्झांडियन् लारल. ला०** Ochro-carpus logifolium **ओक्रोकार्पस् लॉजिफोलियम्.**

उंडणीचीं झाडें कोंकणप्रांतांत पुष्कळ आहेत. हिचीं पानें सुरंगीच्या ांसारखीं असतात, परंतु त्यापेक्षां कांहींशीं मोठीं असतात. पानांची ची बाजू गुळगुळीत व स्वच्छ असते. या पानांच्या पत्रावळी करि- ा. उंडणीचें फूल पांढरें असून मधुर व सुवासिक असतें. या झाडास ारीएवढीं गोल फळें येतात. त्यांवर कठीण साल असते. या फळांचें काढितात, तें जाळावयास एरंडेलापेक्षां चांगलें असतें. हें कडू अ- . यास उंडेल ह्मणतात. उंडणीचें लांकूड इमारतीस व फतेमाऱ्यांस ाचें उपयोगीं पडतें. या झाडाच्या मुळीपासून राळेसारखा गोंद उत्पन्न ो. **उंडण**— मधुर, शीतळ, सुगंधि, रक्तदोषनाशक, देवप्रसादकारक,

व रक्तदोष, रक्तपित्त, कफ, पित्त, भूतबाधा यांचा नाश करिते. हिचीं फुलें-वृष्य असून, वातशूळ व कफदोष यांचा नाश करितात. ( १. ) **पाय किंवा गुडघा मुरगळल्यास**-उंडणीची साल बारीक कुटून ऊन करून पेंड बांधावा. (२.) **उठाणूस**-उंडणीचे फळाचा गर उगाळून त्यांत पिंजर घालून वर लावावा म्हणजे सुख होईल. ( ३. ) **खरजेवर**-उंडणीचें तेल लावावें. ( ४. ) **खवड्यास**-उंडणीचें तेल व कडू कवठीचें तेल, हीं एकत्र करून पांच चार वेळ लावावीं. लहान मुलांस उष्णतेपासून डोळ्यांत जे फोड उठतात त्यावरही हें औषध लावावें. ( ५. ) **अंड-वृद्धिस**-उंडणीच्या झाडाची अंतरसाल बारीक कुटून गरम करून वाढलेले शिरेवर सतत ८ । १० दिवस पट्टा बांधावा. ( ६. ) **मूळव्याधीवर** गुरगुडींत उंडणीचीं फुलें घालून धूम्रपान करावें; ह्मणजे बहुत दिवसांचाही अर्शरोग दूर होतो.

## ५२. उडीद.

**सं०-माष. गु०-अडद. हिं०-उरद. क०-उदु. तै०-मिनुउलु, मिनुमुलु. ता०-उलंदु. मला०-उलुन्नु. तु०-उर्दु. फा०-माष. अ०-माषा. इं०**-Kidney bean. **किडनेबीन्. ला०**-Phaseolus rediatus. **फसिओलस रेडिएटस्.**

**ला०**-Phascolus rediatus.
**फसिओलस रेडिएटस्.**

हें एक द्विदल धान्य आहे. हें सर्व हिंदुस्थानांत कमजास्त असें सांपडतें. याचें झाड सुमारें हातभर उंच असतें. उडदाचीं पानें बेलासारखीं त्रिदळ आणि किंचित् लहान असून वाटोळीं असतात. याच्या डाहळ्यांस शेंगा येऊन फुलें लागतात. शेंगा जून झाल्यावर हीं झाडें उपटून वाळत टाकतात. मग दाणे चांगले वाळल्यावर बीं जमा करितात. उडदाचा रंग काळा आहे; परंतु त्याची डाळ पांढरी असते. वरचें साल मात्र काळें असतें. उडीद हा पौष्टिक व शीतळ आहे. याचे पुष्कळ पदार्थ होतात. उडीद गुरांस चारला असतां तीं पुष्ट होतात. दाणा काढून घेतल्यावर झाडांचा व टरफलांचा भुगा, गुरें मोठ्या आवडीनें खातात. दुभत्या-

गाईस अथवा ह्मशीस उडीद चारला असतां अधिक दूध देतात. **उडीद**– स्निग्ध, शोषक, उष्ण, कफकारक, वृष्य, पित्तल, पित्ताला कोपविणारा, रोचक, जड, बलकर, संतर्पण, स्वादु, पौष्टिक, मूत्रल, शुक्रल, मलभेदक, दुग्ध उत्पन्न करणारा, मांसाला वाढविणारा, मेदवर्धक; व दमा, श्रम, परिणामशूल, अर्दितवायु, व अर्श यांचा नाश करितो. ( १. ) **उडदाचे वडे**–उडद्रांची डाळ पाण्यांत भिजत घालून वांटावी व त्यांत मीठ, मिरें, हिंग, आलें हें पदार्थ घालून, त्या वाटलेल्या डाळीचे वडे करावे, ते तुपांत किंवा तेलांत तळून खावे; ह्मणजे वायु, अर्दितवायु ( तोंड वांकडें होणें, ) अरुचि, दुर्बलपणा, क्षय, अन्नद्रवशूल यांचा नाश होतो. उडदाची डाळ वाटून दह्यांत कालवून वडे करून तळावे, ते सेवन केले असतां ते पुरुषास हितावह, बळकारक, धातुवर्धक असे आहेत. ( २. ) **पुष्टतेवर उडदांचे लाडू**–उडदाच्या डाळीचें पीठ, गव्हाचें पीठ, तांदुळाचें पीठ व पिंपळीचें चूर्ण, हीं चार चार तोळे प्रमाणानें घेऊन एकत्र करावीं. त्याच्या अर्धें तूप त्यांत घालावें. नंतर चांगलें भाजून, मग साऱ्यांच्या समभाग साखर व साखरेचे दुप्पट पाणी घालून, पाक करून, त्याचे लाडू चार तोळे वजनाचे बांधून तो लाडू रात्रीं निजतेसमयीं खाऊन, त्यावर १६ तोळे दूध प्यावें व आंबट, खारट, तेलकट पदार्थ वर्ज करावे. ह्मणजे पुष्टता येते व क्षीणबळ होत नाहीं. ( ३. ) **रक्तपित्तावर**–उडदाचें पीठ व रेशमी वस्त्राची राख पाण्यांत कालवून मस्तकास लेप करावा. ( ४. ) **उचकीवर**–उडीद व हळद यांचें चूर्ण व ताग यांचा धूर प्राशन केला असतां तो उचकीचा नाश करितो. ( ५. ) **नारूवर**–नारूनें फोड आला असल्यास त्यावर उडदाच्या पिठांत पाणी घालून, तें पीठ गरम करून ह्या फोडावर बसवावें. त्यावर थोडा खळगा करून, गरम तेलाचे, एकामागें एक असे थेंब पाडावे' ह्मणजे तेव्हांच तो फोड फुटून नारू एकत्र होऊन बाहेर पडतो व फोड बरा होतो. ( ६. ) **धातु पडते त्यास**–उडदाच्या डाळीचें पीठ ४ पैसेभार गाईचे दुधांत शिजवून त्यांत थोडें तूप टाकून उन्ह उन्ह द्यावें. दिवस ७. ( ७. ) **पुष्टतेस**–

ाडदाच्या सोलींव डाळीस गाईच्या निरसे दुधाचीं किंवा पांढऱ्या उसा-
ाया रसाचीं २१ पुटें देऊन, नंतर ती डाळ दळून पीठ करून ठेवावें, व
ित्य प्रातःकाळीं गाईचें दूध कच्चा पावशेर घेऊन, त्यांत तें पीठ १
ोळा अथवा दीड तोळा कालवून तें दूध चांगलें आटवावें, आणि
ाटत आलें ह्मणजे त्यांत खडीसाखर दोन तोळे पर्यंत व साजूक तूप,
दाम, चारोळी, जायफळ, वेलची, इ० मसाला घालून सेवन करावें.
८.) **नासारोगावर**-उडदाचें पीठ व तांबड्या रेशमी वस्त्राची राख
ाण्यांत कालवून मस्तकास लेप करावा.

## ८३. उतरण.

**सं०-फलकंटका. गु०-हिं०-उतरण. क०-कुरुटिगे. ता-वेलीपारुत्ती. तै०-गुरुटी चेट्टु. मला०-वेली पारुत्ती. इं०-**Hairy flowered cynanchum **हेअरी फ्लावर्ड सिनान्कम्. ला०-** Daemia extensa **डेमिया एक्सटेन्सा.**

या वेलास "उतरंड" असेंही ह्मणतात. उतरणीचा वेल वर्षोगणती
ाचतो. हा कुंपणावर झाडावर चढलेला असतो. या वेलाची चुंबळ
ारून जमिनींत उभी पुरली असतां त्यास मुळें फुटून वेल लागू होतो.
ातरणीचा वेल प्रसिद्ध आहे. जो वेल उंच डावा फिरून, वृक्ष इत्यादि-
ांवर चढतो तो वर्षभर वांचतो, व जो उजव्या बाजूनें चढतो तो
ोंगणती वांचतो. हिला जोडफळें येतात व तीं खवलांनीं व्याप्त असून
ांचा आकार पोपटाप्रमाणें दिसतो. या फळांत रेशमासारखा कापूस असतो-
ाखूण ईश्वरानें वेलामध्यें मोठ्या चातुर्यानें ठेविली आहे. **उतरणी**-
खट, श्वेत, नेत्रांला हितावह, लघु, उष्ण, स्निग्ध, सारक, तुरट, व्रण-
ाण; आणि खोकला, व्रण, कृमि, दमा, ज्वर, पित्त, प्रमेह, कफ, कुष्ठ, प्रलाप,
ायु, तंद्रा, दद्रु, क्षय, कास, मूत्रकृच्छ्र, योनिरोग, सूज यांचा नाश करिते,
सुखानें प्रसव करणारी आहे. हिची शाक उष्णवीर्य व कडू आहे; व
मे, अर्श, कुष्ठ, कफ, वात यांचा नाश करिते. हिचें **फळ**-खारट,
ाडू, उष्ण, तिखट, लघु, अग्निदीपक, पित्तकोपन, विशद; आणि विषनाशक

आहे. ( १. ) **विषमज्वरावर**–उतरणीचें मूळ आणि हरीतकी यांचें चूर्ण, साखर किंवा गूळ घालून ऊन पाण्याशीं प्यावें. हें पाचन व रेचन आहे. ( २. ) **गोमाशी कानांत गेल्यावर**–उतरणीचे पाल्याचा रस कानांत तीन दिवस घालावा, ह्मणजे गोमाशी मरेल. ( ३. ) **गळू वगैरे पिकून फुटण्यास**–उतरणीचा पाला वाटून लावावा. ( ४. ) **जळवात** व **कुष्ठावर**–उतरणीचा चीक लावावा. ( ५. ) **नाळगुदास**–उतरणीच्या पाल्याचा रस कानांत पिळावा. ( ६. ) **हूक भरते त्यास**–उतरणीच्या पाल्याचा रस चोळावा..

## ५४: उंदिरकानी.

**सं०-आखुपर्णी. गु०-उंदरकनी. हिं-मूषाकर्णी. ब०-इंदूरकाणिपाना. कालीदन्ती. यूनानी०-शरदश. क०-वाल्लिहरुहे. फा०-गेलोपुष अ० अजानुल्फम्. ला०-**Ipomoea reniformis
**आयपोमिया रेनिफोर्मिस.**

उंदिरकानीच्या लहान लहान वेली असतात. हीस लहान घुगऱ्यां-सारखीं फळें येतात. हिचीं पानें उंदिराचे कानासारखीं असतात या वेली बहुतेक मांतांत होतात. हिचीं फुलें गुलाबी रंगाचीं असतात. ही वनस्पती गुणानें उष्ण आहे. उंदिरकानी या वनस्पतीच्या दोन जाति आहेत. एक बागेंत उगवते ती, व दुसरी रानांत उगवते ती. जी बागेंत उगवते तिळा युनानी भाषेंत "लपासिनी" असें म्हणतात. ही लपासिनी-उंदिरकानीचीं झाडें, झाडांच्या छायेंत अथवा पडक्या इमारतींत होतात. याची फांदी व देंट तिधारी असतो. याचीं पानें हातानें चोळून, त्याचा वास घेतला असतां कांकडीसारखा येतो. हें झाड गुणानें थंड आहे. याचा चीक पचन करणारा आहे. थोर उंदिरकानी–शूल, ज्वर, कृमि, व्रण, उंदिराचें विष यांचा नाश करिते. लघु उंदिरकानी–तिखट, कडू, उष्ण, शीतल, रसायन, सारक, लघु, तुरट अशी आहे; व कफ, पित्त, शूल, ज्वर, कृमि, ग्रंथिरोग, मूत्रकृच्छ्र, प्रमेह, आनाह, उदर, हृद्रोग, विष, पांडु, भगंदर, कुष्ठ, यांचा नाश करिते. ( १. ) **डोक्यांतील गर्मी दूर होण्यास**–या झाडाचें चूर्ण नाकांत ओढावें. ( २. ) **उष्णतेनें**

**कानावर** अथवा **सर्वांगावर सूज आली तर**-याचें चूर्ण व जवाचें पीठ पाण्यांत कालवून त्याचा लेप द्यावा. ( ३. ) **कान फुटल्यास** अगर **कानांत फोड झाल्यास**-हिचा रस कानांत घालावा. ( ४. ) **पोटांतील गर्मी, कृमि व मूर्च्छेवर**-हिचा रस प्यावा. **रानांत होणारी उंदिरकानी** आहे, तिचे तीन प्रकार आहेत. त्यांत एकीस मुळापासून फांद्या निघतात, त्या लांब असून बारीक असतात व त्यांच्या बुडाशीं त्या लाल असतात. हिचीं पानें बागेंतील होणाऱ्या उंदिरकानीपेक्षां नाजूक व लांब असतात. हिच्या फुलावर पिंवळा; तांबडा, पांढरा इत्यादि अनेक रंगाचा भास असतो. **दुसरीस** जीं फुलें येतात, तीं पिंवळीं असतात. पानें नाजुक असून बोटासारखीं जाड असतात. ही गुणानें समशीतोष्ण आहे. व हिची उत्पत्ति रेतीच्या जमिनींत होते. हिचे उपयोगः-- ( १. ) **शिरोरोग, अपस्मार व अंग वांकडें होणें यांवर**-हिचा रस द्यावा. ( २. ) **सर्पाच्या विषावर**-हिचा रस द्यावा. (३.) **मस्तकशूलावर**-हिला शिर्क्यांत वांटून त्याचा मस्तकास लेप द्यावा. ( ४. ) **मस्तकांतील मगज साफ होण्यास व दंतकृमीवर**-हिचा रस, मध व पाणी एकत्र करून त्याचे चूळ भरले असतां मस्तकांतील मगज साफ होतो व दातांतील किडे मरतात व दांतांस बळकटी येते. ( ५. ) **डोळ्याचे कोनावर लासूर असल्यास**-हिची मुळी पाण्यांत उगाळून लावावी. (६.) **सुजेवर**-जवाचें पीठ व हिच्या मुळीचें चूर्ण एकत्र करून पाण्यांत कालवून सुजेवर लाविलें असतां सूज उतरते. ( ७. ) **शरीरांतील उष्णता निघून जाण्यास**--हिच्या बियांचें सरबत करून घ्यावें. (८.) **पोटफुगीवर**--हिच्या मुळाचा पाण्यांत वांटून पोटावर लेप द्यावा. ( ९. ) **तीराचें टोक** अथवा **कांटा अंगांत मोडून राहिला तर**-हिचा लेप करावा ह्मणजे तो आपोआप बाहेर पडतो. ( १० ) **शीतलत्व दूर होण्यास व पुरुषत्व येण्यास**-हिचा रस अ० हिला पाण्यांत वांटून बस्ती वगैरे ठिकाणीं लेप केला असतां पुरुषत्वास तेजी येते. याच्या लेपास युनानी भाषेंत ' तिल्ला ' असें ह्मणतात. अथवा हिचीं पानें सुकलेलीं

अथवा ओलीं आणून त्यांची, गव्हांच्या पिठांत भाकर करावी व ती २१ दिवस खावी; व पड्यांत बसावें. दूध व गव्हाचें अन्न खावें, ह्मणजे पुरुषत्व येतें. **तिसऱ्या जातीच्या** उंदिरकानीचीं पानें बारीक असून झाडास पांढरवट कांटे असतात. या झाडाची खांदी मोडली असतां चीक निघतो व याचे वेल जमिनीवर पसरतात. हिची उत्पत्ति पाण्यापासून दूर होते. हिचीं पानें तळहातावर चोळून पाहिलीं असतां तांबडीं सुरखीदार दिसतात. हें झाड गुणानें गरम आहे. हीस पांढरीं फुलें येतात; त्यांत कांहींसा तांबूस रंग असतो. या झाडाचें बीं रानतुळशीच्या बियांप्रमाणें (तुकुमराईप्रमाणें) असतें. (१.) **गोलकृमीवर**–या झाडाचा रस १० मासे, पुदिन्याचा रस व पाणी २० तोळे एकत्र करून प्यावें. **उंदिरकानीच्या अनेक जाती आहेत.** ज्या जातीच्या झाडाचीं पानें पिंवळ्या रंगाचीं असून किंचित् अस्मानी रंगाची झांक आहेसें वाटतें, तीं झाडें फार चांगलीं आहेत असें समजावें. उंदिरकानीच्या झाडाचा वास गर्भिणी स्त्रीनें घेतला असतां, तत्काळ अतिशय शिंका येऊन गर्भपतनाची भीति उत्पन्न होते; क्वचित् पतनही होतो. **उंदिरकानीचे सर्व साधारण उपयोगः**–(१.) **कृमीवर**–उंदिरकानीचीं पानें कुटून चूर्ण करून; त्यांत पीठ मिश्र करून त्याचे घारगे करून खावे व वर सातूची कांजी प्यावी. (२.) **ज्वरावर**–उंदिरकानीच्या पानांचा रस ४ मासे, मधाशीं द्यावा. (३.) **वीर्यस्राव व मूतखड्यास**–उंदिरकानीच्या पानांची भाजी खावी. (४.) **सर्दीनें अंगास कंडू सुटते त्यास**–तिच्या हिरव्या पानांचा रस प्यावा. (५.) **शिरोरोगावर**–उंदिरकानीचें सरबत करून प्यावें. (६.) **अपस्मार व वायूनें अंग वांकडें होतें त्यावर**–उंदिरकानीचें चूर्ण ओढावें. (७.) **शरीरांत तीराचें फाळ किंवा अणकुची किंवा कांटा राहिला असल्यास**–उंदिरकानीचें चूर्ण पाण्यांत कालवून जखमेवर त्याचा लेप करावा; ह्मणजे तें आपोआप निघतें व जखम बरी होते. (८.) **उंदिराच्या विषावर**–उंदिरकानीच्या पाल्याचा अंगरस एक तोळ्यापासून २ तोळेपर्यंत पोटांत द्यावा, व अंगासही चोळावा. दिवस ७.

# ५५. उपरसाळ.

**सं.-श्यामा, सारिवा. गु.-उपळसरी. हिं.-गौरिसर और काळीसर. बं.-अनंतमूळ. क.-करिबंट, सोगदे. तै.-पळाशगंधि. ता.-नान्नारि. तु.-कन्यावेरु. मला.-नान्नारि. इ.-**Indian sarsaparilla **इंडियन् सार्सापरिला. ला.-**Hemidesmus indicus **हेमिडेस्मस् इंडिकस्.**

हिची वेल काळसर व तांबूस अशा रंगाची असते. हिचीं पानें आकारानें तरवारीसारिखीं अर्ध बोट रुंद असून, तीन अंगुळें लांब असतात. या वेली डोंगराळ जमिनींत होतात. हीस बारीक व लांबट गोड फळें येतात. व त्यांतून कापूस निघतो. हींत काळी व पांढरी अशा दोन जाती आहेत. कोकणांत या वेलीची उत्पत्ति पुष्कळ होते. हिच्या मुळास खमंग वास येतो. हीस " उपळसरी, उपटसुळी, लहान कावळी, शेतकावळी, शेंबवेल, श्यामी " असेंही ह्मणतात. पांढरी उपरसाळ—शीतळ, मधुर, शुक्रल, जड, स्निग्ध, कडू, सुगंधि अशी आहे; व कुष्ठ, कंडू, ज्वर, देहाचा दुर्गंध, अग्निमांद्य, दाह, खोकला, अरुची, आमदोष, त्रिदोष, विष, रक्तरोग, प्रदर, कफ, अतिसार, तृषा, दाह, रक्तपित्त व वायु यांचा नाश करिते. काळी उपरसाळ—शीतळ, वृष्य, मधुर, कफनाशक आहे; वरकड गुण पांढऱ्या उपरसाळीसारखे आहेत. ( १. ) **गर्भिणीच्या धुपणीवर व अंगांत भिनलेल्या गर्मीवर**—उपरसाळीचीं मुळें स्वच्छ धुऊन केळीच्या ओल्या पानांत गुंडाळून फोपाट्यांत भाजून काढावीं. नंतर त्या प्रत्येक मुळाचे मध्यभागीं जो नर ( रेषा ) असतो तो काढून टाकून, जिरें, खडीसाखर व पांढरा कांदा भाजलेला, हीं सर्व एक ठिकाणीं करून बारीक वाटावीं. त्यांत सर्व औषधांचे वजना इतकेंच तूप घालून, प्रत्यहीं दोन वेळ प्रमाणें सात दिवस द्यावें. हें औषध ४२ दिवस घेतल्यानें अंगांत भिनलेली गर्मी झडून जाऊन अंगावर पसरणारे लाल चट्टे बरे होऊन, धातुस्थान व रक्त यांची शुद्धि होते. **( २. ) डोळ्यांत फुलें पडतात व सारा येतो त्यावर**—

उपरसाळीचें पान तोडून त्यांतून जो चीक येतो तो डोळ्यांत घालावा. ( ३. ) **उन्हाळ्यावर**–पुटपाककृतीनें उपरसाळीचीं मुळें पक्क करून त्यांत जिरें व खडीसाखर घालून वांटून गोळी करून, त्यांत गाईचें तूप घालून सांजसकाळ द्यावें. ( ४. ) **व्रणावर**–उपरसाळीचीं मुळें वांटून घर बांधावीं ह्मणजे व्रणाचें शोधन होतें. ( ५. ) **ओकारीवर**–उपरसाळीचीं मुळें पाण्यांत अथवा फोपाट्यांत कृतीनें वाफून नंतर बाहेर काढून मधील रेषा काढून टाकून, त्यांत थोडा हिंग घालून बारीक वांटून तूप मिश्र करून प्रातःकाळीं तें एक वेळ द्यावें; ह्मणजे ओकारी त्वरीत जाते. ( ६. ) **दंतरोगावर**–उपरसाळीचीं पानें व चिकण्याचीं पानें समभाग घेऊन, बारीक वाटून गोळी करून दातांत धरावी; ह्मणजे वेदना व कृमि नाहींसे होऊन दांत घट्ट होतात. ( ७. ) **पित्तज्वरावर**–उपरसाळ व कमळकंद यांचा काढा, शीत करून साखर घालून घ्यावा. ( ८. ) **सर्व विषावर**–उपसाळीचीं मुळें उगाळून, पाण्यांत कालवून तें पाणी प्यावें. ( ९. ) **मस्तकशूलावर**–उपरसाळीचें मूळ उगाळून लेप करावा. ( १०. ) **पोटदुखीवर**–उपरसाळीचें मूळ उगाळून प्यावें.

## ५६. उंबर.

**सं० उदुंबर. गु० उंबरो. हिं० उदुंबर, गूलर. व० यज्ञडुमुर। रा० पु०-उंमरो. क० अत्ति. तै०–अत्तिमानु. ता० अत्तिमार तु० अत्तिमारा. मला० अत्ति. फा० अंजीरे, आदम-अ० जमीझ इं०** Figtree **फिगट्री. ला०**–Ficusglomirata **फायकरग्लोमिरेटा.**

उंबराचीं झाडें सर्वत्र प्रसिद्ध आहेत. यास अंजिराच्या आकृतीचीं फळें येतात. तीं पिकलीं ह्मणजे कोणी कोणी खातात. हिरवी असतात। तेव्हां कोणी त्यांची भाजींही करितात. उंबराची छाया शीतळ असून सौख्यकारक आहे. उंबराचें लांकूड अतिशय चिंवट असतें. त्याचे तक्ते पाडतात. ते इतके बळकट असतात कीं, कुऱ्हाडीचे घाव घातले तरी एकाएकीं फुटत नाहींत. ज्या ठिकाणीं उंबराचें झाड असेल, त्याच्या उजव्या बाजूस व झाडाखालीं बहुतकरून पाण्याचा झरा सांपडतो. कित्येक लोक

उंबराचें झाड असेल त्याच ठिकाणीं विहिरी खणतात, व तेथें त्यांस पाणी लागतें. उंबराच्या झाडाखालीं असणारें पाणीं प्यावयास चांगलें असून निरोगी आहे. उंबर शीतळ, गर्भसंधानकारक, व्रणरोपक, रूक्ष. मधुर, तुरट, गुरु, अस्थिसंधानकारक, वर्णकर असा आहे; व कफ, पित्त, अतिसार, योनिरोग, यांचा नाश करितो. **याचीसाल**-शीतळ, दुग्धप्रद, तुरट, गर्भाला हितावह व व्रणनाशक आहे. याचें कोंवळें फळ-स्तंभक तुरट, हितकर आहे, व तृषा, पित्त, कफ, रक्तविकार यांचा नाश करितें. **मध्यम कोंवळें फळ**-गोड, शीतळ, तुरट आहे व पित्त, तृषा, मोह यांना करितें, व रक्तस्राव, वांति, प्रदर, यांचा नाश करितें. **याचें जूनफळ**-तुरट, रुचिकर, आंबट, दीपन, मांसवृद्धिकर, रक्तदोषकारक दोषळ व जड असें आहे. पिकलें **फळ**-तुरट, मधुर, कृमिकर, जड, रुचिकर, अतिशीतळ, कफकर आहे, व रक्तदोष, पित्त, दाह, क्षुधा, तृषा, श्रम, प्रमेह, शोष, मूर्च्छा, यांचा नाश करितें. ( १. ) **वायूनें अंग धरलें असतां त्यावर**-उंबराचा चीक लावून त्यावर कापूस बसवावा ह्मणजे बरें होतें. ( २. ) **रक्तपित्तावर**-उंबराचीं पिकलीं फळें गुळाशीं अ. मधाशीं खावीं; अ. मूळ उगाळून साखर घालून द्यावें. ( ३. ) **बचनागाचे विषावर**-उंबराच्या सालीचा रस तुपांत घालून उन्ह करून द्यावा. ( ४. ) **सोमलावर**-उंबराच्या पानांचा अ. सालीचा रस अच्छेरपर्यंत द्यावा. गुरांसही हें द्यावें. ( ५. ) **डोळे येतात त्यावर**-उंबराच्या चिकाचा डोळ्यावर लेप द्यावा. ( ६. ) **गालफुगीवर**-उंबराचा चीक लावावा. (७.) **वळास**-उंबराचा चीक लावून त्यावर पातळ कागद चिकटवावा. (८.) **सुजेवर**-उंबर, वड, पिंपळ, पायरी ( पिंपरी ), नांदरूख व वेतस या पंचवल्कलाच्या साली उगाळून तूप घालून लेप करावा.(९.) **अतिसारावर**-बत्ताशांत उंबराच्या चिकाचें ४ । ५ थेंब घालून द्यावें; ह्मणजे आंवरक्त पडते ती हगवण बरी होते. (१०.) **रक्तातिसारावर**-उंबराच्या मुळाचें पाणी द्यावें. ( ११. ) **मुतखड्यावर**-उंबराचे मुळाचा रस ६ तोळे काढून, त्यांत साखर घालून द्यावें. हीच मुळी गाईचे दुधांत उगा-

ळून शिश्नावरही लेप करावा. ( १२. ) **उष्णतेवर**–पक्व व ज्यांत किडे नाहींत असें उंबराचें फळ घेऊन त्यांत खडीसाखरेची पूड घालून तें फळ रोज सकाळीं खात जावें. (१३.) **सर्व प्रकारचे उपदंश व प्रमेह यांवर**–उंबराच्या झाडाचें मूळ मोकळें करून करवतीनें तें मूळ चांगलें दुखवावें; त्याखालीं एक भांडें ठेवावें. त्यांत चारप्रहरांत जो द्रव सांचेल तो गाळून बाटलींत भरून ठेवावा. हा शक्तीप्रमाणें ४ तोळे पर्यंत घेऊन जिरें व खडीसाखर घालून द्यावा. (१४.) **लहान मुलांच्या अंगांत देवीची** अगर **गोंवराची उष्णता भिनल्यास**–उंबराचा द्रव, खडीसाखर घालून द्यावा. (१५.) **उष्णतेनें जिभेवर कांटे वगैरे आल्यास**–उंबराच्या पानांवरील फोड व खडीसाखरहीं वांटून द्यावीं. ( १६. ) **गर्भिणीच्या अतिसारावर**–उंबर मधाशीं द्यावें. ( १७. ) **भस्मक रोगावर**–उंबराची साल स्त्रीचे दुधांत वांटून द्यावी, अथवा उंबराचें मूळांतलें पाणी ताडीप्रमाणें काढून द्यावें, दुसरें पाणी देऊं नये. याप्रमाणें सात दिवस द्यावें. ( भस्मक वगैरे सर्व रोगाचीं कारणें व लक्षणें "सुबोधवैद्यक" पुस्तकांत पाहावीं. ( १८. ) **देवी हलक्या येण्यास**–उंबराच्या पानांवरील कीड गाईच्या निरशा दुधांत वाटून त्याचा रस काढावा; त्यांत थोडा मध घालून शक्तीप्रमाणें द्यावा. हें औषध देवीचा ताप येतांच द्यावें ( १९.) **पित्तज्वरावर**–उंबराच्या मुळाचा द्रव साखर घालून द्यावा. ( २०. ) **विंचवाच्या विषावर**–उंबराचा पाला वांटून दंशावर लावावा ( २१.) **मोडशीवर**–उंबराचा द्रव द्यावा. ( २२. ) **मूळव्याधीवर**–उंबराची मुळी थंडपाण्यांत उगाळून, त्यांत दांतवण कालवावें व त्याचा लेप द्यावा. ( २३. ) **बद बसवण्यास**–उंबराचा चीक लावून त्यावर पातळ कागद बसवावा. ( २४. ) **कर्णमूळावर**–उंबर व रुई यांचा चीक एकत्र करून लावावा. ( २५. ) **गंडमाळेवर**–उंबराच्या पानावरील फोड, गोड दह्यांत वांटून साखर घालून नित्य एकवेळ प्रमाणें देतजावें. ( २६. ) **मस्तकशूला पासून नाकांतून रक्त पडत असल्यास**–उंबराच्या पिकलेल्या फळांत साखर घालून तुपांत तळून त्यांत वेलदोड्याची पूड व

मिऱ्यांची पूड अर्धा अर्धा मासा घालून रोज प्रातःकाळीं खावें,व रिंगणीच्या फळांचा रस डोक्यास चोळावा; ह्मणजे नाकांतून रक्त पडणें बंद होतें. ( २७. ) **दाहावर**–उंबराचा चीक साखर घालून घ्यावा.

## ५७. उलफुली.

हें झाड गोमांतकप्रांतीं होतें. ही एक टाकळ्यासारखीच भाजी आहे. परंतु उलफुलीच्या झाडाची पानें लांबोडीं असून शेवटास कात्रे असतात. हें झाड दोन अडीच हात उंच होतें. उलफुलीच्या पाल्याची व कोंवळ्या डाहळ्यांची भाजी होतें.

## ५८: उन्हाळी.

**सं० शरपुंखा० गु० शरपुंखा. हिं शरफोका क० कोग्गि तै०–पांपा- रात्चेट्ट इं०** Purple tephrosia **परपल टेफ्रोसिया ला०** Tephrosia purpurea **टेफ्रोझिया परपूरिया.**

उन्हाळीचें झाड सुमारें कंबरें इतकें वाढतें. हीं झाडें बहुत करून खड- कळ व कठीण अशा जमिनींत होतात. हें झाड हातानें उपटून काढ- ण्यास मोठमोठे पहिलवान देखील समर्थ होत नाहींत, इतकें हें कठीण असतें. यांस लाल रंगाचीं फुलें येतात व याच्या शेंगा चपट्या असतात. पानें लहान असून लांबट असतात. ही बहुतेक प्रांतांत होते. हीस कोणी 'रानटी नीळ' असेंही म्हणतात. जेथें हीं झाडें फार होतात, तेथील लोक हीं झाडें वाळवून त्यांचा सर्पणाकडे उपयोग करितात. क्वचित् पांढऱ्या फुलाचीही उन्हाळी असते. उन्हाळी–तिखट, कडू, उष्ण, तुरट, लघु व यकृत्, कृमि, प्लीहा, गुल्म, व्रण खोकला, विष, दमा, अर्श, रक्तदोष, हृद्रोग, कफ, ज्वर, वायु कफोदर, वांग, गलत्कुष्ठ, यांचा नाश करिते. पांढऱ्या उन्हाळीचे गुण अधिक आहेत. कंटकशरपुंखा–तिखट, उष्ण व कृमि, शूळ, यांचा नाश करिते. ( १. ) **मूळव्याधीवर**–उन्हाळीच्या मुळ्या दह्यांत वांटून घ्याव्या ( २. ) **प्रमेहावर**–उन्हाळीच्या मुळीचा काढा करून त्यांत मिऱ्यांचें

चूर्ण घालून तो द्यावा. ( ३. ) **खरजेवर**–उन्हाळीच्या बियांचें पाताळयंत्रानें तेल काढून तें लावावें, हें मोठें वस्ताद औषध आहे.( ४.) **गंडमाळेवर**–उन्हाळीचें मूळ, तांदळाच्या धुवणांत वांटून त्याचें नस्य आणि लेप करावा. अथवा, उन्हाळीचें मूळ व हळद गाईच्या दुधांत उगाळून लेप करावा. ( ५. ) **खोकल्यावर**–उन्हाळीची मुळी वाळवून चिलमींत घालून ओढावी. ( ६. ) **सर्व व्रणांवर**–उन्हाळीचें चूर्ण, मधांत खलून लावावें. ( ७. ) **गुल्मावर**–उन्हाळीचा क्षार व हरीतकीचें चूर्ण हीं चार चार मासे एकत्र करून भक्षावीं. ( ८. ) **प्लीहोदरावर**–उन्हाळीच्या मुळ्या ताकांत वांटून प्याव्या; ह्मणजे त्वरित गुण येतो. ( ९ ) **अंडवृद्धीवर**–उन्हाळीच्या मुळाचें चूर्ण पाण्याशीं १ महिनाभर घ्यावें.

## ५९. उक्षी.

सं०–श्वेत धातकी.

उक्षीच्या मोठमोठ्या झाळी डोंगराळ जमिनींत होतात. उक्षीचीं पानें लहान असून, तीं सुमारें ४ अंगुळें लांब असतात. हीं पानें मृदु असतात. ( १. ) **नळवायूस**–उक्षीच्या पाल्याचा रस अतपाव पोटांत घ्यावा. ( २. ) **व्रणावर**–उक्षीचें झाड परंतु तें सर्वत्र नसतें, जेव्हां मिळेल तेव्हां आणून दुधांत शिजवून ठेवावें. याचा आकार शिताफळाप्रमाणें असतो, हें फळ व खटखटीचें पाळ [ मूळ ] हीं मधांत उगाळून नित्य ४।५ वेळ लेप द्यावा. ( ३. ) **पांडुरोगावर**–उक्षीच्या फळाचें चूर्ण, जायफळ, पत्री, लवंग, वेलची, दालचिनी, दगडफूल, व अजमोदा, यांचें चूर्ण २ मासे, मधांत घालून द्यावें. दररोज दोहीसांज औषध द्यावें. ह्मणजे दुर्धर पांडुरोग दूर होतो. ( ४. ) **फुरशाच्या किंवा घोणसाच्या विषानें सूज येते त्यास**–उक्षीचें पाळ व घणसरीचें पाळ गोमूत्रांत उगाळून सुजेवर लेप द्यावा. (५.) **अग्निदग्धव्रणावर**–उक्षीच्या फळाची राख तेलांत घालून लावावी. (६.) **मुलास मुडदूस होतो त्यावर**–मुडदुसाचीं लक्षणें अशीं आहेत कीं, आंगांत कडकी होऊन रक्त आटतें

व कफाचें प्राधान्य होऊन हातपाय काळ्या होतात, त्यांस उक्षीचें फळ बारीक चिरून सांवलींत वाळवावें. नंतर त्यास गोमूत्राचीं सात पुटें देऊन जाळून काळी राख करावी. त्या राखेस माक्याचीं पुटें सात व शेळीच्या मूत्राचीं पुटें तीन व महाळुंगाचे रसाचीं पुटें ७ देऊन, खातेवेळीं २ गुंजांपासून ४ गुंजांपर्यंत शक्तिप्रमाणें मधांत खलून चाटण द्यावें.

## ६०: ऊद.

### सं०-तुरुष्क. गु० हिं०क० ऊद.

ऊदास "लोबान" असेंही ह्मणतात. ऊदाचे वृक्ष, तुर्कस्तान, आफ्रिकाखंडाच्या पूर्व किनाऱ्यावरील प्रदेश, यवद्वीप ( जावाबेट ), सुमात्रा, या प्रदेशांत होतात. या वृक्षाच्या चिकापासून ऊद तयार होतो. ऊद हा सुगंधि आहे. धूपाकडे याचा पुष्कळ उपयोग होतो. ऊदाच्या उत्तम उदबत्त्या होतात. यांचें जें तेल काढतात. त्यांस उदेल ह्मणतात. उदाचें जें फुल काढतात त्यास 'ऊदफूल' असें ह्मणतात. ऊद-वातहर, कफनाशक, वर्णप्रसादक, कंडूकुष्टनाशक आहे. ( १. ) **उदेल काढण्याची कृति**-पांढरा सफेद ऊद ( कवड्याऊद ) आणून त्याची भरड पूड करावी. या दोन्ही भुक्या एकत्र कराव्या. नंतर एक मडकें ज्यांत शेरभर पाणी राहील असें घेऊन त्याच्या खालच्या कंगोऱ्यास बारीक भोंक पाडून, त्यांत तांब्याची अथवा पितळेची करंगळी इतकी जाड नळी पक्की बसवावी. तें मडकें चुलीवर उतरतें ठेवून, त्याच्या तोंडावर भोंकाची करवंटी बसवून, तिच्या भोंकावाटे ती तयार केलेली भुकटी हळूंहळूं सोडावी. व तें भोक, एका फडक्यांत शेण व माती बांधून, त्यानें वाफ बाहेर न येऊं सके असें पक्कें बंद करावें व चुलीखालीं मंदाग्नि लावावा. आणि त्या मडक्याला लावलेल्या नळी खालीं वाटी ठेवावी. या प्रमाणें सर्व कृत्य झाल्यावर कांहीं वेळानें त्या नळीवाटे तेल येऊं लागतें. तें तेल नळी खालीं ठेवलेल्या वाटींत जमतें. नंतर तें बाटलींत भरून ठेवावें. उदेलाचा वास फार उग्रट आहे. हें तेल केंसांस लावतात.

सर्दीपासून कपाळ दुखत असेल तर डोक्यास उदेल चोळावें ह्मणजे कपाळ दुखण्याचें राहतें. ( २. ) **उदफूल** तयार करण्याची कृति–लोह ऊद घेऊन त्याची पूड करावी. मग ती पूड धाकट्या लोखंडी ताजव्यावर घालावी. त्या ताजव्याला शेगडीवर धरून मंद आंच द्यावी. ऊद पातळ झाला ह्मणजे त्याजवर काचेचें पंचपात्र उपडें घालावें. व आंच किंचित् वाढवावी. कांहीं वेळानें त्या उदाची वाफ होऊन, पंचपात्राचे तळीं जाऊन जमेल. ही जमलेली वाफ शुभ्र आणि तुंब्याचे फुलासारखी असते ह्मणून तीस उदाचें फूल असें ह्मणतात. ( ३. ) **गुरासशेंबारोग** ( गुरांच्या नाकांतून दाट श्लेष्म पडूं लागतो ) होतो त्यावर–कवळ्या उदाची नाकांत धुरी द्यावी.

## ६१. ऊंस.

**सं० इक्षु० गु० शेरडो. हिं० गांडा, पोंडा, ईख० क० कब्बु० तै० चिरकु. ता० करंबु, इकु० तु०–करंबु० मला० करिंबु० फा०नेशकर अ० कस्बुस्, शक्कर० इं० Sugarcane शुगरकेन० ला० Saccharum Album सेक्करमअलबम**

ऊंस हिंदुस्थानांत बहुतकरून सर्व ठिकाणीं पिकतो. ऊंस जगत्प्रसिद्ध आहे. हा पांच सहा हात ऊंच होतो. ऊंसांत पांढरा, तांबडा, काळा, पुंड्या वैगरे अनेक जाति आहेत. तांबड्या ऊंसाचा रस फार गोड असतो. ऊंस खावयास उपयोगीं पडतात. उंसाच्या रसापासून खडीसाखर, पिठीसाखर, गूळ, काकवी असे अनेक पदार्थ करितात. साखरेचीं व गुळाचीं नानाप्रकारचीं पक्वान्नें करितात. उंसाचा कोणताही भाग व्यर्थ जात नाहीं. मुळखंडे व शेंडे गुरांस खावयास उपयोगीं पडतात, रस काढून घेतल्यावर उंसाचीं चिपाडें गुरांस खावयास अथवा जाळावयास उपयोगीं पडतात. ऊंस हा समशीतोष्ण आहे. आजारी मनुष्यास उंसाचें कांडें भाजून खावयास देतात, व अशक्तासही देतात. उंसाचा रस थंड आहे, पण रसापासून गूळ होतो तो उष्ण आहे. साखर व खडीसाखर समधात आहे. उंसांत वेडा ऊंस ह्मणून एक जात आहे. या जातीचा ऊंस फक्त औष-

धास उपयोगीं पडतो. **ऊंस साधारण**-रसकाळीं व पाककाळीं मधुर, वातकर, स्निग्ध, गुरु, मूत्रल, शीत, वृष्य, बलकर, व कफ, पुष्टि, तृप्ति, कृमि, कांति आणि आनंद यांना करणारा, सारक असा आहे व रक्तदोष, वायु, पित्त यांचा नाश करितो. उंसाचें मूळ अति मधुर, मध्य मधुर, शेंड्याला व पेरांत खारट, किंचिन्न्यून व मधुर असा आहे. **उंसाचा रस**-दाहनाशक, मलस्तंभक, आंबट, स्वादु, खारट आणि गुरु असा आहे. **ऊंस भोजनापूर्वी** भक्षण केला असतां पित्तशामक, भोजनोत्तर वातकोपन व भोजनामध्यें भक्षण केला असतां अति जडत्वकारक आहे. **गूळ नवा**-मधुर, क्षार, गुरु, उष्ण, व रक्तदोष, पित्तविकार यांना अहितकारक, मूत्रशोधनकर, वृष्य, स्निग्ध, सारक व कृमि, मेद, शुक्र, मज्जा, मांस, व रक्त यांना करणारा, अग्निदीपन, पित्तल, भेदक, वात, श्वास, खोकला, कफ यांचा नाश करितो. एक वर्षाचा जुना गूळ गुणांनीं अधिक आहे. व तीन वर्षांवर राहिलेला गूळ हीनगुण होतो. **पिठीसाखर**-मधुर, शीतल, बलकर, वृष्य, सारक, स्निग्ध, कफकर व क्षय, खोकला, तृषा, विषदोष, मद, श्वास, मोह, मूर्च्छा, वमि, अतिसार, रक्तदोष, पित्त, वायु, कृमि, भ्रांति दाह, श्रम, अर्श यांचा नाश करिते. ही जशी शुद्ध असेल तसा अधिक गुण करिते. **खडीसाखर**-नेत्रांला हितावह, स्निग्ध, धातुवर्धक, मुखप्रिय, मधुर, शीत, वृष्य, बलकारक, सारक, इंद्रियांना तृप्ति देणारी, लघु व तृष्णा, क्षतक्षय, रक्तपित्त, मोह, मूर्च्छा, कफ, वायु, पित्त, दाह व शोष यांचा नाश करिते. (१.) **कामिणीवर**-सकाळीं ऊंसाचीं पेरें खावीत. अथवा ऊंस रात्रीं आढ्यावर टाकून तो सकाळीं खावा. (२.) **मधुऱ्यावर**-वेडा ऊंस रोग्यास खावयास द्यावा किंवा उशाशीं आणून ठेवावा. (३.) **दाहयुक्त मूत्रकृच्छ्रावर**-तापलेले दुधांत बरोबरीनें साखर घालून तुपाशीं युक्त द्यावें. (४.) **मूत्रकृच्छ्र व खर पडते त्यावर**-दुधांत गूळ घालून किंचित् ऊन्ह करून द्यावें. (५.) **उचकीवर**-उंसाचा रस प्यावा. (६.) **सूर्यावर्त शिरोरोगावर**-ह्मणजे सूर्योदयापासून मस्तक दुखण्यास लागून जसा सूर्य चढेल तसा अधिक

होऊन सूर्यास्तास कमी होतो; त्यास गूळ एक तोळा व तूप अर्धा तोळा एकत्र करून सकाळीं द्यावें व कपाळास काळे तीळ दुधांत वांटून त्यांचा लेप करावा. दि० ३. (७.) **धातु पडत असल्यास**--त्यावर खडीसाखर तोळे ७ व टांकणखाराची लाही मासे ७ एकत्र करून, तें चूर्ण रोज एक तोळा याप्रमाणें सात दिवस द्यावें पथ्य करावें. (८.) **कांच, खडा, अगर कांटा रुतल्यास**--त्यावर--गूळ उन्ह करून जेथें रुतलें असेल तेथें डाग द्यावा. (९.) **गोम चावल्यास** त्यावर--गूळ जाळून लावावा. (१०.) **नळास**--ह्मशीच्या धारोष्णांत गोड होई पर्यंत गूळ घालून तें दूध उभ्यांनीं प्यावें व प्रहरभर बसूं नये. (११.) **उन्हाळयास**--दह्यांत खडीसाखर घालून द्यावी. (१२.) **उचकीवर**--गुळाच्या पाण्यांत सुंठ उगाळून तें पाणी नाकांत थोडथोडें घालावें व निजण्यास सांगावें. अतिशय चटका लागल्यास दुधांत रक्तचंदन उगाळून, त्यांत किंचित् मीठ घालून नाकांत घालावें. (१३.) **तृषारोगावर**--पाण्यांत साखर घालून द्यावी. (१४.) **धुरानें डोळयास विकार होतो** त्यास--गूळ किंवा गुळीसाखर डोळयांत घालावी, ह्मणजे पाणी गळून डोळे चांगले होतात, (१५.) **रेच बंद होण्यास**--खडीसाखर पाण्यांत विरघळून द्यावी (१६.) **गुडघीवर**-- काळया गुळाचा लेप करावा.

## ६२. एरंड.

**स. गु. एरंड. हिं. अरंड, अंड क० औडल, द्राविड. तै. अमुडाल. बं० एरंड. ता० आमाणक्कु. तु. अलंबुड. मला० चित्ता मणक्कु फा० बेदंजीर अ० खिरवा. तु. करचक. इं० Castor oil plant कास्टर ऑइल प्लँट ला० Ricinus communis रिसिनस काम्युनिस.**

या आर्यभूमीमध्यें ईश्वरानें आमच्या सुखाकारितां अनेक उपयुक्त व विपुल वनस्पति उत्पन्न केल्या आहेत, परंतु त्यांजवरील आमची सत्ता आणि त्यांचा पूर्णपणें उपयोग करून घेण्याचें आमच्यांतील सामर्थ्य नष्ट झालें, हा आमच्यावर कालचक्राचा फेराच आला ह्मणावयाचा ! आम्हीं

या कालचक्राच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें, आमच्यापुढें वाढून आलेल्या ताटांतील अन्न देखील आमच्या पोटांत न जातां, परकीय लोक मात्र त्यावर यथेच्छ हात मारीत आहेत ! उत्तमशी पर्जन्यवृष्टि होऊन भरपूर पिकें दरसाल आलीं; तथापि आमच्या शेतकऱ्यांच्या घरांत महिन्या दोन महिन्यांची चंदी शिल्लक राहील ही गोष्ट स्वप्नांतही आणावयास नको ! शेतांत माल तयार झाला, कीं व्यापारी लोकानीं तेथेंच त्याचीं पोतीं भरून तो बंदरावर आणलाच; व तेथून तो आगबोटींत चढून परदेशांत रवाना झालाच ? या कृत्यास दिनावधि मुळींच लागत नाहीं. अशी जर सर्वत्र स्थिति झाली आहे, तर आमची शक्ति कशी वाढावी आणि आमचा भाग्योदय कसा व्हावा ? बरें आह्मीं प्रयत्न केल्यास होण्यासारख्या पुष्कळ गोष्टी असतां, त्या तरी आह्मीं करितों काय ? नाहीं. मग दिवसेंदिवस जास्त जास्त कंगाल स्थिति आह्मांस कां प्राप्त होणार नाहीं ! दरसाल हजारों खंडी एरंड्या आमच्या देशांत उत्पन्न होऊन, त्या परदेशांत रवाना होत आहेत व तिकडून त्यांचें यंत्रांत तेल काढून, उत्तम नीलवर्ण बाटल्यांतून, वर सचित्र विलायती नांव छापून, परकीय लोक, तें तेल आमच्या लोकांच्या घशांत ओतण्या करितां पाठवीत आहेत. तेव्हां त्यांची धन्य ह्मणावी ? कीं आमच्या स्वदेशाभिमानशून्य लोकांच्या मूर्खपणाची धन्य ह्मणावी ! आह्मांस या गोष्टीची कांहीं तरी शरम वाटावी. परंतु तसें कोठें वाटत आहे ? आह्मांस परकीय लोकांच्या तेला इतकें स्वच्छ तेल काढतां येत नाहीं असेंही नाहीं. मग ही गोष्ट आमच्या मनांत कां वागत नाहीं ? व जें तेल आपल्या इकडे बनविल्यास दोन चार पैशांत व्हावयाचें, तेवढ्याच तेलास आह्मीं आज ४ आणे मोठ्या खुषीनें देऊन, तें परकीय तेलच विकत घेतों, या वरून आह्मी सर्वस्वी नागविले जात आहों यांत कांहीं संशय नाहीं. परंतु हा विचार कोणाच्या लक्षांत येत आहे ? बरें हा औषधानिमित्त पोटांत घेण्याच्या तेलाचा प्रकार झाला. जाळण्याच्या सर्व तेलांत स्थिर जळणारें, सतत दिव्याजवळ बसलें तरी डोळ्यांस इजा न करणारें,

आणि स्वस्त पडणारें, असें हें "अल्पमोली आणि बहुगुणी" तेल असतां, या तेलावर आपली भक्ति न बसतां, परकीयांचें, घातुक, रोगोत्पादक, परिणामीं भयंकर आणि प्रसंगीं प्राणनाशक, असें जें **घासलेट** ( राकआईल ) तेल, तेंच आह्मांस हितकर वाटूं लागलें आहे ! ! यावरून आमचा सारासार विचार आणि दूरदृष्टि व्यक्त होत आहेच ! आपल्या देशांतील वस्तु न वापरितां, मुद्दाम परकीय लोकांच्या वस्तु वापरण्यास आमच्या लोकांस लाज कशी वाटत नाहीं ? हा निर्लज्जपणाचा प्रकार जेव्हां नाहींसा होईल, तेव्हांच आह्मांस सुदिन प्राप्त होईल. या करितां हें एरंडवृक्षवर्णन "एरंडाचें गुऱ्हाळ" याप्रमाणें न समजतां, एरंडतेलाप्रमाणेंच परिणामीं हितकर समजावें. एरंडांत **तांबडा व पांढरा** अशा दोन जाती असून एक मळेएरंड व दुसरा जिराइतांत होणारा **वर्षायु** एरंड, अशाही दोन जाती आहेत. मळेएरंड पांच दहा वर्षेंही वांचतो जिराइती एरंडाच्या बिया ( एरंड्या ) बारीक असतात. परंतु मळे एरंडाच्या एरंड्यांपेक्षां त्यांचें तेल अधिक निघतें. एरंडेलतेल हें रेचक असून इतर रेचकाप्रमाणें हें तीव्र नसल्यामुळें लहान मुलांसही देण्यास हरकत नाहीं. पुष्कळ रोगांवर आरंभीं हें रेचक देतात. **पांढरा एरंड**–तिखट, तीक्ष्ण, उष्ण, गुरु, मधुर, कडू, वृष्य, जड, स्वादु, सारक असा आहे, व वायु, उदावर्त, कफ, ज्वर, खोकला, उदर, सूज, शूल, व कंबर, बस्ति मस्तक यांतील शूल, दमा आनाहवायु, कोड, वर्ध्मरोग, गुल्म, प्लीहा, आमपित्त, प्रमेह, उष्णता, वातरक्त मेद, व अंत्र वृद्धि यांचा नाश करितो. याचा भेद मोठा पांढरा एरंड, रसकाळीं व पाककाळीं गुणांनीं अधिक आहे. **तांबडा एरंड**–तुरट, रसकाळीं तिखट, लघु, कडू, असा आहे, व वायु, कफ, दमा, खोकला, कृमि, अर्श वर्ध्मरोग ( वळ ) रक्तदोष, पांडु, भ्रांति, अरुचि, यांचा नाश करितो. वरकड गुण पांढऱ्या एरंडासारखे आहेत. या दोहोंचीही पानें-वातपित्ताला वाढविणारीं, व मूत्रकृच्छ्र, वायु, कफ, कृमि, यांचा नाश करितात. याचे कोवळे अंकुर–गुल्म, बस्तिशूळ, कफ, कृमि, वायु, सात

प्रकारचा वृद्धिरोग यांचा नाश करितात. याचें फूल–वायु, कफ, पित्त, मूत्रकृच्छ्र, यांचा नाश करितें; व रक्तदोष, पित्त, यांना वाढवितें. याचे बियांचे गोळे अग्निदीपक, अति उष्ण, तिखट, गोड, खारट, स्निग्ध सारक, मळभेदक, लघु असे आहेत. व गुल्म, शूल, कफ, यकृत्, वातोदर, प्लीहा, आणि वातार्श यांचा नाश करितात. **एरंडतैल**–मधुर, सारक उष्ण, गुरु, अरुचिकर, स्निग्ध, कडू असें आहे, व वर्ध्म (वळ) उदर, गुल्म, वायु, कफ, सूज, विषमज्वर, व कंबर, पाठ, पोट, गुद, यांतील शूल, यांचा नाश करितें. ( १. ) **शूळावर**–एरंडमूळाचा काढा, हिंग व पादेलोण घालून द्यावा. ( २. ) **कुक्षिशूळावर**–एरंडमूळाचे काढ्यांत जवाखार घालून द्यावा. ह्मणजे कुक्षिशूळ, कफशूळ, उरांतील व पाठींतील शूळ हे बरे होतात. ( ३. ) **कामिणीवर**–एरंडाचा रस व पिंपळीचें चूर्ण हुंगावयास द्यावें. ( ४. ) **डोळे येतात त्यावर**–एरंडेलाचा जुलाब द्यावा. ( ५. ) **गळवें होतात त्यांस**–एरंडमूळ वाटून तेलांत अथवा तुपांत कालवून उष्ण करून लेप करावा. ( ६. ) **विसर्प व नायटे यांवर**–एरंडेल तुपांत द्यावें. ( ७. ) **लहान मुलांची टाळू उडते त्यास**–एरंडाचें पान तूप घालून टाळवेवर बसवावें. ( ८. ) **रेच होण्यास**–चांगलें एरंडेल २ तोळे पर्यंत उष्णोदकांतून अगर सुंठीच्या अथवा त्रिफळ्याच्या काढ्यांतून द्यावें. ( ९. ) **अंगांतील उष्णतेवर**–हें तेल टाळवेवर चोळावें. ह्मणजे मस्तकांतील गर्मी निघून डोळ्यांस तेज येतें. हातापायांचा दाह व नायट्यासारखे चट्टे झाल्यास त्यांवर ही एरंडेल तेल थंड पाण्यांत घालून चोळावें. मस्तकांतील उष्णता निवण्यास एरंडाचें पानास लोणी अगर साजुक तूप लावून तें टाळवेवर बसवावें. ( १०. ) **धोतऱ्याचे विषावर**–लाल एरंडाचें मूळ पाण्यांत वांटून द्यावें. ह्मणजे धोत्र्याचें विष उतरतें व भ्रमनाश होतो. ( ११. ) **संधिवातावर**–एरंडेल चोळावें. ( १२. ) **सारा फुलें झडण्यास**–लाल एरंडाचा चीक डोळ्यांत घालावा. ( १३. ) **वृषणरोगावर**–एरंडेल दुधांतून अगर गोमूत्रांतून द्यावें व लेपही करावा.

( १४. ) **रक्तपित्तीवर**–एरंड्या, अडूळसा, गुळवेल यांचा काढा करून त्यांत एरंडेल घालून द्यावा. ( १५. ) **पोटांतील वायूवर**–एरंडेल सुंठीच्या काढ्यांतून द्यावें. (१६.) **आमवातावर व गृध्रसीवायूवर**– ह्मणजे पाठ, कंबर, मांड्या, गुडघे, पोट, पाय यांचे ठिकाणीं शूळ व पीडा होते त्यावर; एरंड्यांतील गोळे वाटून दुधांत कालवून आटवून खवा करून द्यावा; अथवा एरंडेल नुसतेंच अगर गोमूत्रांतून द्यावें. ( १७. ) **मुलाचे ससणीवर**–विड्याच्या पिकल्या पानास एरंडेल लावून शेकून तीं कोमट कोमट पोटावर ठेवावीं व तशा पानानें पोट शेकावें. (१८.) **मुलांचे कृमि व जंतांवर**–एरंडेल ऊन्ह पाण्यांत द्यावें अथवा एरंडाचा रस मधांत द्यावा. ( १९. ) **विंचवावर**–एरंडाच्या पानांचा रस काढून तो ज्या आंगाच्या भागास दंश झाला असेल, त्याच्या विरुद्ध आंगाच्या कानांत घालावा. व कांहीं वेळ तसाच राहूं द्यावा. या प्रमाणें २।३ वेळ करावें ह्मणजे विष उतरतें. (२०.) **भस्मकरोगावर**–दुधांत अथवा तुपांत एरंडेल द्यावें. ( २१. ) **दम्यावर**–२॥ तोळे एरंडेल ५ तोळे मधांत मिश्रण करून ठेवावें. त्यांतून सकाळ संध्याकाळ एकेक चमचा घेत जावा. ( २२. ) **सर्पदंशावर**–एरंडाच्या पानांचा रस ४ चमचे, चमचाभर पाणी घालून द्यावा, व दंशावर पाला वांटून लावावा, वमन होऊन विष उतरेल. ( २३. ) **झोंप येत नसल्यास**–एरंडाचा मोहोर बारीक वाटून, थोडें दूध घालून कपाळास व कानशिलांस चोळावा फार घासूं नये. ( २४. ) **गंडमाळांवर**–एरंडमूळ व पळसाचें मूळ तांदुळाचे धुणांत उगाळून लेप करावा. ( २५. ) **सुखप्रसूति होण्यास** एरंडमूळ तुपांत उगाळून पोटांत द्यावें व गुह्यांगासही लेप करावा. (२६.) **कामिणीवर**–मळे एरंडाच्या बिऱ्या दह्यांत वांटून द्याव्या. दि० ३।७ यानें जरा कैफ येईल; अ० एरंडमूळ मधाशीं द्यावें. ( २७. ) **पीनसरोगावर**–एरंडेल कढवून ठेवावें व ज्या नाकांत पीनस झाला असेल त्या नाकपुडींतून दिवसांतून बरेच वेळ ओढावें. ( २८. ) **योनिशूलावर**– एरंडमूळ व सुंठ हीं उगाळून योनीवर लेप करावा. ( २९. ) **नळ फुग-**

**ल्यास**-एरंडेल २ चमचे घेऊन सैंधव १ तोळा, पादेलोण १ तोळा व-गाईचें दूध तोळे तीन, हीं एकत्र करून घ्यावीं. ( ३०. ) **ऊरुस्तंभ व गृध्रसी वायूवर**-एरंडेल गोमूत्रांत घालून द्यावें. ( ३१. ) **बालकास रेचक**--एरंड्या व उंदराच्या लेंड्या यांचें चूर्ण निंबाच्या रसांत खलून, त्याचा बालकाच्या गुदावर व बेंबीवर लेप द्यावा. ( ३२. ) **कांचेची पूड पोटांत गेल्यास**-तीन तोळे एरंडेल प्यावयास द्यावें. ( ३३. ) **पित्तरोगावर**-गाईचे दुधांत एरंडेल द्यावें ( ३४. ) **मस्तकशूळावर** एरंडमूळ माक्याच्या रसांत उगाळून नाकांत घालावें. आणि तपकिरीसारखें ओढावें, ह्मणजे शिंका येतील. ( ३५. ) **कामिणीवर**--एरंडाचे झाडाची साल २ तोळे काढून गाईचें निरसें दूध चार तोळे छाणून रस काढावा, व नित्य एक वेळ प्रमाणें ५ दिवस घेतल्यानें कसाही दुर्धर रोग असला तरी शमन होतो. अथवा कोंवळ्या ढिऱ्यांचा ६ मासे रस दुधांतून घ्यावा. पथ्य ३ दिवस आळणी करावें. ( ३६. ) **ओंठास भेगा पडतात त्यास**-रात्रौ ओंठास एरंडेल चोळावें. (३७.) **आमवातावर**-एरंड्यांतील मगज व सुंठ समभाग घेऊन एकत्र कुटून, त्यांत तितकीच पिठीसाखर घालून गोळ्या करून ठेवाव्या. ही गोळी नित्य प्रातःकाळीं एक याप्रमाणें सतत घेत जावी. अथवा एरंडेल सुंठीच्या काढ्यांतून घ्यावें ( ३८. ) **कटिशूळ व हृद्रोगावर**-एरंडमूळाचा काढा, जवाखार घालून द्यावा. ह्मणजे हृदय, कुशी, कंबर या ठिकाणचे शूळांचा नाश होतो. ( ३९. ) **कानांत गोमाशी वगैरे गेल्यास**-जुनें दाट झालेलें असें एरंडेल १।२ दि० कानांत घालावें; ह्मणजे गोमाशी मरते. मग ती युक्तीनें बाहेर काढावी. ( ४०. ) **गुल्मरोगावर**-निरसे दुधांत एरंडेल मिश्र करून सेवन करावें. ( ४१. ) **ज्वरानें अतिशय दाह झाल्यास**-एरंडाचीं पानें सारवलेल्या भूमीवर पसरून ठेवावीं आणि तीं रोग्याच्या अंगावर वाळावीं: तेणेंकरून त्याचा ज्वर शांत होतो व दाह शांत झाल्यावर थंडी वाजूं लागते, ती युक्तीनें निवारण करावी. ( ४२. ) **प्लीहोदरावर**-मुळें, पानें यासुद्धां एरंडाचें झाड मडक्यांत

भरून, तोंड बंद करून ओंव्याचें पूट द्यावें. नंतर कुटून तें भस्म १ तोळा घेऊन चार तोळे गोमूत्राशीं प्यावें ( ४३. ) **गर्भिणीस वायूचा उपद्रव होऊं नये व प्रसूति वेळीं कष्ट होऊं नयेत ह्मणून**-एरंडमूळ, सुंठ व बाळंतशेपा यांचा काढा द्यावा.

## ६३. एरोदस.

यास गोड ओंवा असेंही ह्मणतात. हा ओंवा खाण्यास गोड लागतो. ओंव्याप्रमाणेंच याचा आकार असतो. हा ओंवा पर्शिया देशाकडून इकडे येतो. याचा उपयोग इकडे अलीकडे बराच होऊं लागला आहे. ( १. ) **कृमीवर** ( जंतांवर ):-एरोदसाचें चूर्ण मधांत द्यावें. ( २. ) **मुलाच्या ज्वरावर व खोकल्यावर**:-एरोदस टांक १, बडीशेप टांक १, यांची भुकटी करून कोरफडींत घालून ऊन्ह करून, त्याचा बळक काढून तो मधांत घालून चाटवावा.

## ६४. ओंट.

**सं. लकुच. गु० ओटफळ. हिं० बडहर, बढारफळ. क० आंजणु. बं० मादर, ला०**Artocarpus Lakoocha **अर्टो कारपस् लकुच.**

हीं झाडें गोमांतक व कर्नाटक या प्रांतांत बहुतकरून होतात. दुसऱ्या ठिकाणीं कोठें आढळत नाहींत. ओंटाचे झाड मोठें होतें. याचीं पानें फणसाच्या पानांपेक्षां कांहीं आंखूड असतात. यास कार्तिकमासीं फळें येऊं लागतात,त्यांस ओंटआंबे ह्मणतात.हीं फळें जून झालीं ह्मणजे त्याच्या लहान लहान कापट्या करून सुकवितात. त्यांस ओंटाचीं सालें असें ह्मणतात. त्यांचा चिंचेबद्दल अथवा कोकमाबद्दल फार खप होतो. ओंटाचीं सालें पथ्यास उपयोगी पडतात; कारण तीं पित्तशामक आहेत. हीं आमसोलापेक्षांही पथ्यकारक आहेत. आमसोलें रक्तशोषक आहेत; परंतु हीं रक्तवृद्धि करणारीं आहेत. ओंटाचें लांकूड इमारतीकामास उपयोगीं पडत नाहीं. पिकलेल्या ओंटाचें रायतें व लोणचें फार मधुर होतें व ताज्या पक्क ओंटाचें पाणी काढून, त्यांत पिठीसाखर, जिरें व मिरपूड घालून माशन

केलें असतां, शीघ्रपित्तशामक, पथ्यकर, रुचिदायक, दीपक व पाचक आहे. प्रसूतीस्त्रियांस ओंटाचें सार पथ्यकर आहे.

## ६५. ओंवा.

**सं. यवानी, यमानी. गु. यवान. हिं. अजवान. बं०-यमानी, योयन. क० अजवान ओमु, ओडु तै०-ओमामु. ता०- ओमं तु०-ओमा० मळा ओमं. फा० नानुखा. अ०-कमूनमुलुकी. इं०-**Bishops. weed seed **बिशप्स वीड सीड. लाटिन०**Carum copticum **करम् कोपटिकम्.**

ओंवा बागाइतांत होतो. याचीं झाडें सुमारे हात दीड हात उंच वाढतात. ओंवा प्रसिद्ध आहे. याचा औषधांत पुष्कळ उपयोग होतो. ओंव्यांतून एक सत्व काढितात, त्यास ओंव्याचें फूल असें ह्मणतात. हें मध्यहिंदुस्थानांत उज्जनी येथें काढितात. **ओंवा**-तिखट, कडू, रुचिकर, उष्ण, अग्निदीपक, पाचक, पित्तकर, तीक्ष्ण, लघु, हृद्य, सारक, वृष्य असा आहे, व वातार्श, कफ, शूळ, आध्मान, वांति, कृमि, शुक्रदोष, उदर, आनाह, हृद्रोग, प्लीहा, गुल्म, ढंढजरोग व आमवात यांचा नाश करितो. **( १. ) पोटदुखी, नळ, खोकला व अजीर्णावरः**-ओंवा खाऊन वर उन्ह पाण्याचा घोट घ्यावा. **( २. ) शीतपित्तावरः**-गूळ व ओंवा खावा. **( ३. ) पडसें व मस्तकशूळावरः**-ओंव्याचें चूर्ण करून तें वस्त्रांत बांधून हुंगण्यास द्यावें, अ० ओंव्याची विडी करून ओढावी. **( ४. ) बहुमूत्रावरः**-ओंवा व तीळ एकत्र करून द्यावे. **( ५. ) उष्णतेवरः**-ओंवा साखरेशीं द्यावा. **( ६. ) खोकला, कास व कफज्वर यांवरः**-ओंवा, पिंपळी, अडूळसा व खसखशीचीं बोंडें यांचा काढा द्यावा. **( ७. ) कफगुल्मावरः**-ओंव्याचें चूर्ण व बिडलोण ताकांत घालून द्यावें.

## ६६. ओंवा पानाचा.

ओंव्यांत पुष्कळ भेद आहेत. ज्या झाडावर बीं येत नाहीं, त्यास पानओंवा ह्मणतात. याचें झाड पसरट असून हात दीड हात उंच वाढतें. याचीं पानें जाड असतात. या पानांस वास ओंव्याप्रमाणें येतो. हीं झाडें पर्जन्य-

काळीं, याच्या फांद्या लावल्यानें होतात. यावर फळ किंवा बीं येत नाहीं. या पानांचीं भर्जी फार सुरेख होतात. ( १. ) **जंतांवरः**–याच्या पानाचा रस काढून पाजावा. ( २. ) **कानेटीचा दंश झाल्यासः**–याचीं पानें चुरून दंशस्थानीं चोळावीं म्हणजे जरा चटका बसल्यासारखें होऊन वेग त्वरित बंद होतात.

**भाग १ ला समाप्त.**

इति

**वनौषधी–गुणादर्श**

समाप्त.

"आर्यभिषक्" पुस्तकावलि, अंक ४ था.

श्रीशंकर.

# वनौषधी-गुणादर्श.

## भाग २ रा.

औषधीनां परां प्राप्तिं कश्चिद्वेदितुमर्हति ।
योगज्ञस्तस्य रूपज्ञस्तासां तत्वविदुच्यते ॥

चरकसंहितायां महर्षिरग्निवेशः ।

मुंबई.

"श्रीगोवर्धन मुद्रालयां" त छापविलें.



सन १९००—शके १८२२.

आवृत्ति दुसरी.

किंमत १ रुपया.

## उपक्रम.

आर्यवैद्यकाप्रीत्यर्थ जें काय करावेंसें वाटलें, त्यांत वनस्पतींचें ज्ञान हा एक महत्वाचा भाग वाटल्यावरून, त्यासंबंधानें आमचे मित्र रा. मुरलीधर एकनाथ केमकर यांनीं १५।२० वर्षे रानावनांत हिंडून जे परिश्रम केले, त्याच्याच संगतीनें आह्मी हा प्रयत्न आणखी जोरानें चालण्याकरितां हातीं धरून, परमेश्वरानें शक्ति दिली त्याप्रमाणें--या कामीं शोध, शास्त्र व व्यवहार इत्यादिकांची योग्यता मनांत आणून " वनौषधी-गुणादर्श " या नांवाखालीं भागरूपानें हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें सुरू केलें असून, त्याचा हा दुसरा भाग आहे. आणि ही त्याची दुसरी आवृत्ति आहे.

१०१७

## अर्पणपत्रिका.

श्रीमन्महाराज सरकार सयाजीराव

गायकवाड,

सेनाखासखेलसमशेरबहादर, राज्य बडोदें.

महाराजांची देशहितैक बुद्धि,

उदार व रसिक अंतःकरण,

देशसुधारणेचे उत्कट यत्न, विद्या-

प्रसाराविषयीं अत्यंत आस्थापूर्वक वर्तन, इ० इ० इ०

अनेक सद्गुणांनां लुब्ध होऊन हें पुस्तक,

महाराजांचे सेवेसीं.

अत्यंत पूज्य व सप्रेम बुद्धीनें, आज्ञेनुसार

सादर करीत आहें.

श्रीशंकर.

# वनस्पतींची वर्णवार अनुक्रमणिका.

# विस्तृत अनुक्रमणिका.

## भाग २ रा.

| रोग. | वनस्पती. | उपचारांक. |
|---|---|---|
| गांठ पिकण्यास | कांदा | २८ |
| गांठीवर | कळलावी | ४ |
| ,, | कुहिरी | ९ |
| ,, | गुंज | १७ |
| गांधील माशी-च्या दंशावर | कांदा | १४ |
| गालगुंडावर | कडू भोंपळी | १ |
| ( गु. ) | | |
| गुडघीवर | कांकडी | २ |
| गुदभ्रंशावर | कमळ | १ |
| गुरांचें अंग बाहेर येतें त्यास | कळलावी | ६ |
| गुरांचें कुंद रोगावर | कुडा | १५ |
| ,, मूत्रावरोधावर | केळ | २० |
| गुरांस लागरोग होतो त्यास | काजू | २ |
| ,, शेंबारोग होतो त्यास | कांदा | ३० |
| ,, सोमल घातल्यास | केळ | १८ |
| गुल्मावर | कोष्ठ | २ |
| ,, | खोरेती | ७ |
| ,, | गुळवेल | २४ |
| गुलकंद करण्याची कृति | गुलाब | २ |
| गुलाबी अत्तर-काढण्याची कृति | ,, | ३ |
| गुलाबी सरबत | गुलाब | ४ |
| गुळवेलीचें सत्व काढण्याची कृति | गुळवेल | ० |
| ( गो. ) | | |
| गोम चावल्यास | काळी खजूर | ३ |
| ,, | गुग्गुळ | ५ |
| गोमाशा वगैरे कानांत गेल्यास | कासविंदा | ६ |
| ( गं. ) | | |
| ग्रंथिरोगावर | कापूरभेंडी | ,, |
| ,, | गुंज | १७ |
| गंडमाळेवर | कडू भोंपळी | ४ |
| ,, | कळलावी | ३ |
| ,, | कांचन | १ |
| ,, | कापशी | ४ |
| ,, | कापूरभेंडी | ६ |
| ,, | कुलित्थ | २ |
| ,, | गुंज | २१ |
| गंडमाळा फुटण्यास | कांचन | ४ |
| ( घा. ) | | |
| घांटसर्पावर | खुळखुळा | २ |
| घाम बंद होण्यास | कुलित्थ | ४ |
| घाम येण्याकरितां वाफारा | गवती चहा | ,, |
| ( घु. ) | | |
| घुशी कमी होण्यास | काजरा | ६ |

| रोग | वनस्पति. | उपचारांक. |
|---|---|---|
| अपाळाचे किड्यावर | कोथिंबीर | ११ |
| **( जं. )** | | |
| जंतांवर | कडू कारेळें | ६ |
| ,, | कापूर | ८ |
| ,, | कारली | १० |
| ,, | कांसाळू | १२ |
| ,, | कुहिरी | १ |
| ,, | गुळवेल | १२ |
| **( ड. )** | | |
| डब्यावर | कोरफड | १४ |
| ,, | खोरेती | ४ |
| डब्याचा उपद्रव न होण्यास ,, | ,, | ६ |
| **( डा. )** | | |
| डांग्या खोकल्यावर | कोलिंजन | १ |
| **( डो. )** | | |
| डोक्यांस काई लागले त्यांस | गुंज | ४ |
| डोकें दुखत असल्यास | अफूचेउपयोग | ,, |
| डोळ्यांची आग होते किंवा तेज कमी झालें तर | गुलाब | ५ |
| डोळ्यांची गर्मी निघण्यास | ,, | १० |
| डोळ्यांतील फूल झडण्यास | कांकड | २ |

| रोग | वनस्पती. | उपचारांक. |
|---|---|---|
| डोळ्यांत फूल पडतें व सारा येतो त्यांवर | कांटे धोत्रा | ५ |
| ,, | कापूर | १० |
| डोळे खरडू लागल्यास | कांदा | १९ |
| डोळे येतात त्यास | कळंब | २ |
| ,, | कांटेधोत्रा | ६ |
| ,, | कांदा | २९ |
| ,, | कोरफड | ५ |
| ,, | अफूचे उप० | ६ |
| **( त. )** | | |
| त्वग्दोषावर | गुलाब | ९ |
| ,, | ,, | ११ |
| त्रिदोषावर | कचोरा | १ |
| त्रिदोषजनित वांतीवर | गुळवेल | १८ |
| तिडक्या प्रमेहावर | कमळ | ३ |
| ,, | खैर | ६ |
| तिमिर रोगावर | गुंज | २२ |
| तिमिरादिक नेत्ररोगांवर | गुळवेल | ५ |
| **( तृ )** | | |
| तृषेवर | कोथिंबीर | ,, |
| ,, | ,, | १८ |
| **( तो. )** | | |
| तोंड आलें तर | कोरांटी | ५ |
| **( तं. )** | | |
| तंबाखू लागली तर | कांदा | १० |

| रोग. | वनस्पती. | उपचारांक. |
|---|---|---|
| पान्यास उतारा | कासविंदा | ४ |
| पालीच्याविषास | करटोल | १ |
| ( पि. ) | | |
| पित्त पडण्यास | कडू निंब | ५ |
| ,, | करंज | ,, |
| ,, | काळी खजूर | १ |
| पित्तज्वरांत अतिशय दाह होतो त्यावर | कडू निंब | ९ |
| पित्तज्वरावर | कडू पडवळी | ८ |
| ,, | कमळ | ५ |
| ,, | कोथिंबीर | ८ |
| ,, | गुळवेल | ६ |
| पित्त शमन होण्यास | कवठ | १ |
| ,, | खजूर | ७ |
| पित्तप्रदरावर | गुळवेल | १५ |
| पित्तावर | कडू निंब | २४ |
| ,, | ,, | ३४ |
| ,, | कांगोणी | २ |
| ,, | कांदा | ३२ |
| ,, | केळ | १९ |
| ,, | कोगांटी | ३ |
| ,, | गुळवेल | ६ |
| पित्ताचा विकार झाल्यास | कारली | १ |
| ,, | कांसाळू | ६ |
| ,, | खैर | १२ |
| ,, | गुलाब | ७ |
| ,, | गुळवेल | ,, |

| रोग. | वनस्पती. | उपचारांक. |
|---|---|---|
| पित्तापस्मारावर | कारिवणा | ३ |
| पिसाळलेल्या कुत्र्याच्या विषावर | कडू दोडकी | २ |
| ,, | केळ | ,, |
| पिस्वा जाण्यास | गंगावती | २ |
| ( पी. ) | | |
| पीनस रोगावर | केशर | ३ |
| [ पु. ] | | |
| पुरुषत्व गेलें असल्यास | कांदा | २० |
| पुष्टतेस | कलिंगड | १ |
| ,, | खटखटी | ,, |
| ,, | खसखस | ५ |
| ,, | गुलबाशी | २ |
| पुष्टिदायक | कोळसुंदा | ६ |
| पुष्पावरोधावर | कळलावी | ८ |
| ( पू. ) | | |
| पू-परम्यावर | कपूरीमधुरा | १ |
| ( पे. ) | | |
| पेरें याजवर | कडू निंब | ४० |
| ( पै. ) | | |
| पैणीस | गुंज | १० |
| ( पो. ) | | |
| पोटफुगीवर | खसखस | ४ |
| पोटदुखीवर | कडू कारेळें | ७ |
| ,, | कापूरवेल | १ |
| ,, | कारिंदा | ४ |
| ,, | किराईत | ३ |
| ,, | गवती चहा | २ |
| ,, | गिंधान | ३ |

| रोग. | वनस्पती. | उपचारांक. |
| --- | --- | --- |
| वलीपलित रोगास | गुळवेल | २८ |
| वळ पिकण्यास | कांदा | ,, |
| वळावर | गुलछबु | २ |
| (वा.) | | |
| वाघचवड्यास | कोरफड | ७ |
| वाट सरल्यास | कुसर | १ |
| वातगुल्मावर | कुडा | २२ |
| वातज्वरावर | ,, | १७ |
| वातजमस्तकशु० | कारटोल | ११ |
| वातापित्त-प्रदरावर | खिरणी | २ |
| वातरक्तावर | खटखटी | ३ |
| ,, | गुळवेल | १४ |
| वातरोगावर | कोरांटी | ९ |
| ,, | कोष्ठ | ४ |
| वातशूलावर | कुडा | १४ |
| ,, | गुळवेल | २० |
| वांतीवर | कावळी | ४ |
| ,, | कुटकी | ३ |
| वायूचा विकार न होण्यास | कुलित्थ | १ |
| वायूनें अंग धरल्यास | कोलिंजन | ३ |
| वायूवर | कांडोळ | ५ |
| ,, | कुडा | २२ |
| ,, | गुंजा | १६ |
| ,, | गुळवेल | ५ |
| वासरांस दुगधा रोग होतो त्याज० | कडु कारेलें | ९ |
| (वि.) | | |
| विंचवाचे दंशावर, विषावर | कडू निंब | ४४ |
| ,, | कण्हेर | १ |
| ,, | करटोल | ७ |
| ,, | कांटेधोत्रा | १ |
| ,, | कांदा | ८ |
| ,, | कापशी | १० |
| विंचवाचे दंशावर, विषावर | कापूर | १ |
| ,, | कोरांटी | ११ |
| विटाळ येण्यास | खोरेती | १ |
| विषमज्वरावर | कडू निंब | १३ |
| ,, | ,, | ४१ |
| ,, | ,, | ४२ |
| ,, | कण्हेर | ३ |
| ,, | कपुरीमधुरी | २ |
| ,, | करवंद | ५ |
| ,, | कोथिंबीर | ६ |
| ,, | कोरफड | १ |
| ,, | खुरासनी ओंवा | |
| , | गुळवेल | ,, |
| विषमावर | कचोरा | १ |
| विषाराची परिक्षा | करवंद | ,, |
| विषावर | कडु दोडकी | ७ |
| ,, | कडु पडवळी | १० |
| विषूचीवर | कारली | ६ |
| विसर्पावर | किंजल | ५ |
| विस्फोट रोगावर | | ,, |

| रोग | वनस्पती. | उपचारांक |
|---|---|---|
| स्वरभंगावर | कोलिंजन | ९ |
| सर्दीवर | गवती चहा | ३ |
| सर्पाच्या विषावर | कडू निंब | ४ |
| ,, | कण्हेर | १ |
| ,, | ,, | ७ |
| ,, | करटोल | ५ |
| ,, | करवंद | ४ |
| ,, | कळलावी | १० |
| ,, | कापशी | ३ |
| ,, | कापूरभेंडी | १ |
| ,, | गुंज | २३ |
| ,, | गुळवेल | २ |
| सर्पाच्या बिषावर | गुळवेल | १६ |
| ,, | ,, | २४ |
| सर्पाचें विष कधींही न बाधण्यास | कडू निंब | १८ |
| सर्व ज्वरांवर | कडू कारेळे | ११ |
| ,, | कडू पडवळी | ३ |
| ,, | गुळवेल | १७ |
| सर्व नेत्ररोगांस | ,, | २५ |
| सर्व प्रकारच्या विषावर | कडू घोंसाळी | १ |
| ,, | कडू निंब | २८ |
| ,, | कडू भोपळी | २ |
| ,, | करटोल | ६ |
| ,, | कुडा | ,, |
| सर्व प्रकारचे गर्मीच्या रोगावर | किराईत | १ |

| रोग | वनस्पती. | उपचारांक |
|---|---|---|
| सर्व प्रकारचा अतिसार, संग्रहणी पांडुरोग, जीर्ण ज्वर, यांवर कुडेपाक | कुडा | १६ |
| सर्व प्रकारच्या उष्णतेवर | केवडा | ५ |
| सर्व प्रमेहांवर | गुळवेल | ३ |
| सर्व मर्मस्थानचे रोगांस | ,, | २१ |
| सर्व व्रणांवर | कडू निंब | २९ |
| सर्व व्याधींस | गुळवेल | २२ |
| सर्व वातविकारांवर | कासाळूं | ११ |
| ,, | गुळवेल | २१ |
| सर्वातिसारावर | कुडा | १९ |

(सा.)

| रोग | वनस्पती. | उपचारांक |
|---|---|---|
| स्थावर व जंगम सर्व विषावर | कोहोळा | १ |
| साधारण सर्व ज्वरांवर | किराईत | २ |
| सांधा लचकतो त्यास. | खसखस. | ३ |
| सामान्य विषावर | कांटेधोत्रा. | २ |

(सि.)

| रोग | वनस्पती. | उपचारांक |
|---|---|---|
| स्त्रियांच्या रजोदोषावर. | कांडवेल. | २ |

समाप्त

## मुंबई, नवा नागपाडा, आर्यभिषक्कार्यालयांत विक्रीचीं पुस्तकें.

### वनौषधी गुणादर्श.

**सहाशांवर वनस्पतींची विगत- वार माहिती दिलेले सहा भाग.**

भाग १ ला किं. १२ आणे, भाग २ रा. १ रु. भा. ३ रा. १। रु. भा. ४ था १॥ रु. भा. ५ वा १। रु. भा. ६ वा १२ आ. ट. हा. प्र. १ आणा.

---

### बृहन्निघंटु.

औषधींचीं नांवें प्रत्येक औषधीस सुमारें बावीस तेवीस भाषांचीनांवें यांत दिलेलीं असून, कित्येक वनस्पतींच्या विशेष बाबतींची माहितीही टीपांमधून दिली आहे किंमत फक्त दीड रु. ट. १ आ.

---

### औषधीगुणदोष.

किं. १॥ रु. टपालखर्च १ आणा.

---

### निघंट शिरोमणि

भाग १ ला १२ आणे, भाग २ रा १॥ रु. ट. १ आ.

### सुबोधवैद्यक.

पू. कि. ८ आणे, उत्तरार्ध १ रु. ट. आ.

---

**महर्षि आत्रेयांनीं सांगितलेली**

### सार्थहारीतसंहिता.

किंमत १। रुपया. ट. १ आ.

---

**स्त्रियांकरितां अत्यंत उपयुक्त पुस्तक.**

### गर्भारपण बाळंतपण.

किंमत १ रु. ट. १ आणा.

---

### नपूंसकमीमांसा.

आणि

### कामसंजीवन

किं. १॥ रु. ट. १ आ.

---

### सार्थ श्री चरकसंहिता.

चित्रांसहित छापण्याचें सुरू केलें आहे. भागरूपांनीं तें सुरू आहे. **सूत्रस्थान**, पूर्वार्ध किंमत २ रु. **कल्पस्थान**, किंमत १४ आणे. बाकी भाग छापत आहेत. ट. १ आ,

### बृहत्पाकसंग्रह.

यांत सर्व प्रकारचे पाक सांगितले आहेत. किंमत फक्त दीड रु. ट. १ आ.

### रसवैद्य.

किं. १२ आणे ट. १ आ.

**अष्टांगहृदय, वाग्भट, मूळ**, किं १ रुपया.

**औषधीक्रिया** किं. ८ आणे.

**सार्थ योगशतक**--किं. ४ आणे.

**सार्थ वैद्यवल्लभ**--किं. ४ आणे.

**हल्लींचा वीर्यनाश व त्यावर उपाय**—३ आणे.

**औषधीमान-परिभाषा**—किंमत १॥ आणा.

**प्राणिज औषधी**—किं. २ आणे

**गोपरिक्षा**—किं. २ आणे.

**गोवैद्यक**--किं. २ आणे.

**राजवैद्य**—संग्रह १ ला. किं. १२आ.

**आषधी बाड**—किं. २ रु.

**नाडीपरीक्षेचें महत्व**—किं. ३आ.

**ग्रंथिक सन्निपात चिकित्सा**—किं. ६ आणे.

**अश्वरोगपरिज्ञान**—किं. ४॥।.

मुंबई, नवानागपाडा आर्यभिषक्कार्यालय. } **म्यानेजर आर्यभिषक्**

श्रीशंकर.

# वनौषधी—गुणादर्श.

## भाग २ रा.

### १. कचरा. ( सं. कर्चूरकः )

तळ्याच्या आसपास दोनदोन गुढघे ओल अशा चिखलांत एक जातीचें गवत माजलेलें असतें; त्यास लव्हा ह्मणतात. या गवताच्या मुळांस कचरें लागतात. गवत सुकायास लागलें ह्मणजे चिखलांत चार चार प्रहर उभें राहून तें काढून घेतात. कचरे भाजून उकडून खातात. ते सोलून त्यांच्या कपट्या करून दुधांत उंसाच्या करव्यांबरोबर शिजवितात; ते दूध-कचरे, आणखी हे कचरे वांटून त्यांचें दूध काढून त्यांत दुधसाखर घालून त्यांचीं सांधणें करितात. कचऱ्यास "फुरडी" असेंही कोकणांत ह्मणतात.

कचरा—मधुर, शीत, तुरट, गुरु, ग्राहक, शुक्रवर्धक, वातकर, स्तन्यवर्धक, मलस्तंभक, रुचिकर, वृष्य, कफकारक, कृमिकर असा आहे; व रक्तपित्त, दाह, श्रम, तृषा, रक्तदोष, नेत्ररोग, प्रमेह यांचा नाश करितो. याचें फूल, कावीळ व पित्त यांचा नाश करितें.

### २. कचोरा. ( सं. कर्चूरः । गु: कचूरो. हिं. कर्चूर. )

कचोऱ्याचीं झाडें हळदीच्या झाडासारखीं होतात. पानें व झाड हळदीचे झाडाप्रमाणेंच असतें. पान किंचित् काळसर असतें. या पानाची लांबी सुमारें २ हात असते. हळदीप्रमाणेंच याचे कंद जमिनींत सांपडतात. या कंदाच्या काचऱ्या उकडून काढून त्या कोणच्यांत घालतात. कोंकणप्रांतीं हीं झाडें पुष्कळ होतात. कचोरा सुगंधि पदार्थांत घालितात. यास सुवास चांगला असल्यामुळें, ह्या सुगंधि मसाल्यांत वांटून अंगास लावितात. यास "गंधकचोरा" असेंही ह्मणतात. 'कापुरकाचरी' ह्मणून एक कचोऱ्याची जात आहे, तीसही कचोरा ह्मणतात. कापुरकाचरीस सुगंध फार असतो. कचोऱ्यापेक्षां ही महाग असते. सुगंधि पदार्थांत हिचा फार उपयोग होतो.

**कचोरा**—कडू, तिखट, उष्ण, तीक्ष्ण, अग्निदीपक, सुगंधी, रुचिकर, लघु, मुख स्वच्छ करणारा; व रक्तपित्ताला कोपवितो. आणि गलगंड, गंडमाला, कुष्ट, अर्श, व्रण, खोकला, दमा, गुल्म, कफ, त्रिदोष, कृमि, वायु, ज्वर आणि प्लीहा यांचा नाश करितो. **कापुरकाचरी**—तीक्ष्ण, दाहक, तिखट, कडू, तुरट, शीतवीर्य, लघु, किंचित् पित्तकर; व कास, श्वास, ज्वर, शूल, हिक्का, गुल्म, रक्तरोग, वायु, त्रिदोष मुखविरसता, दुर्गंध, व्रण, आम, वांति व हिध्मरोग, यांचा नाश करिते. ( १ ) **त्रिदोष, सूतिकारोग, विषम व जीर्णज्वरावर** काढा—षटकचोरा, पित्तपापडा, देवदार, सुंठ, चिराईत, धमासा, कुटकी, नागरमोथा, डोरलीमूळ, यांचा काढा, मध, व पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा. ( २. ) **जिभेवर बुळबुळीत सारा येतो त्यास**—नित्य सकाळीं निजून उठतांत कचोऱ्याचा ओला कंद चावून थुंकावा. नंतर तोंड धुवावें. म्हणजे झोंपेंत लाळ गळणें वगैरे विकार शमन होतात. ( ३ ) **कृमींवर** कचोऱ्याच्या कंदाचा रस काढून पाजावा. ( ४. ) अंगमर्द व० **शीण** वगैरे आल्यास—कचोऱ्याचा पाला व ऐरणीचा ( टाकळी ) पाला पाण्यांत घालून तें उष्ण करून त्या पाण्यानें स्नान करावें. ( ५. ) **पटकीवर**—कचोऱ्याच्या कंदाचा रस कांद्याच्या रसांत घालून द्यावा. ( ६. ) **कृमीवर**—कचोऱ्याच्या कंदाचे काप काढून त्यांची माळ करून गळ्यांत बांधावी.

## ३ कडवी कवठ.

**हीस ‘ खष्ट ’ ‘खैट ’ असेंही म्हणतात. कडव्या कवठीचीं झाडें दक्षिणकोंकण, गोवें व मलबार या प्रांतांत पुष्कळ आहेत. या झाडाचीं पानें शिताफळीच्या झाडासारखीं परंतु त्यांहून आंखूड असतात. याचीं फळें शिताफळीसारखीं असतात. या फळांचा रंग तांबूस असतो. यांतील बिया लांबट असतात. या बियांचें शिजवून तेल काढितात. हें तेल कडु व थंड आहे. हें तेल जाळण्याच्या उपयोगीं पडतें. हें रक्तशुद्धिकर आहे. या तेलास “ खष्टेल, खैटेल ” असें म्हणतात.**

( १ ) **गर्मीचा आजार अंगांत भिनल्यानें अंगावर चट्टे उठतात त्यास** कडव्या कवठीच्या बिया आणि मुगवेलींच्या बिया समभाग साधारण कुटून माक्याच्या अंगरसांत तीन दिवस भिजत घालाव्या व चवथे दिवशीं बारीक वांटून गोळा करून ठेवावा. हें उटणें नित्य चंदनी तेलांत अगर नारळाचे आव्येल तेलांत कालवून लाविल्यानें अंगावर उठलेल्या पुटकुळ्या मावळतात. औषध लावल्यानंतर एक प्रहरानें स्नान करावें. (२.) **खवडे, खरूज इत्यादिकांवर**—कडव्या कवठीच्या बियांचें तेल व मोगली एरंडांचें तेल हीं दोन्हीं एकत्र करून त्यांत गंधक, कापूर, शेंदूर व निंबाचा रस घालून खल करावा. हें औषध लावल्यानें त्वरित गुण येतो. अ० नुसतें खष्टेल

लावावें किंवा बिया गोमूत्रांत वाटून लावाव्या. ( ३ ) लहान मुलांचे डोक्यांत उष्ण-तेनें फोड येतात त्यावर—कडव्या कवठीच्या तेलांत कळीच्या चुन्याची निवळ घालून काडीनें ढवळित रहावें; ह्मणजे कांहीं वेळानें तें तेल लोण्यासारखें सफेत होतें. हें नित्य चार वेळ लावावें; ह्मणजे तीन दिवसांत गुण येतो. ( ४. ) **महाकुष्ठावर**—कडव्या कवठीचें तेल नित्य भोजनोत्तर १०—२० थेंब याप्रमाणें तीन महिनेपर्यंत द्यावें, व अंगासही हें तेल चोळावें; ह्मणजे हा रोग नाहींसा होतो.

## ४. कडवंची. ( सं. कटुहुंची. )

**कडवंचीचे वेल असतात. याचीं पानें लहानसर असतात. कडवंचीचे वेल देशावर होतात. जोंधळ्याच्या शेतांत यांची फार उत्पत्ति होते. या वेलाच्या मुळाशीं कांदा असतो. वेल सुकल्यावर पुनः दुसरे वर्षी याच्या कंदास अंकुर फुटून त्यांचा वेल होतो. या वेलावर बारीक व सुकलेल्या मनुकांयेवढीं फळें येतात. यांचा आकार कारल्यासारखा असतो. या फळाचा रंग हिरवा असतो. यांस कडवंच्या असें ह्मणतात या फळांत बारीक बिया असतात. कडवंच्यांची भाजी लोक आव-डीनें खातात. कडवंचीचा कंद उष्ण आहे. या कंदाचा उपयोग एका वाईट कामाकडे करितात.**

**क्षुद्रकारली**—कडवंची—उष्ण, तिखट, रुचिकर, अग्निदीपक, रक्तवातकोपन कडू, व्रण्य, सारक अशी आहे. हिचे फळ पित्तकर, रुचिकारक आहे. हिचा कंद—अर्श, मलरोग, मलग्रंथी—योनिदोष यांचा नाश करितो व गर्भाचा स्राव करितो.

## ५. कडू कारेळे. ( सं. अरण्यजीरक. गु० कडू जिरूं. )

**यांस ' कडूजिरें, ' ' काळी जिरें ' असें ह्मणतात. याचें झाड सुमारें दोन तीन हातपर्यंत उंच वाढतें. हें सरळ वाढतें. या झाडाचा दांडा किंचित बारीक असतो. यास जीं बोंडें येतात त्यांत हें कारेळें असतें, कडू कारेळें हें कृमिनाशक आहे.**

**कडू कारेळें**—उष्ण, तुरट, तिखट, स्तंभक; व वायु, कफ आणि व्रण यांचा नाश करितें. ( १ ) **फुरशाच्या विषाने अंगावर गांठी धरल्यास**—कडू कारे-ळीचा पाला ऊन्ह करून अंगास पेंड बांधावा. अगर याचाच रस अंगास चोळावा. (२) **नळ फुगल्यास** त्यावर—कडू कारेळें तोळा १, मिरीं तोळा १, हीं पांवशेर पाण्यांत रात्रीं भिजत घालून दुसरे दिवशीं सकाळीं तें पाणी गाळून घेऊन त्यांत ठिकरी विझ-वून तें प्यावें. ( ३. ) **काविळीस**—कडू कारेळें पैशाभार वाटून प्रत्यहीं शिळ्या पाण्याबरोबर घ्यावें. ( ४. ) **मुलांच्या ससणीवर**—कडू कारेळें खाऊन त्याचा

मध्ये थोडी हळद घालून द्यावा. ( ५ ) गर्भिणीच्या सुजेवर—कडू कारेलें, जिरें, कुळीथ यांचा काढा द्यावा. ( ६ ) जंतावर—कडू कारेलें, चूर्ण करून मधांत द्यावें. ( ७ ) शरीरांत कोठेंही वायु भरीत असल्यास अगर पोटदुखीवर—कडू कारेलें, बारीक चूर्ण करून द्यावें व वर पाण्याचा घोट घ्यावा. ( ८ ) आमपैत्तीवर—कडू कारेलें तांब्यांत घालून जाळावें. कोळशाप्रमाणें करावें. नंतर तेलांत खलावें व लावावें. ( ९ ) बासरास दुधगा रोग होतो त्यास—कडू कारेल्याच्या पाल्याचा रस पावशेर पाण्यांत काढून, त्यांत सागरगोट्याचा गीर व थोडी मिरपूड घालून द्यावा. अथवा कडू कारेलें १ तोळा घेऊन किंचित कुटून त्याचा काढा करावा. त्यांत सागरगोट्याचा गीर व खैराची साल उगाळून तो पाजावा. ( १० ) मुलांस कांटे येतात त्यांस—कडू कारेलें व खडीसाखर यांचा काढा करून प्रति दिवशीं दुवक्त या प्रमाणें ७ दिवस द्यावा. ( ११. ) सर्व ज्वरांवर—मातीच्या खापरांत कडू जिरें तीन मासे घालून अग्नीवर ठेवावें व तें तापून फुटूं लागलें ह्मणजे त्यांत १४ तोळे पाणी ओतावें व ४ तोळे शेष राहीपर्यंत आटवून थोडा मध घालून द्यावें.

## ६ कडू घोसाळी. ( सं. कटु कोशातकी. )

घोसाळीप्रमाणेंच कडू घोसाळीचे वेल असतात. या वेलास जीं फळें येतात तीं फार कडू असतात.

( १. ) सर्व प्रकारच्या विषांवर—कडू घोसाळीच्या मुळाचा अगर पानांचा काढा मध घालून घ्यावा; ह्मणजे वमन होऊन सर्व विषें उतरतात. ( २ ) पानथरी व सुजेवर—कडू घोसाळीच्या पानाचा रस साखर घालून द्यावा.

## ७. कडू दोडकी. ( सं. महाजाली गु. कडवा तूरयां. )

कडू दोडकीचे दोडकीप्रमाणें वेल असतात. या वेलाचीं पानें, फुलें व फळें दोडक्यापेक्षां लहान असतात. हीं फळें फार कडू असतात. ही वेल पर्जन्यांत आपोआप उगवते. हिच्या फळास दिवाळें असेंही ह्मणतात.

कडूदोडकी—शीत, किंचित तिखट, तुरट, कडू; व पक्वाशय, आध्मानवायू व मलाशय यांची शुद्धि करणारी, लघु, रुक्ष, वायु, कफ, पित्त, पांडु, विषदोष, यकृत्, कुष्ठ, अर्श, सूज, खोकला, उदर, कावीळ, गुल्म, यांचा नाश करिते. हिचें फळ—भेदक, तिखट, कडू, स्निग्ध, हृद्य, दीपन व कास, श्वास, अरुचि, मेह, ज्वर, कुष्ठ, कफ, पित्त, वायु यांचा नाशक आहे. बीज, मस्तकशुद्धीकारक आहे. ( १ ) कामिणीवर—कडूदोडक्याची बारीक पूड करून ती नाकांत ओढावी; ह्मणजे शिंका येतील व

पिंवळा श्लेष्मा वाहील. ५ ...का येऊं लागल्यास तूप नाकांत सोडावें. असें ३ दि॰ वस करावें. ७० कडूदोडक्यांत पिंपळी व मोहऱ्या भरून ठेवाव्या व त्या वांटून त्यांचें व- स्त्र करून ओढावें. ( २. ) **पिसाळलेल्या कुत्र्याच्या विषावर**–कडूदोडक्या- च्या आंतील तंतुमय शिरें पावशेर पाण्यांत एक घटकाभर भिजत घालून, नंतर कोळून गाळून शक्तीप्रमाणें ५ दिवस सकाळीं द्यावें. यानें वांति होऊन व जुलाब हो- ऊन विषार निघून जातो. पथ्य पर्जन्यकाळ जाईपर्यंत ठेवावें. हेंच पाणी कोणत्याही विषावर दिलें असतां गुण येतो. (३.) **दांतांत किरडें झाल्यास**–कडूदोडक्याची विडी ओढावी. ( ४. ) **अर्धशिशीवर**–कडूदोडक्याचें चूर्ण करून थोडे घेतानें व सावधगिरीनें नाकांत ओढावें; ह्मणजे नाकांतून पाण्याची धार लागते व रोग झडून जाऊन गुण येतो. ( ५. ) **मोडाचे मूळव्याधीस**–कडूदोडक्याचें चूर्ण मोडांना घांसावे, ह्मणजे गळून पडतात. (६.) **कंठसर्पास**–कडूदोडका गुरगुडींत घालून ओ- ढावा; ह्मणजे तोंडांतून लाळ पडून त्वरित घसा मोकळा होतो. ( ७. ) **विषावर**– कडूदोडक्याचा काढा तूप घालून प्यावा; ह्मणजे वमन होऊन सर्व विषें उतरतात.

## कडूनिंब. ( सं. निंब. गु. लींबडा. हिं. निंब. )

यास "बाळनिंब" "बाळंत निंब," असेंही ह्मणतात. हा वृक्ष फार मोठा होतो. हा हिंदुस्थानांत सर्वत्र आढळतो. याचीं पानें कात्रे दार असून यास पांढऱ्या रंगाचीं बारीक फुलें येतात. याच्या अनेक उपयोगावरून हा भूलोकांतील कल्पतरूच आहे असें ह्मणावयास कांहीं बाध येत नाहीं. प्राचीन आर्यऋषिवर्यांनीं याच्या अलौकिक गुणां- चा शोध लावून यास मोठें श्रेष्ठपद दिलें आहे. याच्या सेवनेंकरून अनेक व्याधींचें निर्मूलन होतें, ह्मणून वर्षप्रतिपदेच्या दिवशीं याचीं कोंवळीं पानें व फुलें, " मिरी, हिंग, सैंधव, जिरें, ओंवा, चिंच व गूळ यांशीं शुचिर्भूत होऊन सर्वांनीं भक्षण करावीं, असा प्राचीन शास्त्र- कारांनी एक नियमच घालून दिला आहे. या नियमेंकरून वर्षांतून एक वेळ तरी या सर्व रोगपरिहारक वृक्षाचीं पाने आपल्या खाण्यांत येतात; हा आपल्या दूरदेशी शास्त्रकारांचा आपणावर मोठा उपकार आहे असे समजले पाहिजे. या वृक्षाचीं नुसतीं पाने खाऊनच राहि- लेले तेजःपुंज आणि शक्तिमान असे कांही विरक्त पुरुष कधीं कधीं आपल्या नजरेस पडतात, तेणेकरून या वृक्षांतील अलौकिक गुण ध्यानांत येऊन आपणांस फारच आश्चर्य वाटते. आपल्या देशांत स्त्रि- या प्रसूत झाल्या ह्मणजे त्यांस प्रथम तीन दिवसपर्यंत भोजनाच्या आधीं निंबाच्या पानांचा रस देतात. ही योजना फारच उत्तम आहे.

ज्या स्त्रिया हा रस मनापासून घेतात त्या ... जास्त येऊन त्या लवकर निरोगी होतात. त्यांस पुढे बाळंतरोगासारखे प्राणहारक रोग उत्पन्न होण्याची भीति नसते. परंतु ज्या स्त्रिया हा रस घेण्याची हयगय करितात, त्यांस बहुतकरून दुर्धर व्याधि जडतात. हल्लींच्या काळांत अशा दुर्धर व्याधि जडून मृत्युमुखी पडलेल्या स्त्रियांची बरीच संख्या नजरेस येते, त्याचें मुख्य कारण तरी हेंच असावे असे दिसते. व्यालेल्या गाईसही जर हा पाला खावयास घातला, तर त्यांनाही दुध ज्यास्त येऊन त्या निरोगी व सशक्त होतात. या वृक्षाच्या छायेपासून फारच आराम वाटतो. सार्वजनिक देवालये, धर्मशाळा, रस्ते आदिकरून बहुत ठिकाणीं हे वृक्ष फक्त छायेसाठीं व स्वच्छ हवेसाठीं लावितात. ज्यांच्या घरीं निंबाचे वृक्ष आहेत त्यांच्या घरांतील हवा सर्वकाळ निरोगी असून, त्या घरांत राहणाऱ्या मनुष्यांस या वृक्षाच्या योगेकरून मोठा आनंद प्राप्त होतो. हा निंबाचा वृक्ष फार जुनाट झाला ह्मणजे याच्या खोडास शुद्ध चंदनाप्रमाणे सुवास प्राप्त होतो. याचे लांकूड इमारतीकामास उत्तम असून, याच्या आंगच्या कडूपणामुळें यास कीड लागण्याची भीति नसते. वृक्ष पुष्कळ वर्षेपर्यंत वांचून लोकांस त्यापासून शेकडो फायदे होतात. हा वृक्ष एकदां तोडला तरी पुनः याची मुळे फुटून याचा कांही वर्षांनीं मोठा वृक्ष बनतो, अशा रीतीने कैक वेळ तोडुन पुनः वाढलेले असे पुष्कळ वृक्ष आपल्या नजरेस येतात, हा यांत मोठा विशेष गुण आहे. पिंपळ आणि निंब या दोहोंची फारच मैत्री आहे. जेथें जेथें पिंपळाचा पार असतो तेथे तेथें बहुतकरून निंबही असतो, असा साधारण नियम आहे. निंबाप्रमाणे पिंपळाचाही वृक्ष मोठा उपयुक्त आहे. वड, पिंपळ, उंबर, नांदरुख, बेल तुळस आदिकरून वृक्ष जे मोठे पवित्र मानिले आहेत, ते त्यांच्या अतिशय उपयुक्तते वरूनच मानिले असावेत असें वाटते. अशा उपयुक्त वृक्षांच्या अलौकिक गुणांकडे न पाहतां व त्यांचा आपल्या शरीराकडे उपयोग न करितां, सारासार विचाराचा त्याग करून परकीयांचे कसलेही निषिद्ध पाणी, पवित्र गंगोदक समजून निश्शंकपणे प्यावयाचे अशी स्थिति झालेली जर आपल्या दृष्टोत्पत्तीस येत आहे, तर धिक्कार असो अशा जिण्यास ! ! ज्या दयाळु परमेश्वरानें हिंदुस्थानवासी आर्य जनांच्या शरीररक्षणार्थ हजारों औषधी आणि वनस्पति उत्पन्न करून ठेवल्या आहेत, त्यांचा उपयोग

आणि शोध न करितां, त्या परमेश्वरी देणगीचा धिक्कार करून, परकीयांचे, परकीय हवेतील, निषिद्ध आणि परिणामी अपकारक असे औषध घ्यावे, यासारखी शरमेची, लाजिरवाणी, अत्यंत खेदाची आणि दुःखाची कोणतीच गोष्ट नाही !!! " गूळ चारणारापेक्षां निंब चारणारा बरा होतो " ही म्हण पूर्णपणे लक्षांत आणा. हे निंबवृक्षवर्णन सकृद्दर्शनी कडू लागणारे, परंतु परिणामी निरंतर गोड होणारे असे आहे, याजबद्दल नीट विचार करून त्याप्रमाणें आयुष्यांत वर्तन ठेवा; म्हणजे निंबरसाप्रमाणेच त्याचा परिणामही गोड होईल. शेताच्या बांधावर बाभळीची झाडे असलीतर ती जमिनीतील पैष्टिक अंश खाऊन टाकून, ती जमीन निकस करून टाकितात. परंतु निंबाच्या झाडाची तशी गोष्ट नाही. ही झाडे शेताच्या बांधावर असल्यानें त्यापासून शेताचे कोणत्याही तऱ्हेचे नुकसान होत नाहीं. याजकरितां शेतकऱ्यांनी हीं झाडें बांधावर अवश्य लावावीत.

**कडूनिंब**–शीत, कडू, ग्राहक, तिखट, अग्निमांद्यकारक, व्रणरोपण, सुजेला पिकविणारे बालांना हितकर, हृद्य; व कृमि, वांति, व्रण, कफ, सूज, पित्त, विष, वायु, कोड, हृदयदाह, श्रम, खोकला, ज्वर, तृषा, अरुचि, रक्तदोष, व मेह यांचा नाश करितो. याचा कोंवळा पाला–ग्राहक, वातकर; व रक्तपित्त, नेत्ररोग यांचा नाश करितो. जन पल्लव विशेषेंकरून व्रणनाशक आहेत. **निंबाच्या काड्या** कास, श्वास, अर्श, गुल्म, कृमि व मेह यांचा नाश करितात. **याचें कोवळे फळ**–स्निग्ध, भेदक, उष्ण, मेह व कुष्ठ यांचें नाशक आहे **पिकलेलीं फळें**–मधुर, स्निग्ध, कडू, गुरु, पिच्छल; व कफरोग, नेत्ररोग, रक्तपित्त, क्षतक्षय, यांचा नाश करितें. याच्या बियाचे गोळे–कुष्ठ व कृमि यांचा नाश करितात. **निंबपंचांग**–रक्तदोष, पित्त, कडू; व्रण, कुष्ठ व दाह, यांचा नाश करितें. बियांचें तेल–किंचित् उष्ण, कडू; व कृमि, कफ, कुष्ट, व्रण. वातपित्त, पित्त, अर्श, ज्वर, शोफोदर, रक्तदोष, व कफ, पित्त, व जरा यांना जिंकतें. कडूनिंबाच्या सालीचा उपयोग वैद्यशास्त्रांत काव्यामध्यें अनेक ठिकाणीं आलेला आहे; परंतु विस्तारभयास्तव त्याचें वर्णन येथें न देतां, ठळक ठळक उपयोग दिले आहेत:—( १. ) **व्रणावर**:–कडूनिंबाचा पाला व्रणावर मोठा वस्ताद आहे. नाडीव्रणादि भयंकर व्रण, दररोज निंबाचा पाला पाण्यांत चांगला उकळून त्या पाण्यानें धुऊन टाकावेत; म्हणजे त्यांचें शोधन होऊन ते भरून येतात. ( २. ) **जे व्रण फुटून** वाहतात ते बरे होण्यास.—कडूनिंबाचा पाला वांटून मधांत कालवून लावीत जावा, म्हणजे ते बरे होतात. ( ३. ) **खरजेवर**:–हा पाला जाळून गोड्या तेलांत किंवा करंजेल तेलांत ख-

ळून लावावा. ( ४. ) **सर्पाच्या विषावर**-कडूनिंबाचा पाला मोठें वस्ताद औषध आहे. सर्प चावल्याची परीक्षा अशी आहे कीं, विषार लागलेल्या मनुष्यास कडूनिंबाचा पाला अथवा मीठ अगर मिरच्या खावयास द्याव्या. त्यास जर कडू, खारट किंवा तिखट असे समजण्यांत आलें नाहीं, तर दंश झाला असें समजावें. मग त्यास विष उतरेपर्यंत निंबाचा पाला खावयास द्यावा. किंवा पाल्याचा अगर सालीचा रस द्यावा झणजे विष उतरतें. ( ५. ) **पित्त पडण्यास**:-कडू निंबाच्या पाल्याचा रस पाणी घालून काढून तो प्यावयास द्यावा; झणजे उलटी होऊन पित्त पडतें. (६. ) **गर्मीवर** कडूनिंबाच्या पाल्याचा रस खडीसाखर टाकून सकाळ. संध्याकाळ या प्रमाणें ७ रोज सेवन केल्यास कसलीही गर्मी असली तरी ती निखालस बरी होते. ( ७. ) **महारोगावरही**-हा पाला मोठें वस्ताद औषध आहे. आंघोळीच्या पाण्यांत हा पाला कढवून त्यानें स्नान करावें आणि याचा अंगरस किंवा हा पाला गाईचे दुधांत वाटून, तो रस सेवन करावा; झणजे २।३ महिन्यांत रक्तपिती व दुर्धर कुष्टरोगाचा निश्चयेंकरून नाश होतो. पथ्य मात्र करावें. तसेंच रोग्यानें नित्य रात्रौ कडूनिंबाच्या छायेंत निजण्याचा क्रम ठेवावा. ( ८. ) **दाहयुक्त सुजेवर**-पानें वाटून लावावीं, झणजे दाह कमी होतो व रक्तदोष नाहींसा होतो. ( ९. ) **पित्तज्वरांत** जो अतिशय दाह होतो त्यावर-निंबाच्या पाल्याचा रस फेनयुक्त करून अंगास चोळावा, दाह कमी होतो. ( १० ) **उष्ण ज्वरावर**:-कडू निंबाच्या काड्या, कटुकी व किराईत यांचा काढा मध घालून द्यावा. ( ११. ) **कामीणरोगावर**:-कडूनिंबाच्या अंतरसालीचा रस काढून, त्यांत मध व थोडें सुंठीचें चूर्ण घालून द्यावें. ( १२. ) **खरजेवर**:-जुनाट निंबाचा वाळलेला फांटा आणून तो पाण्यांत उगाळून लावावा. (१३.) **विषमज्वरावर** झ० हिंवतापावर:-कडू निंबाच्या सालीच्या काढ्यांत धणें व सुंठीचें चूर्ण घालून द्यावें; झणजे तावडतोब गुण येतो. हें औषध " कोयनेल " पेक्षां फारच उत्तम असून गुणांनीं त्यापेक्षां श्रेष्ठ आहे. ( १४. ) **मूळव्याध कृमि व प्रमेहावर.**-निंबाची कोंवळीं फळें भक्षावीं, झणंजे परमा, मूळव्याध व कृमि यांचा नाश होतो. ( १५. **खरजेवर**-कडूनिंबाच्या बिया वाटून लावल्यानें खरूज बरी होते व उवा जाण्यासाठींही या बिया वांटून डोकीस लावाव्या. ( १६. ) **बाळंतरोगावर** उपचार:--जुनाट निंब पाहून त्याची अंतरसाल काढून आणावी. तिचे बारीक तुकडे तुकडे करून ते पाण्याच्या हंड्यांत घालावे. वर झांकण असावें. असे ३ हंडे पाणी चांगलें आधण येईपर्यंत तापवावें. नंतर ज्या स्त्रियेस बाळंतरोग झाला आहे तिला एका बाजेवर निजवून प्रथम एक हंडा आणून तिच्या मस्तकाखालीं ठेवावा, त्यांतील वाफारा कमी झाल्यावर दुसरा हंडा आणून तो मस्तकाखालीं ठेवावा, व प्रथमचा हंडा कमरेखालीं ठेवावा. मस्तकाखालच्या हंड्याची वाफ कमी झाल्यावर तो कमरेखालीं ठेवावा व कमरेखालचा पायांखालीं ठेवून चुलीवरील तिसरा हंडा मस्तकाखालीं ठेवा-

वा. त्याची वाफ कमी झाल्यावर पायाखालीं ठेवावा. याप्रमाणें ३ रोज वाफारा द्यावा; ह्मणजे घामाच्या रूपानें अंगांतील सर्व व्याधि निघून जाऊन रोग बरा होतो. (१७) **मूळव्याधीवरः**–कडू निंबाच्या बिया तेलांत तळून त्यांतच खलाव्या आणि त्यांत थोडी मोरचुदाची लाही घालून तें मलम मोडास लावावें; ह्मणजे मोड गळून पडतात, व कंद गळून पडतो. (१८) **सर्पाचें विष कधींही न बाधण्यास.** कडूनिंबाची पानें नित्य सकाळीं चावून खात जावीं; ह्मणजे सर्पदंश झाला असतां त्यास विष बाधणार नाहीं. (१९) **मूळव्याधीवरः**–कडूनिंबाचीं २१ पानें बारीक वांटून सोलीव मुगाच्या वांटलेल्या डाळींत मिश्र करून त्याचे घारगे गाईचे तुपांत परतून ते तुपाशी रोग्याकडून २१ दिवस खाववावे; ह्मणजे गुदांतील सर्व मोड गळून पडतील. हें औषध घेणारानें समुद्राचें मीठ खाऊं नये. सैंधव ( शेंदेलोण ) किंचित् खावें. (२०) **बाळंतीण अडली तर त्यावरः**–कडूनिंबाचे पाळ ( मूल ) कमरेस बांधावें, ह्मणजे लवकर सुटका होते. प्रसूत झाल्याबरोबर पाळ सोडून टाकावें. (२१) **सोमलाचे विषावर व कृमिवरः**–कडूनिंबाचे पाल्याचा रस द्यावा. (२२) **अफूवरः**–कडूनिंबाचे पाल्याचा, यंत्रानें अर्क काढून द्यावा. (२३) **पंचनिंबचूर्ण कुष्ठादिकांवरः**–मुळें, पानें, फुलें, फळें, साल, अशीं पांच अंगें कडूनिंबाचीं घेऊन त्यांचे ६० तोळे चूर्ण करून घ्यावें. मग लोहभस्म, बाळहिरडे, टाकळ्याचे बीज, त्रिफळा, बिबवे, वावडिंग, साखर, आंवळकठी, हळद, पिंपळी, मिरें, सुंठ, बावच्या बाहव्याच्या शेंगेंतला मगज, गोखरू हीं पंधरा औषधें चार चार तोळे घेऊन साऱ्यांचें चूर्ण करावें नंतर निंबाचें व हें चूर्ण एकत्र करून त्यास माक्याच्या रसाचें एक पूट द्यावें. मग खैराच्या सालीचा अष्टमांश काढा करून त्याचें एक पूट द्यावें. आणि वाळवावें. हें चूर्ण नित्य एक तोळा खैराच्या सालीच्या काढ्यांत अ० तुपांत किंवा गाईच्या दुधांत घ्यावें; तेणेंकरून सर्व कुष्ठें एका महिन्यांत दूर होतात. हें चूर्ण सर्व रोगांचे नाशक आहे. (२४) **पित्तावरः**–कडूनिंबाच्या काड्या, धणे, सुंठ व खडीसाखर यांचा काढा द्यावा. (२५) **योनिशूलावरः**–कडूनिंबाच्या निंबोळ्या व एरंड्या निंबाच्या रसांत वांटून गोळी करावी व ती योनींत धरावयास द्यावी, किंवा याचा योनीस लेप करावा. (२६) **कृमीवरः**–कडूनिंबाचीं पानें हिंगाबरोबर खावीं. (२७) **आंगावर पित्त उठतें त्यासः**–कडूनिंबाचीं पानें वाटून तुपाशीं अ० अवळकाठी बरोबर खावी व मिरपूड तुपांत खलून आंगास चोळावी अगर कडूनिंबाच्या अंतरसालीचा काढा द्यावा, ह्मणजे शीतपित्त, क्षत, कंडू, विस्फोट, रक्तपित्त, यांचा नाश होतो. (२८) **स्थावर, जंगम सर्व विषांवरः**–सैंधव व मिरें समभाग व या दोहोंच्या बरोबर कडूनिंबाच्या निंबोळ्या घेऊन वांटून मध व तूप यांशीं द्याव्या (२९) **सर्व व्रणावरः**–कडूनिंबाचा पाला, दारुहळद व ज्येष्टमध यांच्या चूर्णांत

तूप व मध घालून खकून तें मलम लावीत जावें, म्हणजे जखम आंतून भरून येते. (३०) कुष्ठव्याधीवर:—कडुनिंबाच्या सालीच्या रसांत जिरें घालून ७ दिवस द्यावें. (३१) कामीण रोगावर:—कडूनिंबाचा पाला पाण्यांत वांटून त्याचा रस पावशेर काढून, त्यांत खडीसाखर घालून कढवावा व बराच आटल्यावर प्यावयास द्यावा. (३२) चिकटा मेह व इक्षुमेह याजवर:—कडूनिंबाच्या काड्यांचा किंवा अंतरसालीचा काढा द्यावा. (३३) कधीं कोणताही रोग न व्हावयास:—कडूनिंबाचा पाला एक तोळाभर घेऊन त्यांत गुंजभर कापूर घेऊन व तितकाच हिंग घालून त्याची गोळी करून ती गोळी ६ मासे गुळांत मिळवून प्रति दिवशीं रात्रीं निजावयाचे पूर्वी द्यावी. गांवांत जोंपर्यंत पटकीचा आजार आहे, तोंपर्यंत हें औषध प्रत्येकानें सेवन केल्यास त्यास कांहीं अपाय होणार नाहीं. (३४) ओकारी, कुष्ठपित्त व कफसंबंधीं जंत यांवर:—कडूनिंबाचीं पानें पाण्यांत वांटून कल्क करून तो प्यावा. (३५) उष्णकाळांत अंगांतील दाह शांत होऊन थंडाई येण्यास व जुलाब बंद होण्यास:—कडूनिंबाचा पाला वांटून सरबत करून त्यांत खडीसाखर घालून तें प्यावें. ( ३६. ) मूळव्याधीवर—कडूनिंबाच्या पिकलेल्या निंबोळ्यांचा गीर दररोज प्रातःकाळीं तीन मासे घेऊन त्यांत ६ मासे गूळ कालवून ती गोळी खावी. दि० ७. ( ३७. ) नारूवर—कडुनिंबाचा पाला वांटून लेप द्यावा. ( ३८. ) ऊरुस्तंभावर—कडूनिंबाचें मूळ उगाळून ऊन्ह करून लेप द्यावा. (३९.) प्रमेह, उपदंश, बद्द, चट्टे इत्यादिकांवर—पावशेर कडुनिंबाची साल घेऊन ती काचपात्रांत घालून अगर मृत्तिकापात्रांत घालून, त्यांत सळसळीत आधणाचें पाणी एक शेर घालून झांकण ठेवून रात्रभर तसेंच ठेवावें. दुसरे दिवसापासून त्यांतून शक्तितारतम्यानें एक अगर दोन वेळ, प्रत्येक वेळेस ४ तोळे पाणी द्यावें; म्हणजे वरील उपदंशजन्यरोग एक दोन सप्तकांत निखालस बरे होतात. पथ्य—तूप, साखर, पोळी. बाकी वर्ज्य. (४० ) नखुर्डे व पेरें याजवर—कडूनिंबाचा पाला थोडें मीठ घालून वांटावा व तुपांत परतून त्याची पिंडी वर बांधावी. ( ४१ ) विषमज्वरावर—कडूनिंबाचा पाला ४० तोळे, सुंठ, मिरीं, पिंपळी १२ तोळे, त्रिफला १२ तोळे, लवणत्रय ( सैंधव, बिड, काच, ) १२ तोळे, दोन क्षार ( जवखार, सज्जीखार ) ८ तोळे, व ओंवा २० तोळे, या सर्वांचें चूर्ण एकत्र करून प्रातःकाळीं द्यावें. ( ४२ ) विषमज्वरावर धूप—कडूनिंबाचा पाला, वेखंड, कोष्ठ हरीतकी, शिरस, तूप व गुग्गुल यांचा धूप विषमज्वरनाशक आहे. ( ४३ ) आगंतुक व्रण, व्रण व गळवें यांवर—कढईत तेल घालून त्यांत कडूनिंबाचा पाला जाळून खलून लावावा. ( ४४ ) विंचवाचे दंशावर—कडू निंबाचीं पानें अगर फुलें ओढावीं; अथवा पाला चावून तोंडांतील वाफ जाऊं न देतां दंशाच्या विषम भागाकडच्या कानांत तो फुंकावा.

## ९ कडू पडवळी. ( सं० पटोलै कटु. )

कडूपडवळीचे पडवळीप्रमाणेंच वेल होतात. या वेली पर्जन्यकाळीं बहुतेक प्रांतीं होतात. हीं फळें आकारानें तोंडल्या एवढीं असतात. या वेलाचा पाला व फळें हीं फार कडू आहेत. काढ्यांत या वेलाच्या पंचांगाचा उपयोग होतो.

**कडूपडवळी**—कडू, सारक, उष्ण, तिखट, भेदक, पाचक, अग्निदीपक; व पित्त, कफ, कंडू, कुष्ठ, रक्तविकार व ज्वर, दाह, तृषा, कोष्टरोग, कृमि यांचा नाश करितें. हिचें फळ-तिखट, कडू, पाककाळीं गोड, लघु, दीपन, पाचन, वृष्य, मलानुलोमन; व वायू, पित्त, कफ यांना यथास्थानीं ठेवणारें; सारक, व श्वास, ज्वर, त्रिदोष, कृमि यांचा नाश करितें. हिचीं पानें पित्तनाशक; आणि मूळ, वल्ली व तेल हीं कफनाशक आहेत. ( १. ) व्रण धुण्यास **काढा**—कडू पडवळ व कडू निंब यांच्या काढ्यानें व्रण धुवावें; ह्मणजे व्रणाची शुद्धि होते. ( २ ) **अग्निदग्धव्रणावर** कडू पडवळाचा काढा व कल्क यांणीं शिरसाचें तेल सिद्ध करावें. तें अग्निदग्धव्रण, ठणका, स्राव, दाह व फोड यांचा हटकून नाश करितें. ( ३. ) **सर्व ज्वरांवर काढा**—कडू पडवळ. सुंठ, यांचा काढा व निकाढा ध्यावा. शोष असल्यास खडीसाखर घालावी. सर्दीचा प्रादुर्भाव असल्यास मध तीन मासेपर्यंत घालावा. ( ४. ) **शीतज्वर व संततज्वरावर**—कडू पडवळीच्या पाल्याचा रस काढून प्रथम काळजावर लावावा; नंतर सर्व आंगास लेप द्यावा. ( ५ ) **इंद्रलुप्त अ० चाईनर** कडूपडवळीच्या पाल्याचा रस चोळावा. ह्मणजे केश उत्पन्न होतात. ( ६ ) **वमन होण्यास**—कडूपडवळ, कडूनिंब व अडूळशाचीं पानें यांचें चूर्ण थंड पाण्यांत द्यावें. ह्मणजे वमन होऊन पित्तविकार दूर होतो. (७) **कृमींवर**—कडूपडवळीचीं पानें १ तोळा व धणे १ तोळा हीं रात्रीं पावशेर पाण्यांत भिजत घालून सकाळीं गाळून त्यांत मध घालून तें पाणी दिवसा तीन तीन वेळ द्यावें. ( ८ ) **पित्तज्वरावर** कडू पडवळीच्या मुळाचें पाणी साखरेशीं द्यावें. अ०कडू पडवळ व जव यांचा काढा मध घालून द्यावा. तो तीव्र पित्तज्वर तृषा व दाह नाश करितो. ( ९ ) **भ्रमावर**—कडूपडवळीचा पाला व शेवग्याचा पाला थोडे खोबऱ्याचें तेल घालून तळावा, आणि दुधाशीं एकत्र वाटून शिजवावा व त्याचा सोसवेल तितका गरम मस्तकावर पेंड बांधावा. ( १० ) **विषावर**—कडूपडवळ उगाळून द्यावें ह्मणजे उलटी होऊन विष उतरतें.

## १० कडु भोपळी. ( सं. कटुतुंबी. )

दुध्याभोपळ्याचे जसे वेल होतात तसेच कडू भोपळ्याचेही मोठमोठे वेल होतात दुध्याभोपळ्या प्रमाणेंच या वेलीवर फळें येतात.

हे भोंपळे फार कडू असतात. या भोंपळयांचा, पोहण्याकडे, व सांगडी करण्यास फार उपयोग होतो. यांतील कित्येक भोंपळे तुंबडीवजा असतात, त्याच्या तुंबड्या करितात, कित्येकांचे तंबुरे करितात, असा याचा पुष्कळ उपयोग होतो.

**कडु भोंपळी**—रसकाळीं व पाककाळीं तिखट, हृद्य, शीतल, कडू, वामक, व दमा, खोकला, यांची नाशक, शोधन कारक व वायु, सूज, व्रण, विष, शूल, पित्त-ज्वर, यांचा नाश करिते. हिची पाने पाककाळीं मधुर, मूत्रशोधक, पित्तशामक अशीं आहेत. या प्रमाणें फळाचेही गुण आहेत. ( १ ) **गालगुंडावर**—पिकलेल्या कडू भोंपळ्यांत ७ दिवस पाणी भरून ठेवावें. तें प्राशन केलें असतां गालगुंडांचा नाश होतो ( २ ) **सर्व प्रकारच्या विषावर**—कडू भोंपळयांचें मूळ अथवा पानें पाण्यांत वाटून प्यावीं; ह्मणजे वमन होऊन सर्व विषें उतरतात. ( ३ ) **रातांधळे व फुलें ह्मण्यास**—कडू भोंपळा जाळून त्याची राख मधांतून डोळयांत घालावी ( ४ ) **गंडमालेवर**—कडू भोंपळयाचा रस व शिरसेल एकत्र करून अग्नीवर कढवावें. रस जळून तेल सिद्ध झालें ह्मणजे तें लावावें. ( ५ ) **कामिणीवर**— कडू भोंपळयाचा पानांचा काढा करून द्यावा. ( ६ ) **योनिसंकोचनाश**—कडू भोंपळीचें बी व लोध्र हीं पाण्यांत वाटून योनिस आंतून लेप करावा. ( ७ ) **काविळीवर**—कडू भोपळ्याची बी पाण्यांत उगाळून नस्य द्यावें.

## ११. कढीनिंब. ( सं. कैटर्य. )

हें झाड फार मोठें होत नाहीं. हीं झाडें बागेंत लावितात. या झाडास बारीक कांटे असतात. याचा पाला सुगंधी आहे. हा पाला मसाल्यांत घालितात. कढीनिंबाचा पाला तूप लावून चुलींत होरपळून कढींत घालतात. तेणेंकरून त्या कढीस पाल्याचा वास लागून ती चांगली होते. यास " गोडनिंब " असेंही ह्मणतात.

**कढीनिंब**—शीतल, कडु, तिखट, तुरट, लघु, व दाह, अर्श, कृमि, शूल, संताप, विष, सूज कोड, भूतबाधा यांचा नाशक आहे.

## १२. कण्हेर. ( गु० कण्हेर. सं० करवीर. )

हें फूलझाड सर्वत्र प्रसिद्ध आहे. याची उंची सुमारें पुरुष दोन पुरुष असते. यांत पांढरी, तांबडी, गुलाबी, व पिंवळी, अशा चार जाती आहेत; पैकीं पांढरी कण्हेर औषधाच्या कामीं जास्त गुणावह आहे, हिचीं मुळें फार विषारी आहेत, हिचीं पानें लांबट असतात. यांच्या फुलांस वास नसतो. या झाडाजवळ सर्प येत नाहीं असें ह्मणतात

**श्वेतकण्हेर**–तिखट,कडू,तुरट,तीक्ष्ण,उष्णवीर्य, ग्राहक अशी आहे, व मेद, कृमि, कुष्ट, व्रण. अर्श,वायू,यांचा नाश करिते; भक्षण केली असतां विष आहे, व नेत्रांला हित वह लघु व विष, विस्फोट, कुष्ट, कृमि, कंडु, व्रण,कफ,ज्वर, नेत्ररोग, व पीडा यांचा नाश करिते. **रक्तकण्हेर**—शोधक, तिखट, पाककाळीं कडू, व लेप, केला असतां कुष्ठ नाशक आहे; **पाटलवर्ण कण्हेर**—मस्तकशूल, कफ, वायु यांचा नाश करिते. ( १. **सर्प विंचू व फुरसें यांच्या विषावर**—पांढऱ्या कण्हेरीचें मूळ उगाळून दंशावर लेप करावा अथवा मूळ उगाळून शक्तीप्रमाणें पाजावें किंवा पानांचा रस पाजावा. कदाचित् या औषधा पासून ग्लानि आल्यास तूप पाजावें. (२. ) **उपदंशावर**—कण्हेरीचें मूळ उगाळून त्याचा लेप करावा ह्मणजे असाध्यही पीडा दूर होते. ( ३ ) **विषमज्वरावर**—पांढऱ्या कण्हेरीची मुळी आदितवारीं कानास बांधावी. हा योग सर्व प्रकारचे ज्वरावर प्रशस्त आहे. ( ४ .) **मूळव्याधीवर**—कण्हेरीचें मूळ उगाळून लेप करावा. ( ५ ) **घावऱ्यावर**—तांबड्या कण्हेरीचीं फुलें आणि तांदूळ वजन करून, समभाग घेऊन रात्रौ थंड पाण्यांत भिजत घालून, तें भांडें दवांत उघडें ठेवावें. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं ते तांदुळ व फुलें एकत्र वांटून त्याचा लेप द्यावा. ( ५. ) **शिरोरोगावर**—पांढऱ्या कण्हेरीची मुळी सहाणेवर सुकी उगाळून, ती पूड वेदनायुक्त अशा मस्तकाच्या भागावर चोळावी, ७. ) **सर्पाचे विषावर**—पांढऱ्या कण्हेराचीं फुलें वाळवून, त्याचे समभाग कडक तंबाकू मिसळून त्यांत थोडी वेलदोड्याची पूड टाकून तें चूर्ण बलगाल करून ठेवावें व तपकिरीसारखें ओढावें.

## १३. कनक.

**कनक हा कंद आहे. याचा वेल फार मोठा होत नाहीं. याचा विस्तारही फार मोठा होत नाहीं. वेल बारीक असून पानें धाटोळीं असतात. तीं लहानशा विड्याच्या पानाएवढीं असतात. पानास टोंक असतें. वेलास बटाट्याप्रमाणें जमिनींत कनकें येतात. हा कंद रताळ्यापेक्षां जाड असतो. लांबींत तितकाच भरतो. कनकास कोणी ' कणगर ' ' कणगी ' ' कांटेकणग्या , असेंही ह्मणतात. कनके भाजून अथवा उकडून खातात. हें निरहारास उपयोगी पडतें. कारंदा व कोन यापेक्षां हें गोड असतें. हें पौष्टिक आहे.**

( १. ) **मुळव्याधीवर व रक्तातिसारावर**—कनक भाजून तूप साखरेशीं सकाळीं खावयास द्यावें.

## १४. कमल ( सं. कमल. )

**कमळाची उत्पत्ति तळ्यांत किंवा या प्रमाणेंच एखाद्या जलसमूहांत बहुतकरून होते. पाण्याशिवाय कमळ व्हावयाचें नाहीं. याचे कांदे**

असतात, यांस देठ येऊन त्यावर फुल येतें. याचे देठ फार लांब असतात. त्यांस आंतून जाळी असून ते अगदीं पोकळ असतात. याचें पान वाटोळें असते. कमळांत पुष्कळ जाती आहेत. पांढरें, तांबडें, गुलाबी, निळें इत्यादि. कमळाचें फूल फारच शोभिवंत दिसतें. त्यास अनेक लांबट पांकळया असून, त्या जवळ जवळ असतात. निरनिराळ्या जातीचीं निरनिराळी लहान मोठी अशी आकृति असते. कांहीं जातीस वास येतो व कांहींस अगदीं येत नाहीं. कल्हार ह्मणून एक कमळाचीं जात आहे. त्याचीं पानें कमळासारखी पण किंचित् लहान असतात. कल्हाराचें फूल मात्र कमळापेक्षां अगदीं निराळया तऱ्हेचें असतें. हें फूल पांढरें असून सुकुमार व लहान असतें. याला सुवास फार आहे. याला पावसाळयांत फुलें फार येतात. कुमुद ह्मणून बी एक कमळाची जात आहे. तिचीं पानें कमळाप्रमाणेंच असतात. फूल मात्र बारीक व फार सुकुमार असते. याच्या फुलांचा भर थंडीच्या दिवसांत फार असतो. विशेषेकरून पांढऱ्या कमळास "पुंडरीक" ह्मणतात, रक्त कमळास "कोकनद" ह्मणतात, नील कमळास इंदीवर असे ह्मणतात. कमळाच्या सर्व वेलास "कमलिनी" असे ह्मणतात. कमळाक्ष ह्मणून एक कमळाची जात आहे. त्या जातीच्या कमळाचे देठ पांढरे असून, कोठें कोठें पायाच्या आंगठयाएवढे जाड असतात जे देठ चिखलांत रुतलेले, त्यांस स्वाद अधिक असतो. या देठास भिसे असे ह्मणतात या कमळीचीं पाने मोठया छत्री सारखीं असून ती जेवायास उपयोगीं पडतात. या कमळाचीं कमळें तांबडया रंगाचीं असतात. या कमळास "पोयसर" असेही नांव आहे. या कमळास लहान चपटे फळ येते. त्यांत पांच सहा लहान करवंदा एवढ्या बिया असतात. त्यांस कमळाक्ष अथवा कमळकाकडी असे ह्मणतात. या बियांच्या आंत जो पांढरा मगज असतो तो फोडून खातात. कमळाक्षाच्या कार्शीत लाह्या करितात. त्या दुधांत घालून खातात किंवा याचे पीठ करून त्यांत तूप साखर घालून लाडू बांधितात. कमळाक्ष फार पौष्टीक आहेत भिशाचे लहान लहान तुकडे करून त्या सुकवितात त्या भिशाच्या कचऱ्या होत. त्या तुपांत व तेलांत तळुन खातात.

कमळ—शीतळ, स्वादु, सुगंधी, भ्रांतिहारक, तापनाशक वर्णकार, तृप्तिकर असें आहे, व रक्तपित्त, श्रम, कफ, पित्त, तृषा, दाह, विस्फोट, रक्तदोष, विसर्प, व

विष यांचा नाश करिते. ( १ ) **गुदभ्रंशावर**-कमळाची कोंवळीं पानें साखरेबरोबर खावीं. ( २ ) **अंगात भिनलेली सर्व प्रकारची गर्मी झडून जाण्यास व धातु पडत असल्यास**-पांढऱ्या कमळाचा कंद आणून ठेवावा; म्हणजे त्यांतून जो बलक येईल तो पावशेर पर्यंत घेऊन, त्यांत आमळ्याच्या अंतरसालीचें चूर्ण अर्धा तोळा व गाईचें दूध घालून, सर्व मिश्रण सारखें करावें. नंतर जिऱ्याची पूड व खडीसाखरेची पूड घालून द्यावें. हें औषध निस्तोष गुण येईपर्यंत द्यावें. ( ३ .) **तिडक्या प्रमेहावर व थंडया प्रमेहावर**-पांढऱ्याकमळाचे कंदाचें पीठ करून नित्य सकाळीं गाईचें तूप १ तोळा घेऊन त्यांत हें पीठ अर्धा तोळा, जिऱ्याची पूड तीन गुंजा व खडीसाखर ६ मासे घालून प्रत्यहीं दुवक्त द्यावें. ( ४ ) **दाहावर**-कमलपत्रें व केळीचीं पानें यांजवर शयन करावें. ( ५ ) **पित्तज्वरावर**-पांढऱ्या कमळाच्या पाकळ्या, ज्येष्ठमध व खडीसाखर यांचा काढा करून थंड झाल्यावर द्यावा.

## १५. कपूरीमधुरी. ( सं. स्पृक्का. )

**हें झाड सुमारे एक हात उंच वाढते. याचीं पाने तुळशीच्या पाना-प्रमाणे असून तीं पांढुरकीं असतात. यास तुळशीप्रमाणे तुरे येतात. हीं झाडे पुणे, व नाशिक जिल्ह्यांत केळीच्या बागांतून पुष्कळ होतात**

**कपुरीमधुरी**-तिखट, कडू, तुरट, स्वादु, शीतल, वृष्य, सुगंधी, व खोकला. तृषा, मेह, कंडू, त्रिदोष, कुष्ठ, विषदोष, ज्वर, कफ, स्वेद, दाह, रक्तदोष, दुर्गंधी, अश्मरी, मूत्रकृच्छ्र, व शूल, यांचा नाश करिते. ( १ ) **पूपरम्यावर**-कपूरीमधुरी-च्या पाल्याचा अंगरस, ७ दिवस द्यावा. ( २ ) **मधुरा व विषमज्वर यांवर**-कपुरी मधुरीच्या पानांचा काढा द्यावा.

## १६. करडई. ( सं. कुसुंभ. )

**करडईचे झाड ढोपरा इतके किंवा कंबरेइतके उंच वाढते. याचीं पानें लांबट असतात. त्यास बारीक कातरा असतो. करडईस पिव-ळ्या रंगाचें फूल येतें. त्यांत केशराप्रमाणें तंतु असतात. या फुलाच्या मागें मोठया सुपारीएवढे बोंड येतें. त्यांस टोंक असतें. या बोंडांत करडईचे दाणे असतात. या झाडास व बोंडावर कांटे असतात. कर-डई देशावर फार पिकते. करडईत दोन जाति आहेत. एक कांटयांची व दुसरी बीन कांटयांची. बीन कांटयांच्या करडईचीं फुले काढून वाळवितात. व त्यांचा कुसुंबा करितात. तो रंगास उपयोगी पडतो. ही फुलें काढल्यामुळें करडईच्या पिकास अपाय होतो. करडईच्या बियांचें तेल काढतात; तें खावयास व जाळावयास उपयोगी पडतें.**

पेंड गुरांस खावयास घालतात कोवळ्या करडईच्या पाल्याची भाजी करतात. करडईचे तेल बलकर व वीर्यवर्धक आहे.

**करडई**—वातूल, रूक्ष, विदाही, तिखट, आहे व मूत्रकृच्छ्र, कफ, रक्तपित्त यांचा नाश करिते. **करडईचीं** फुलें—स्वादु, त्रिदोषनाशक, भेदक, रुक्ष, उष्ण, पित्तकर, केशरंजनकारक, कफनाशक, व लघु आहेत. **करडईची** भाजी—मधुर, नेत्र्य, उष्ण, तिखट, अग्निदीपक, अतिरुचकर, रुक्ष, गुरु, सारक, पित्तकर, आंबट, गुदरोगकारक आहे व कफ, मळ, मूत्र, व मेद यांचा नाश करिते. **करडईचें तेल**—बलकर, खारट, कडू, विदाहि, अचक्षुष्य, गुरु, तीक्ष्ण, उष्ण, मलस्तंभक, रक्तपित्त-कारक, आंबट, त्रिदोषकारक, व कृमि, वायु यांचें नाशक आहे.

## १७. करंबळ. ( सं. भव्य. )

करंबळाची झाडे मोठमोठी होतात. ही झाडे कोकणप्रांती पुष्कळ आहेत या झाडाचे पान मोठे असून, हे हात सव्वा हात लांब असते. याची तीन पाने एकत्र जोडली असतां एक मोठी पत्रावळ तयार होते याच्या पानाच्या पत्रावळी करितात.

( १ ) **गर्भांतील उष्णतेमुळे मुलांच्या अंगाची त्वचा जाते त्यास**—करंबळाचे सालीचा रस तोळे २, जाईचे पाल्याचा रस तोळे २, पांढरा काथ तोळे २, शंखजिरें तोळा १, शेंदूर मासे ६, ज्येष्ठमधाचा शिरा मासे ६, व गाईचें लोणी तोळे ८, हीं सर्व एकत्र खलून तयार झाल्यावर हें औषध कापसाच्या बोळ्या, नें मुलांच्या अंगास लावावें. हें सतत ३ दि० दिवसांतून दोन वेळां लावावें, चवथे दिवशीं दूध व तूप एकत्र करून मुलाचे अंगास लावून स्नान घालावें. ( २ ) **पाय वळतात त्यास**—करंबळाचे सालीचा रस काढून त्यांत काळीं मिरें बारीक वांटून पायांस लेप करावी, व वर करंबळाचे पान घालून त्यावरून वस्त्राचें वेष्टन द्यावें या प्रमाणें एक दोन वेळ करावें. म्हणजे गुण येतो. ( वनौषधिप्रकाश. ) ( ३ ) **अतिसारावर**—करंबळाची साल दह्यांत उगाळून द्यावी.

## १८. करंज.

हें रानझाड आहे. याची झाडें छायेसाठीं रस्त्याच्या बाजूस लावतात याची छाया फार गार असून लोकांस फार प्रिय आहे. छाया फार दाट असते. याच्या बियांचें तेल निघतें; तें जाळावयास उपयोगीं पडते.

**करंज**—पाककाळीं तिखट, नेत्र्य, उष्ण, रसकाळीं कटु, तुरट, असा आहे उदावर्त, वायु, योनिदोष, वातगुल्म, अर्श, व्रण, कंडु, कफ, विष, विचर्चिका, पित्त, कृमि, त्वग्दोष, उदर, मेह, प्लीहा, यांचा नाश करितो. **याचें फळ**—उष्ण व लघु आहे व मस्तकरोग, वायु, कफ, कृमि, कुष्ठ, अर्श, मेह यांचा नाश करितें.

याचें तेल–वातनाशक, कृमि, नाशक, अति स्निग्ध आहे व दिव्याला जाळण्या विषयीं थंड आहे. हें कडू, उष्ण, व्रणाला भरणारें, व नेत्र रोग, विचर्चिका, वायु, कुष्ठ, व्रण, कंडु, गुल्म, उदावर्त, योनिदोष, अर्शरोग, व लेपानें अनेक त्वग्दोष. यांचा नाश करितो. ( १ ) **उंदरादिकांच्या विषावर**–करंजाची साल व बी उगाळून लेप करावा म्हणजे वीष उतरतें. ( २ ) **खरजेस**–करंजाचें तेल व कापूर अथवा निंबाचा रस एकत्र करून खरजेस लावावें; म्हणजे खरूज कंडू इत्यादि दूर होतात. ( ३ ) **अंडवृद्धीवर–व गंडमालेवर**–तांदूळाच्या धुणांत करंजाचें मूळ उगाळून लेप द्यावा. ( ४ ) **मेहरीवर म्हणजे मुंग्या येतात त्यावर**–करंजेल तेलांत कडू सुरणाच्या फोडी घालून तें तेल कढवावें व मेहरी आलेल्या भागावर लावावें. ( ५ ) **पित्तपाडण्यास**–करंजाची साल खाण्यास द्यावी अगर सालीचा रस द्यावा. ( ६ ) **व्रणसंबंधीं कृमि दूरहोण्यास**–करंज कडू निंब, निर्गुडी यांचीं पानें वांटून लेप करावा. ( ७ ) **फुलें, मांसवृद्धि, भूरी इत्यादिकांवर**–करंजबीजाचें चूर्ण करून, पळसाचें फुलांचा रस काढून त्या चूर्णाला त्या रसांची बहुतवेळ पुटें देऊन बारीक खलून वातीसारख्या लांबट गोळ्या बांधाव्या. ती गोळी पाण्यांत उगाळून अंजन करावें म्हणजे वरील सर्व नेत्ररोग शस्त्रानें कापून काढल्यासारखे दूर होतात. ( ८ ) **अर्धशिशीवर**—करंजाची बी ऊन्ह पाण्यांत उगाळून त्यात थोडा गूळ कालवावा व त्याचें नस्य द्यावें. ( ९ ) **खवड्यास**—रिठ्याच्या पाल्यानें खवडे धुवून टाकावे व करंजाचें तेल, निंबाचा रस व कडव्या कंवठीच्या बियांचें तेल एकत्र करून मस्तकास चोळीत जावें. ( १० ) **ऊरुस्तंभावर**—करंजाचे मूळ अ० साल उगाळुन ऊन्ह करून लेप द्यावा. ( ११ ) **ओकारीवर**—करंजाची बी किंचित् भाजून तुकडे करून वारवार खावी.

## १९. करटोल. ( सं० कर्टोली, कर्कोटकी· गु० कंटोळा. )

करटोलीचे वेल पावसाळयांत रानांत होतात. हे झुडपाच्या आश्रयानें असतात. याचा वेल पांच दहा हात लांब पसरतो याचे कांदे जमिनींत असतात. पाऊस पडला म्हणजे त्यांस अंकुर फुटून त्याचे वेल होतात. या वेलास आषाढाच्या सुमारास फळें येतात, हीं फळें रंगानें हिरवीं असून त्यांवर सुरेख कांटे असतात. याची भाजी चांगली होते. ही भाजी पथ्यकर असून स्वादिष्ठ आहे. ज्या कर्टोलीच्या वेलास फक्त फुलेंच येतात, फळे येत नाहींत; त्या वेलास "वांझकरटोल" असें म्हणतात. करटोलीचे वेल बहुत करून डोंगराळ जमिनींत होतात.

करटोली—रुचिकर, तिखट, अग्निदीपक, कडु, उष्ण, अशी आहे ववायु, कफ, विष, पित्त यांचा नाश करीते. हिचें फळ मधुर, लघु, पाककाळीं तिखट, अग्निदीपक

आहे व गुल्म, शूळ, पित्त, त्रिदोष, कफ, कुष्ठ, खोकला, मेह, दमा, ज्वर किलासकुष्ठ, अग्निमांद्य, अरुचि, हृद्रोग, यांचा नाश करितें. हिचें पान—रुचिकर, वृष्य, त्रिदोष नाशक आहे व कृमि, ज्वर, क्षय, दमा, खोकला, हिक्का, अर्श यांचा नाश करितें हि-चोकंद—मधाशीं मस्तकरोगावर प्रशस्त आहे. **वांझकरटोली**—कडु, तिखट, उष्ण, लघु, रसायन, शोधन अशी आहे व स्थावरादि विष, कफ, नेत्ररोग, शिरोरोग, व्रण, विसर्प, खोकला, रक्तदोष, सर्पविषांचा नाश करिते. ( १ ) **पालीच्या विषास**—कटोलीचा कांदा पाण्यांत उगाळुन द्यावा. दि. ७ ( २ ) **खर पडतें त्यावर व मूत्रकृच्छ्रावर**—वांझकर्टोलीचा कांदा एक तोळा मधाबरोबर द्यावा. ( ३ ) **आगीमव्यारीचे विषावर**—वांझकटोलीचा कांदा मधांत उगाळून अंजन करावें अथवा ते गाळून पाजावा. ४. ) **स्तनरोगावर**—वांझकटोलीचें मूळ उन्ह पाण्यांत उगाळून लेप करावा. ( ५ ) **सर्पाचे विषावर**—वांझकटोलीचा कांदा पाण्यांत उगाळून द्यावा व लेपद्यावा; ह्मणजे सर्प, विंचू, मांजर, उंदीर, यांचें विष उतरतें. अथवा वांझ कटोलीच्या कांद्यास शेळीच्या मूत्राच्या भावना द्याव्या व तो कांजींत वाटून त्याचें नस्य द्यावें; ह्मणजे विष उतरतें. ( ६ ) **सर्व विषारावर**—वांझकटोलीचा कांदा व धोत्र्याची मुळी तांदुळाचे धुणांत उगाळून पोटांत द्यावी व डांसावर लावावी. ( ७ ) **विंचवाचे विषावर**—वांझकटोलीचा कांदा व काळ्या भोंपळ्याचा डेंख पाण्यांत उगाळून दंशावर लेप द्यावा. ( ८. ) **उठाणूस**—करटोलीचा कांदा, कडूइंद्रावणीचें मूळ, व कंवडळीचें मूळ हीं तिन्ही थंडपाण्यांत उगाळून वारंवार लेप करावा. ( ९ ) **रक्तार्शावर**—करटोलीच्या कंदाचें चूर्ण साखरेंत द्यावें. ( १० ) **अपस्मारावर**—वांझकटोलीचें मूळ तुपांत उगाळून त्यांत साखर घालून त्याचें नस्य द्यावें. ( ११ ) **वातज मस्तकशूळावर**—कटोलीचा कांदा मधांत उगाळून लेप करावा. ( १२ ) **पानथरीवर**—आदितवारीं करटोलीचा कांदा आणून रोग्याकडून तो चुलीवर बांधावा. कांदा सुकत जाईल तशी पानथरीही जळूनजाते.

## २० करमर (सं. कर्मर. गु. मुह्रर.)

हीं झाडें कोंकणप्रांतीं पुष्कळ होतात. करमराचें झाड फार मोठें होत नाहीं. त्याचीं पानें पातळ असून छाया फार थंड असते. हें झाड सर्वकाळ हिरवें असतें व त्यास फळें पुष्कळ येतात. करमराचें लोणचें व मुरंबा चांगला होतो. करमरें गुळचट असतात. त्यांस मिरपूड व मीठ लावलें असतां विशेष रुची येते कोणी कोणी पिकलेलीं करमरें तशींच खातात. त्यांचे रंग पिवळट असतो. त्यास चोहोंबाजूस शिरा असतात. हें फळ पिकलें ह्मणजे सुंदर दिसतें. हें फळ पित्तशामक आहे. यास कर्मक असेंही ह्मणतात.

करमर हिरवें-ग्राहक, आंबट, वातनाशक, उष्ण व पित्तकारक आहे. पिकलें करमर-मधुर, आंबट, बलकर, पुष्टिकर व रुचिकर आहे.

२१ करवंद. ( सं. करमर्दक. गु. करमदानूं झाड. )

हीं कांटेरी झाडें आहेत. हीं डोंगरांत होतात. यास वाटोळीं आराकि व काळ्या रंगाचीं फळें येतात. हिरव्या फळांचें लोणचें होतें. याचीं लांकडें फक्त जाळावयास उपयोगीं पडतात. पिकलेलीं फळें चवीस आंमळाप्रमाणें आंबट लागतात. करवंदांत एक कवळी जात आहे.

करवंद हिरवें-कडू, अग्निदीपक, गुरु, पित्तकर, ग्राहक, आंबट, उष्ण, रुचिप्रद. रक्तपित्त; कफ यांना वाढविणारें व तृषानाशक आहे. पिकलें करवंद-मधुर, रुचिकर, लघु,शीतळ आहे, व पित्त, रक्तपित्त त्रिदोष, विष, वायु, यांना नाश करितें. ( १. ) विषाराची परिक्षा-करवंदाचें पाळ पाण्यांत उगाळून थोडेसें पोटांत द्यावें. विषार असल्यास वमन होणार नाहीं. ( २ ) खरुजेस-कडव्या करवंदीचें पाळ ( मूळ ) पाण्यांत किंवा गोडेतेलांत उगाळून वर लावावें. ( ३. ) क्षतांतील कृमि मरण्यास-कडव्या करवंदीचें पाळ पाण्यांत गंधाप्रमाणें उगाळून लेप द्यावा व थोडें पाणी करून क्षतांत सोडावें; ह्मणजे त्वरित कृमि नाहींसे होतात. ( ४ ) सर्पदंशावर-कडव्या करवंदीचें मूळ पाण्यांत उगाळून पाजावें. ( ५ ) विषमज्वरावर-कडव्या करवंदीचें मूळ उगाळून अंगास लेप करावा. ( ६. ) मळमुदास-कडव्या करवंदीचें मूळ गोमूत्रांत उगाळून पाजावें.

२२. कालिंगड. गु० तरबूच-हिं० तरबूज (सं० कालिंगी.)

कलिंगडाचे खरबुजाप्रमाणें वेल होतात. यांत दोन जाति आहेत. एक काळी असून वाटोळी व दुसरी पांढरी असून लांबोडी. पांढरे जातीचीं कालिंगडें मोठीं असून गोडीस चांगलीं असतात. याच्या पानास पांच टोकें असून प्रत्येक टोकामागें दीड अंगूळ खांच असते. कालिंगड भोपळ्याएवढें होतें. कालिंगड थंड आहे. कोंवळ्या कालिंगडाची भाजी असते. मारवाड, मथुरा, द्वारका येथें उत्कृष्ट प्रतीचीं कालिंगडें होतात यास 'टरबूज' असेंही ह्मणतात.

कलिंगड--शीतळ, बलकर मधुर, तृप्तिकर, गुरु, पुष्टिकर, मलस्तंभक, कफकर व दृष्टि, पित्त, व शुक्र, धातु यांचा नाश करितें. तें पिकलेलें खारट, उष्ण आहे. व वायु, कफ, यांचा नाश करितें. याचें पान कडू व रक्तशुद्धिकारक आहे. ( १. ) पुष्टतेल-कलिंगडाच्या बिया वांटून तो मगज अर्धातोळा, व खडिसाखर अर्धातोळा, एकत्र करून खावा. ( २. ) दाहावर-कालिंगड भक्षण करावें. (३) उन्हाळ्यावर-

कलिंगडाच्या गिराचें पाणी पावशेर काढून त्यांत जिरें व खडीसाखरेचें चूर्ण घालून द्यावें. (४) इंद्रियांत चट्टे पडतात त्यास-कलिंगडाची चौकोनी कपची काढून, त्यांत पावशेर पिठीसाखर घालून, त्यावर ती कपची पूर्ववत् बसवून तें रात्रौ दवांत ठेवावें व सकाळीं त्यांतील पाणी प्यावें. म्हणजे इंद्रियांतील चट्टे, पुटकुळया व मूत्रसमयीं आग होणें हे विकार शमन होतात.

२३. कलौंजी. ( गु० कलौंजी जीरूं. हिं० कलौंजी, सं० उपकुंचिका. )

कलौंजीजिरेही कडुजिऱ्याप्रमाणेंच असतात. झाडही तेवढेंच मोठें होतें. उत्तर हिंदुस्थानांत याची उत्पत्ती विशेष होते. हीं झाडें बागांतून लाविल्यास होतात.

हे जिरे कडू, तिखट, उष्ण, अग्निदीपक, वृष्य, अजीर्णनाशक, गर्भाशयाला शुद्ध करणारें, व आध्मान वायु, गुल्म, रक्तपित्त, कृमि, पित्त, आमदोष, वायु, शूल, यांचा नाश करितें. ( १ ) अजीर्ण, अग्निमांद्य, आम, व शूळ यांवर—कलौंजी जिऱ्याचा काढा करून त्यांत पादेलोणाचें चूर्ण टाकून द्यावें.

२४. कसई. ( गु० कांसडो. हिं० काश. सं० काश. )

कसईस "कसाड" असेंही म्हणतात. कसई हें गवत बोरूप्रमाणें आहे. जशीं बोरूचीं बेटें होतात, तशींच कसईचींही होतात. कसइचा कूड घालण्याकडे उपयोग होतो. यास 'कासेगवत' असेंही म्हणतात. हिचें बी आकारानें करडीप्रमाणें असून सफेत व कठीण असतें.

कसई—तर्पण, शीत, गौल्य, रुचिकर, बलकारक, मधुर, वृष्य, कडु, पाककाळीं मधुर, सारक, स्निग्ध, अशी आहे, व पित्त, दाह, मूत्रकृच्छ्र, क्षय, मुत्राश्मरी, रक्त-दोष, रक्तपित्त, क्षतक्षय पित्तरोग, याचा नाश करणारी आहे. ( १. ) मूत्रकृच्छ्र व मूत्राश्मरी यांजवर—कसईचे मुळांचा काढा मध घालून द्यावा.

२५. कवठ ( सं० कपित्थ. गु० कोंथ. हिं० कैथि. )

कवठाचीं झाडें दक्षिण देशांत व गुजराथेंत फार होतात. हा वृक्ष मोठा होतो. या वृक्षाच्या फळास कवठ असें म्हणतात. तें वाटोळें व आंब्याएवढें असतें. त्याचें कवच कठीण असतें. पिकलेलें कवठ नुसतें किंवा त्यांत गूळ किंवा साखर घालून खातात. हिरव्या कवठाच्या मगजाचें सार व कोशिंबीर होते. याची चटणीही करितात. पिकलेल्या कवठाचा मुरंबाही होतो.

कवठीचें झाड—मधुर, आंबट, तुरट, ग्राहक, शीतळ, वृष्य, कडु, आहे व पित्त; वायु, व्रण यांचा नाश करितें. याचें हिरवें फळ ग्राहि, उष्ण, रुक्ष, लघु, आंबट, तुरट, लेखन, व वायु, पित्त जिव्हाजाड्य, यांना करणारें, रुचिकर, असें आहे,

व विष, स्वर, कफ यांचा नाश करितें. **पक्व कवठ**–रुचिकर, आंबट, तुरट, ग्राहक, मधुर, कंठशुद्धिकर, शीतळ, गुरु, वृष्य व दुर्जर आहे व श्वास, क्षय, रक्तरोग, वांति, वायु, श्रम, हिध्मा, विष, ग्लानि, तृषा; त्रिदोष, उचकी खोकला, यांचा नाश करितें. याचें बीज हृद्रोग, मस्तकशूळ, विष, विसर्प, यांचा नाश करितें. **बियांचें तेल**––तुरट, ग्राहक, गोड आहे, व पित्त, उंदराचें विष, कफ, उचकी, वांति, याचा नाश करितें. याचें फूल विषनाशक व याचीं पानें वांति, अतिसार आणि उचकी यांचा नाश करितात. ( १ ) **पित्त शमन होण्यास**—कवठाचा मगज साखर घालून खावा. अ० कवठाचे पाल्याचा रस दुधाशीं मिळवून प्यालें असतां, दुर्धर प्रबल झालेलें पित्त शमन होतें. ( २ ) **कामलेवर**—कवठीचे पाल्याचा रस गाईचें दूध घालून पांचतोळे पर्यंत काढावा आणि प्रत्यहीं एक वेळ प्रमाणें द्यावा. ( ३ ) **प्रदरावर**—कवठ व वेळू यांचा समान पाला वांटुन तो कल्प मधाशीं द्यावा. ( ४. ) **अंगांतील गर्मी, उष्णता वगैरे निघून जाऊन धातुपुष्टि होण्यास**––कवठीच्या पाल्याचें चूर्ण दुधांत, खडीसाखर घालून द्यावें. ( ५ ) **उंदराचे विषावर**––कवठाच्या बियांचें तेल लावावें. ( ६. ) **अंगावर पित्ताच्या गांधी उठतात त्यास**–कवठीचा पाला बारीक वाटून त्याचा रस गांधीस लावावा किंवा वाटलेला पाला दह्यांत कालवून अंगास लावावा, व पाल्याचा रस काढून त्यांत खडीसाखर घालून तो प्यावा. म्हणजे एका तासाच्या आंत गांधी मावळतात. ( ७ ) **अंगांत मुरलेलें रसायण निघण्यास**–कवठीचा पाला, तांदुळजाचे भाजीचा पाला व केळीच्या केळफुलास ज्या पारंब्या असतात व गळून पडतात; त्या सर्व समभाग घेऊन, त्यांचा अष्टमांश काढा नित्य २ वेळ प्रमाणें चौदा दिवस द्यावा. दोन्ही वेळ औषधें ताजीं असावीं. तेलकट, आंबट, मीठ, तिखट हे पदार्थ खाऊं नयेत व स्नानही करूं नये. पंधरावें दिवशीं सर्वांगास बकरीच्या लेंड्या गोमूत्रांत वाटून त्याचा चार घटका लेप करून ठेवावा, नंतर स्नान करून भोजन करावें. ( ८ ) **उचकी व श्वासावर**–कवठाचा अंगरस, मध व पिंपळीशीं द्यावा. ( ९ ) **अन्नद्वेषावर**–कवठाच्या गिरांत सुंठ, मिरें, पिंपळी यांचें चूर्ण, मध व साखर मिळवून रुचिकर करून तोंडांत धरावें.

## २६ कंवडळ ( सं. चित्रा. )

**कंवडळाचे वेल असतात. या वेलावर फळें येतात, त्यांचा प्रथम हिरवा रंग असतो, नंतर तीं पिकलीं म्हणजे त्यांचा सुशोभित तांबडा रंग होतो. हें फळ फारच कडू आहे. शोभेस हीं फळें देवापुढें टांगून ठेवतात. कंवडळाचे गुण इंद्रावणीप्रमाणें आहेत.**

( १ ) **कंठसर्प वगैरे कंठरोगांवर**—कंवडळफळाची साल चिलमींत घालून ओढावी. दि० ३. ( २ ) **कफ पातळ होण्यास**—कंवडळफळाची साल चिलमींत ओढावी; म्हणजे वमन होऊन घसा मोकळा होतो. ( ३ ) **काळपुळीवर**—कंवड-

ळ्याची मुळी व कडू वृंदावनाची मुळी थंड पाण्यांत उगाळून वारंवार लेप द्यावा. (४) प्रमेहावर—कंवडळ, त्रिफळा, हळद यांचा काढा व निकाढा मध घालून द्यावा. (५) अंडवृद्धीवर—लघु कंवडळीच्या मुळाचें चूर्ण एरंडेलांत खलून दिवसांतून दोन तीन वेळ खावावें व तेंच चूर्ण दोनमासेप्रमाणें सकाळ संध्याकाळ गाईच्या दुधांत द्यावें. म्हणजे तीन दिवसांत गुण येतो. (६) स्तनरोगावर—कंवडळाचे मुळाचा लेप द्यावा. (७) खरजेवर—सुकलेलीं कंवडळें जाळून त्यांची काळी राख करून तिळांचे तेलांत खलून लावावी.

## २७. कवला. (सं. कलाय.)

कवल्याची भाजी कोंकणांत प्रसिद्ध आहे. हें झाड सुमारें वीतभर उंच वाढतें. हीं झाडें रानांत आपोआप होतात. श्रावण सोमवारच्या दिवशीं कित्येक लोक ही भाजी अवश्य खातात. या भाजींत कांदा घालून केली असतां ती चांगली होते.

कवलाभाजी—भेदक, उष्ण, कडू व त्रिदोषघ्न अशी आहे.

## २८ कळंब (सं. कदंब गु. हिं कदंब,)

कळंबाचें झाड मोठें होतें. हें झाड सर्वत्र प्रसिद्ध आहे याचीं पाने मोठी असून रुंद असतात. या झाडास गोंद येतो.

कळंब—तिखट, कडू, तुरट, खारट, शुक्रवर्धक, शीतल, गुरु, विष्टंभकारक, रुक्ष, स्तन्यप्रद, ग्राहक, वर्णकर असा आहे व रक्तरोग, पित्त, कफ, व्रण, दाह, विष, मूत्रकृच्छ्र, वायु यांचा नाश करितो. (१) लहान मुलांस तान पडते त्यावर—तान्हेचीं लक्षणें अशीं होतात कीं, मुलास ताप येतो, कानांच्या पाळी व नाकपुड्या अगदीं लिबलिबीत होतात. वरचेवर मलद्वारानें पाणी पडतें. तृषा फार लागते. तालुस्थान उडतें. असा प्रकार झाला असता त्यावर कळंबाचे सालीचा, थोडें थंड पाणी घालून रस काढावा व त्यांत जिरें व खडीसाखर घालून पोटांत द्यावा, व हाच रस टाळूवर ५ । ६ वेळां चोळावा, याप्रमाणें तीन दिवस करावें. नंतर चौथे दिवशीं त्यास स्नान घालून टाळूवर कारेळ्याचें तेल घालावें. कळंबाची साल पाण्यांत उकळून त्याचें स्नानही घालावें. (२) डोळे येतात त्यास—कळंबाचे सालीचा रस काढून त्यांत अफु व तुरटी घालून लिंबुरसांत एक करून, हा बाहेरून कढत करून डोळ्यांवर घालावा. (३) मुखरोगावर—कळंबाच्या सालीच्या काढ्याच्या गुळण्या कराव्या.

## २९. कळलावी. (गु. कलगारी. हिं. कलिहारी.)

कळलावीचें झाड प्रथम जाड मयताप्रमाणें असून वेलीप्रमाणें

पसरतें, हिचीं पानें आल्याच्या पानांप्रमाणें असतात. ही बहुधा कुंपणाचे आश्रयानें होते. कळलावीच्या जुनाट झाडाची झाडाची जाडी कर्दळीच्या झाडाएवढी असते. हीं झाडें उन्हाळ्यांत सुकून जातात. हिच्या फुलाच्या पाकळ्या लांब असून फूल जास्वंदीच्या फुलाएवढें असतें. हीं फुलें तांबडीं, पिवळीं, भगवीं, पांढुरकीं अशीं रंगी बेरंगी असतात. या फुलांच्या योगानें झाडही दुरून मोठें शोभिवंत दिसतें. हिचा कंद विषारी आहे. हीस "खड्या नाग," "वागचबका," असेंही ह्मणतात. कोंकणांत हीस कोणी 'कलई' 'कळवी' असेंही ह्मणतात.

**कळलावी**—सारक, कडू, तिखट, खारट, पित्तकर, तीक्ष्ण, उष्ण, तुरट, लघु आहे व कफ, वायु, कृमि, बस्तिशूळ, विष, कुष्ठ, अर्श, कंडू, व्रण, सूज, शोष, शूळ, शुष्कगर्भ व गर्भ यांचा नाश करिते. (१) **कालमांजरीस व नारूस**—कळलावीचा कंद उगाळून लावावा. नारूचा उगम होतांच हा उपाय करावा. (२) **अपची**—( गंडमालेचा भेद ) रोगावर कळलावीच्या कंदाचा कल्क करून त्यांत चौपट तेल व तेलाइतकाच निर्गुडीचा रस घालून तेल सिद्ध करून त्याचें नस्य करावें व लेपही करावा. (३) **व्रण. गंडमाळा, काळपुळी, बद,** यांवर—कळलावीचा कांदा वाटून लावावा. (४) सूज, गांठ वगैरेवर—कळलावीचा कांदा वाटून घालावा. (५) **सुखप्रसव होण्यास**—कळलावीचा कंद पाण्यांत उगाळून आपले हातास लेप करून, ज्या स्त्रीस कष्ट पडले असतील तिचे हातास आपले हाताचा स्पर्श करावा ह्मणजे सत्वर प्रसूत होते. अ० कळलावीचे कंदास तंतु बांधून, तो हातापायांस बांधावा. (६) **गुदांचें अंग बाहेर येतें त्यास**—कळलावीचा पाला हातांस चोळून त्या आंगाजवळ दोन्ही हात न्यावें ह्मणजे अंग आंत जातें. न जाईल तर त्या अंगास हाताचा स्पर्श करावा; व दोन्ही हात तोंडापुढें नेऊन दाखवावे ह्मणजे अंग आंत स्थिर राहतें. पुनः बाहेर येत नाहीं. (७) **काविळीवर**—कळलावीच्या पाल्याचें चूर्ण ताकाशीं द्यावें. (८) **योनिशूल व पुष्पावरोधावर**—कळलावी, अघाडा, किंवा वृंदावन यांचें मूळ योनींमध्यें धारण करावें. (९.) **कृमिकर्ण** ह्म० कानांत कृमि होतात त्यावर—कळलावीचा कांदा वाटून त्याचा रस कानांत घालावा. (१०) **सर्पदंशावर**—कळलावीचा कंद पाण्यांत वाटून त्याचें नस्य द्यावें. (११.) **इसबावर**—कळलावीचा व कडवीचा कंद उगाळून ४।५ दिवस लावावा.

### ३० कंकोळ. ( सं. कंकोल गु. कंकोल. हिं. सीतलचिनी )

**कंकोळास 'कापुरचिनी,' 'कबाबचिनी' असेंही ह्मणतात.** कंकोळाचे वेल असतात हे हिमालयपर्वत व चीनदेशांत होतात. कंकोळ हें फळ मिऱ्यासारखें असतें, कंकोळ हें फळ सुगंधी असून फार थंड आहे. याचा औषधांत व सुगंधी पदार्थांत उपयोग पुष्कळ होतो.

**कंकोळ**— तिखट, कडू, उष्ण, दीपन, पाचन, रुचिकर, हृद्य, सुगंधी, लघु, कफनाशक व मुखजाड्य, वातरोग, हृद्रोग, कृमि, अंधत्व, मुखदुर्गंध, आम, अग्निमांद्य यांचा नाश करितें. ( १ ) **मुखरोगावर**—कंकोळ व खडीसाखर दाढेखालीं धरून रस गिळीत जावा. ( २ ) **प्रमेहावर**—कंकोळाचें चूर्ण करून तें साखरेबरोबर खावें. ( ३ ) **रक्तष्ठीवीसंनिपात**—ह्मणजे ज्या संनिपातांत रक्ताच्या उलट्या होतात त्यावर—कंकोळाच्या चूर्णाचें नस्य द्यावें. ( ४ ) **प्रमेह** व आगंतुक मर्मीवर—कंकोळ अर्धा तोळा घेऊन साधारण कुटून अष्टमांश काढा करावा. त्यांत उत्तम चंदनी तेल सहांपासून बारा थेंबपर्यंत घालावें, व काढा निवळून घ्यावा. या योगानें लघवी साफ होते व चंदनीतेल आंतील जखमेवर बसून दोन चार दिवसांत जखम भरून गुण येतो, हें औषध प्रत्यहीं प्रातःकाळीं, दोनप्रहरीं भोजनोत्तर व सायंकाळीं याप्रमाणे सतत ५ दि० घेऊन फक्त गव्हाची पोळी व तूप साखर इतकेच पदार्थ खावे ह्मणजे त्वरित गुण येतो. ( ५ ) **संग्रहणीवर**—कंकोळ १ तोळा, वेलदोडे १ तोळा, सोमकाव १ तोळा यांचें चूर्ण करून कापशीच्या पाल्याच्या रसांत खलून बोराएवढ्या गोळ्या करून एक सकाळीं व एक सायंकाळीं घेत जावी. ( ६ ) **मुखमाधुर्यावर**—कंकोळ, कापूर व मिरें साधारण चावून दाढेंत धरावें व त्यापासून उत्पन्न होणारा द्रव थुंकीत राहावें. ( ७ ) **उन्हाळ्यावर**—कंकोळांचा काढा करून त्यांत ५ थेंबपर्यंत चंदनीतेल घालून द्यावें.

### ३१. कांकड. ( सं. कर्कटक. )

**कांकडाचा वृक्ष मोठा असून त्याचीं पानें साधारण मोठीं असून लांबट असतात. कांकड हें फळ आंवळ्याएवढें दिसतें, परंतु त्यांत आंवळ्यासारखी मोठी आठी नसते. त्यांत दोन तीन लहान बिया असतात. हीं फळें ज्येष्ठाच्या सुमारास येतात. तीं रुचकर असून पित्तशामक आहेत. त्यांचें लोणचें चांगलें होतें. हीं फळे जून झालीं असतां उपयोगीं नाहींत.**

**थोरकांकडाचें फळ**—तुरट अग्निदीपक, आंबट, शीतळ, लघु, उष्ण, नेत्रांला हितकारक, व रक्तपित्त, कफ यांना करणारे व वातनाशक आहे. तेंच पिकलें असतां शीतळ, रुचिकारक, जड आहे व पित्त, रक्तदोष. कफ याचा नाश करितें. **लहान कांकडाचें फळ**—ग्राहक, आंबट, पित्तल, अग्निदीपक, उष्ण, लघु आहे, व तें पिकलें असतां मधुर, स्निग्ध, तुरट, वातनाशक, व कफ, पित्तकारक असें आहे. ( १ ) **व्रणावर**—कांकडाचे झाडाची साल वाटून लावावी. ( २ ) **डोळ्यांतील फूल झडण्यास**—कांकडाच्या झाडाचा हात भर लांबीचा बारीकसा तुकडा तोडून तोंडांत धरून फुंक मारावी, व त्यांतून जो रस निघेल तो ३ दिवस डोळ्यांत घालावा.

( ३ ) प्रमेहावर—कांकडाच्या पाल्याचा रस, जिरें व खडीसाखरेशीं खावा.

## ३२ कांकडी. ( सं. कर्कटी. )

कांकडीचा वेल असतो खिरा, कांकडी; वाळूक, तवसें इ. फळें एक जातीचीं आहेत. त्यांत थोडा फेर असतो. सर्वांत कांकडी चांगली लागते. कांकडीत साधी, सातपानी, टरकांकडी, तवसें व नारंगी अशा जाती आहेत. कांकडीची भाजी, कोशिंबीर व सांडगे करितात. कांकड्या सोलून उभ्या चिरून त्यांत मिरपूड व मीठ घालून कांहीं वेळ चोळून, त्यांतील पाणी वाहून जातें तें गेल्यावर खाण्यास चांगली लागते. कांकडी थंड आहे. फार खाल्ली असतां बाधते. भिजवून मळलेल्या कणकींत कांकडीचें पाणी पडलें तर त्या कणकींतील चिकटपणा नाहींसा होतो, हा मोठा चमत्कार आहे.

कांकडी—मधुर, शीत, रुचिकर, लघु, मूत्रल, सालेच्याठायीं तिखट, कडू पाचक, अग्निदीपक, अवृष्य, ग्राहिणी, मूत्ररोध, अश्मरी, मूत्रकृच्छ, वमि, दाह, श्रम, यांचा नाश करिते. ही पिकली असतां रक्तदोषकर, उष्ण व बलकर आहे. ( १ ) मूत्राघातावर—कांकडीचें बीं १ तोळा पावशेर पाण्यांत टाकून द्यावें. अथवा कांकडीचें बी, जिरें व साखर हीं पाण्यांत टाकून घ्यावीं. ( २ ) गुडघी व मांड झाल्यास त्यावर—कांकडी ठेंचून ऊन्ह करून बांधावी, किंवा कांकडीची जाड साल बांधावी व वरून कपड्याचें वेष्टण द्यावें. याप्रमाणें २ । ३ दिवस करावें. ( ३ ) मद्यावर उतार—कांकडी खावी म्हणजे मद्याचा मद उतरतो. ( ४ ) मुतखड्यावर—कांकडीचें बीं व पारव्याची विष्ठा हीं तांदुळांचे धुणांत वाटून द्यावी. ( ५ ) गलगंडावर—जुन्या कांकडीच्या रसांत बिडलोण व सैंधव घालून नस्य करावें. ( ६ ) पांढऱ्या धुपणीवर—कांकडीच्या बियांतील मगज एक तोळा व पांढऱ्या कमळाच्या पाकळ्या एक तोळा बारीक वाटून त्यांत जिरें व खडीसाखरेची पूड टाकून तें ७ दिवस द्यावें ( ७ ) उन्हाळ्यावर—कांकडी चिरून तींत खडीसाखरेची पूड व निंबाचा रस घालून ती खावी. ( ८ ) मूत्रकृच्छ्रावर—कांकडीच्या बिया सोलून त्यांतील मगज, ज्येष्ठमध व दारूहळद यांचें चूर्ण तांदुळांच्या धुणांत द्यावें. ( ९ ) मूत्ररेचनास—अच्छेर दुधांत पाणी मिश्र करून कांकडीचें बीं पाव तोळा व सोरमीठ दीड मासा हीं एकत्र बारीक वाटून कालवावीं आणि उभ्यानें एकदम प्यावें, व फिरत रहावें. याच्या योगानें मूत्राशयांतील गर्मी झडून जाते व प्रमेह वगैरे विकार दूर होतात. ( १० ) मूत्रकृच्छ्रावर—कांकडीचें बीं, गुलाबकळी व पांढऱ्या कमळाच्या पाकळ्या एकत्र वाटून वस्त्रगाळ पाणी करून द्यावें; व त्यांत साखर घालून पिण्यास द्यावें. ( ११ ) शीतज्वरावर—कांकडी खाऊन वर आं-

वट ताक प्यावें आणि शेक घ्यावा किंवा उन्हांत पांघरूण घेऊन बसावें; म्हणजे सर्वांगाला घाम येऊन शीतज्वर नाश पावतो.

### ३३. काकडशिंगी. ( गु. काकडाशिंगी. हिं. काकडाशृंगी. ) ( सं. कर्कटशृंगी. )

काकडशिंगीचे वृक्ष हिमालय पर्वतावर होतात. या वृक्षाच्या बाहल्यांस कीटकाच्या कृतीनें उत्पन्न झालेला रस जमून त्याची फलाकृति गांठ होते तीस ' काकडशिंगी ' असें म्हणतात.

काकडशिंगी—ही कडू, उष्ण, तुरट, जड, आहे, व वायु, उचकी, अतिसार यांचा नाश करणारी, बालकांस हितकारक, व दमा, खोकला, रक्तदोष पित्त, ज्वर, कफक्षय, वायु, हिक्का, ऊर्ध्ववात, कृमि, तृष्णा, क्षतक्षय, अरुचि यांचा नाश करिते. ( १ ) शृंग्यादि चूर्ण—बालकाचा खोकला, ज्वर व वांति यांवर-कांकडशिंगी, नागरमोथे, अतिविष यांचें चूर्ण मधाशीं द्यावें. ( २ ) बालकाचे खोकल्यावर—काकडशिंगी व मळ्याचें बीज यांचें चूर्ण, तूप व मध यांशीं द्यावें. ( ३ ) अतिसारावर—काकडाशिंगीचें चूर्ण मासा दीडमासा, मधांतून द्यावें.

### ३४. कांग ( धान्य ). ( सं, कंगु )

हें धान्य वरीसलाच एक प्रकार आहे खरा, तथापि यांत पुष्कळ तफावत आहे. वरीवरील साल फार पातळ असतें, आणि रंग पिवळट असतो; परंतु कांगाचें साल जाड असून तांबूस, पिवळट, काळसर अशा तीन चार प्रकारच्या रंगाचें असतें. त्याचा भात, पेज इ० पदार्थ करितात. लाह्या व पीठ करावयाचें असलें तर ते सडल्यावांचून भाजले पाहिजेत. कांगाचें रोप दोन अडीच हात उंच होऊन त्यास जें कणीस येतें तें बाजरीच्या कणसाप्रमाणे लांब व बारीक असतें, हा एक वरीपेक्षां कांगांत मुख्य भेद आहे. कांगाच्या पात्या अरुंद असतात.

कांग—शीतल, व वातकारक, रूक्ष, वृष्य, तुरट, धातुवर्धक, स्वादु, गुरु, घोड्यांला हितावह, व कफ, पित्त यांचा नाश करितात. हे कृष्ण, रक्त, अच्छ व पीत या भेदानें चार प्रकारचे, व गुणांनीं एकाहून एक अधिक आहेत. ( १ ) अस्थिभग्न व शल्यावर—कांगाचे तांदुळांची खीर खावी.

### कांगोणी ( कामोणी. ) ( सं. काकांगी. )

हीं झाडें पर्जन्यकाळीं उगवतात. हीं सुमारें दोन हात उंच वाढतात. यास लाल व गुंजेएवढीं बारीक, फळें येतात, तीं मुलें आवडीनें खा-

तात. याच्या पानांच्या रसानें कागदावर लिहिलेलें हिरव्या रंगाच्या शाईप्रमाणें दिसतें.

(१) **नळगुदावर**—याच्या पानांचा रस लावावा म्हणजे नळगुदाची सूज उतरते. (२) **पित्तावर**—याच्या पानाची भाजी करून खावी म्हणजे पित्त शमन होतें, (३) **अफूवर**—पानांचा रस काढून पाजावा. (४) **कानांत किडे वगैरे गेल्यास**—पानांचा रस पिळावा.

## ३६. कांग. (सं० काकजंघा.)

**हिचीं पानें अघाडयाचे पानासारखीं असतात. झाडही तेवढेंच म्हणजे कंबरेइतकें उंच असतें. कांगेचीं पानें फार मृदु असतात. कांगेस देशावर 'घावकाडी' असेंही म्हणतात.**

**कांग**—तुरट, तिखट, उष्ण, कडू, वनकर आहेत व कफ, व्रण, कृमि, बाधरता, विषमज्वर, अजीर्ण, रक्तपित्त, ज्वर, कंडु, कुष्ठ, विष व पित्त यांचा नाश करिते. (१) **व्रणावर** कांगेचा पाला जाळून तुपांत अ० तेलांत खलून लावावा. (२) **कानांत कीड गेल्यास**—कांगेचा रस पिळावा. (३) **धीब्यास नाळ पडल्यास**—कांगेचा पाला जाळून तेलांत खलून त्याची पट्टी लावावी. (४) **कर्णनाद व बहिरेपणावर**—कांगेचा रस कानांत घालावा. (५) **सवडयांस गर्भकर्णास, व नायट्यास**—कांगेच्या झाडाची राख तेलांत खलून लावावी. (६) **निद्रा येण्यास**—कांगेचें मूळ मस्तकावर धारण करावें. (७) **श्वेतप्रदरावर**—कांगेच्या मुळांचा रस, लोध्रचूर्ण व मध हे घालून द्यावा.

## ३७. कांचन. (गु. कंचनार. हिं. कचनार.)

## (सं. कांचनार.)

**हा वृक्ष बराच मोठा होतो. हा बहुतेक आपटयाप्रमाणें दिसतो. याचीं पानें आपटयाच्या पानासारखींच असतात; परंतु आपटयाच्या पानांहून मोठीं व पातळ असतात. यांत पांढरा, पिंवळा व तांबडा अशा तीन जाति आहेत. याच्या फुलास साधारण सुवास असतो. यास चपटया शिकेकाईसारख्या शेंगा येतात. यांच्या लांकडाचा रंग तांबूस असतो, व हें रंगाच्या कामीं पडतें. हें लांकुड फार चिवट असतें, यामुळें यांच्या काठया करितात.**

**तांबडा कांचन**—शीतळ, सारक, अग्निदीपक, तुरट, ग्राहक, असा आहे व कफ, पित्त, व्रण, कृमि, गंडमाला, रक्तपित्त, कुष्ठ, वायु, गुदभ्रंश, रक्तपित्त, यांचा नाश करितो. व याचें फूल शीतळ तुरट, रूक्ष, ग्राहक, मधुर, लघु व पित्तक्षय, प्रदर, खोकला व रक्तविकार यांचा नाश करितें. **श्वेतकांचन**—ग्राहक, तुरट, म-

धुर रूक्षकर, रुक्ष असा आहे व दमा, खोकला, पित्त, रक्तविकार, क्षत, प्रदर यांचा नाश करितो. **पीतकांचन**— ग्राहक, दीपन, व्रणरोपण, तुरट आहे. व मूत्रकृच्छ्र, कफ व वायू यांचा नाश करितो. ( १ ) **गंडमाळेवर**—कांचनाची साल तांदुळांच्या धुणांत उगाळून तें २ पासून ४ तोळेपर्यंत द्यावें; अथवा कांचनाच्या सालीच्या काढ्यांत सुंठीचें चूर्ण घालून द्यावें. दि० ४२. (२. ) **कफापासून झालेल्या नारूवर**—कांचनाच्या सालीच्या कल्काचा लेप करावा. ( ३ ) **दाहावर**—कांचनाच्या सालीचा रस, जिऱ्याचें चूर्ण व कापुर घालून द्यावा. ( ४ ) **गंडमाळा फुटण्यास**—कांचनीमूळ, चित्रक, अडुळसा यांच्या पाण्यांत वाटून सात दिवस लेप केला असतां, सर्व दोषांपासून झालेल्या गंडमाळा फुटतात. हा लेप फोडांवरही द्यावा.

## ३८. काजरा. ( कुचला. सं. कारस्कार; विषमुष्टि. )

**सह्याद्रिपर्वताच्या प्रदेशांत हें वृक्ष बहुत आहेत. या वृक्षाचीं फळें पानें, किंबहुना सर्व भाग विषयुक्त आहेत. याच्या पानावर कांहीं पदार्थ खाल्ला असतां देखील विकार होतो. याच्या फळास " जहर कुचला " असेंही म्हणतात. असा हा विषारी वृक्ष निरर्थक आहे असें कोणी म्हणेल, परंतु या वृक्षापासूनही मनुष्यांस पुष्कळ उपयोग व्हावा असे यांत ईश्वरानें गुण ठेविले आहेत.**

**काजरा**—मदकर, तुरट, ग्राहक तिखट, कडू, लघु, उष्ण, व कुष्ठ, रक्तविकार कंडु, कफ, वातरोग, व्रण, अर्श, व ज्वर यांचा नाश करितो. याचें हिरवें फळ—ग्राहक, तुरट, वातकर, लघु व शीतळ आहे. पिकलें फळ—विष, गुरु, पाककाळीं मधुर, व कफ, वायु, प्रमेह, पित्त व रक्तविकार यांचा नाश करितें. ( १ ) **जनावरांस कांहीं विषबाधा झाल्यास**—काजऱ्याची बी किंवा मुळी उगाळून लावावी म्हणजे तो विकार दूर होतो. ( २ ) **कुत्र्याच्या विषावर**—काजऱ्याच्या बिया तुपांत परतून, त्या रोज वृद्धीने सेवन कराव्या. अथवा काजऱ्याची बी १ वाल नित्य खावी. ( ३ ) **अंगांत वारा मारीत असल्यास त्यास**—काजऱ्याची बी उगाळून लावावी. ( ४. ) **उठाणूवर**—काजऱ्याची बी व समुद्रफळ उगाळून वर लावावें. ( ५ ) **नळगुदास**—काजऱ्याच्या झाडावरील बाशिंगाचे काप काढून कढियांत घालून काढा करून द्यावा. ( ६. ) **घुशी, उंदीर कमी व्हावयास**—कुचल्याच्या बियांचे चूर्ण करून तें पिठांत मिसळावें व तें पीठ उंदीर खातील अशा जागीं ठेवावें. हें पीठ फार विषारी आहे. ( ७ ) **हिंवतापावर**—कुचल्याच्या बिया करपूं न देतां तुपांत तळून काढाव्या म्हणजे शुद्ध होतात. मग त्यांचें चूर्ण करून तें १ । २ गुंजा घेऊन मधांतून द्यावें. ( ८ ) **बाळंतरोगावर**—शुद्ध केलेल्या

कुचल्याच्या बियांचें चूर्ण १ । २ गुंजा मधांतून द्यावें. ( ९ ) **नारूवर**--कुचल्याची बी, अ० कुचल्याची बी व सोमल पाण्यांत उगाळून ३ दिवस लेप करीत जावा. ( १० ) **शीतज्वर, आंव, शूळ व संग्रहणी यांवर**--शुद्ध कुचला ३ भाग, लवंगा १ भाग यांचा आल्याच्या रसांत खल करून गुंजप्रमाण गोळ्या करून ती मधांत द्यावी. ( ११ ) **शूलावर**--कुचल्याच्या बियांचें तेल पाताळयंत्रानें पाडून तें विड्यास लावून खावें. ( १२. ) **अजीर्ण शूल व मंदाग्नि यांवर**--शुद्ध कुचल्याचें १ अगर २ गुंजाभार चूर्ण मधांतून द्यावें.

### ३९. कांजळ.

हीं झाडें खाडींत व खाजणांत होतात. कांजळीचें झाड बहुतकरून इफळीसारखेंच असतें, परंतु तितकें चिवट व बळकट नसतें. फक्त सर्पणाच्या कामीं पडतें. यास बकुळीच्या फुलासारखीं लहान व सुवासिक फुलें येतात.

### ४० काजू. ( सं. काजूतक; अग्निकृत. )

हें झाड आफ्रिका खंडांत व हिंदुस्थानांत होतें. मलबार, गोमांतक व कर्नाटक येथें या झाडांची समृद्धि फार आहे. याची उंची सामान्य असते. हीं झाडें रानांत व डोंगरावर बहुतकरून असतात. यांत पांढरी व तांबडी अशा दोन जाति आहेत. या झाडापासून वाटसरू लोकांस आराम मिळतो. तो असा कीं, हे लोक मार्ग चालून थकले ह्मणजे दोन प्रहरीं या झाडाच्या छायेस जाऊन बसतात, व त्यांचीं फळें खाऊन आपली तहान भूक शमवितात. काजूचें फळ मऊ असतें; त्याला पुढें बी असतें तिची साल कठीण असतें, व आंत बिब्यासारखा चीक असतो, तो अंगास लागला असतां उफळतो. सालीच्या आंत जो गोळा असतो त्यास काजूगोळा असें ह्मणतात. हे गोळे स्वादिष्ट लागतात. परंतु फार खाल्ले असतां यांजपासून विकृति होते. ज्या देशांत काजूचें झाड होत नाहीं तेथें ते गोळे विकावयास नेतात. काजूचीं पिकलेली फळ खावयास उपयोगीं पडतात. वाळलेल्या बिया साखरेच्या पाकांत घालून हलवाई त्यांची मिठाई करितात. काजूच्या बियांचा चीक तारवांच्या तळास लावतात, तेणेंकरून त्यांस पाण्यापासून उपद्रव होत नाहीं. काजूचें पक्क फळ नळविकार नाशक आहे.

**काजू**--तुरट, मधुर, उष्ण, लघु, धातुवर्धक, आहे व वायु, कफ, गुल्म, उदर, ज्वर, कृमि, व्रण, अग्निमांद्य, कुष्ठ, श्वेतकुष्ठ, संग्रहणी, अर्श, व आनाह यांचा करितो ( १. ) **पायांस चिखल्या होतात त्यांस**--काजूच्या बियांचा चीक लावावा.

(२.) **गुरांस लाग** ह्मणून एक प्रकारचा उपद्रव होतो: त्यामुळें पाय सुजून त्यांच्यानें चालवत नाहींसें होतें त्यावर-हाच चीक लावावा ह्मणजे गुण पडतो. (३.) **मणियारीचे विषावर**-काजूचे सालीचा रस, घेणाराच्या शक्तीप्रमाणें पावशेरपासून अर्धशेरपर्यंत पोटांत देऊन त्याजवर दुर्वांचा रस द्यावा ह्मणजे विष उतरेल. फार व्याकुळ होईल तर तोच रस ताळवेस जिरवावा, व मग दांतखीळ उघडून पोटांत औषध द्यावें. (४.) **बद त्वरित फुटण्यास**-काजूचा गीर कच्चा आणि तिवराचें फळ थंड पाण्यांत गंधाप्रमाणें एकत्र उगाळून लेप करावा. यानें गांठी फुटतात. (५.) **नळविकारावर**-नित्य प्रातःकाळीं काजूचीं पिकलेलीं बोंडें डेंखा-कडील भाग कापून, मिरपूड व मीठ लावून तीन अगर चार दिवस खावीं.

## ४१ कांडवेल. (सं. कांडवल्ली.)

**कांडवेल ही वहिनिवडुंगाप्रमाणें असून त्यापेक्षां फार बारीक असते. हिच्या वेली असतात. हीस लहान लहान पेरें असतात. कांडवेलींत त्रिधारी कांडवेल, चौधारी कांडवेल अशा जाति आहेत कांडवेलीचा पुष्कळ विस्तार होतो. त्रिधारी कांडवेलीस "हांडसंधी" असें ह्मण-तात. तिचें वर्णन "हाडसंधी" या शब्दांत दिलें आहे.**

**कांडवेल साधारण**—तिखट, कडू, उष्ण, सारक, पित्तल, अशी आहे व गुल्म कृता, दुष्टव्रण, प्लीहा, उदर, अग्निमांद्य, शूल, वायु व मलस्तंभ यांचा नाश करिते चौधारी, कांडवेल भूतोपद्रव, शूल, यांचा नाश करिते व अति उष्ण, आध्मानवायु, तिमिर' वातरक्त, अपस्मार, वातरोग यांचा नाश करिते. (१.) **अंगांत भिन-लेल्या किंवा सर्व प्रकारच्या गरमींवर**--कांडवेल फोंपाळ्यांत भाजून पिळून दोन तोळेपासून तीन तोळेपर्यंत रस काढावा; त्यांत तितकेंच गाईचें तूप घालून एकवेळ अथवा दोनवेळ हा रस घ्यावा. दि० ७. पथ्य अळणी करावें. यानें चट्टे, चात्रे, स्राव इ० सर्व विकार त्वरित बरे होतात. (२.) **स्त्रियांच्या रजोदोषा-वर**-कांडवेल फोंपाळ्यांत भाजून २ तोळे रस काढून त्यांत तितकेंच तूप, गोपीचंद-नाची पूड १ तोळा व खडीसाखरेची पूड १ तोळा घालून द्यावा.

## ४२. कांडोळ.

**कांडोळीस 'सारढोळ' असेंही ह्मणतात. हा वृक्ष मोठा होतो. कांडोळीच्या झाडाचा वर्ण पांढरा सफेत असतो. कांडोळीचीं पानें मोठालीं असतात. याचीं फुलें लाल असतात. या झाडास आंब्याप्र-माणें वसंत ऋतूंत मोहर येऊन फळें येतात. या वेळीं जुनी पालवी सर्व गळून गेलेली असते. फळांचा आकार बदामाएवढा असतो. हीं पोंचट असतात. हीं पक्क फळें गुळचट लागतात ह्मणून तीं कोणी**

कोणी खातात. जंगली लोक या फळांतील डांळिंब्यांची आंबटी करून खातात. याच्या डाहळ्या मोगली एरंडाप्रमाणें पोंचट असतात कांडोळीच्या मुळांचा रंग लाल असतो हें मूळ थंड आहे. कांडोळीच्या झाडास सफेत डींक येतो तो उपयोगी आहे. त्यास कथल्यागोंद ह्मणतात. हें झाड इमारतीच्या उपयोगीं नाहीं. याच्या सालीवर कर्मणुकीसाठीं कागदें लिहितात व या सालीवर काहीं मंत्र लिहून अगपैण जाण्यासाठीं गळ्यांत बांधतात. कांडोळीची फांदी ठेंचून त्यापासून वाखाप्रमाणें दोऱ्या काढतात.

(१) लहान मुलास व मोठ्या मनुष्यास मुबारकी रोग (डब्यासारखा) होतो त्यास--कांडोळीचें मूळ, पांगाऱ्याचें मूळ, हेदूचें मूळ, उंबराचें मूळ हीं उगाळून द्यावीं. (२) अतिसारावर--कांडोळीची साल उगाळून द्यावी. (३) परमा, गरमी व धातुविकारावर--कांडोळीच्या सालीचा, पाणी घालून रस काढावा व तो साखर घालून द्यावा. अ० कांडोळीचें मूळ उगाळून खडीसाखर घालून द्यावें. कांडोळीचा गोंदही धातुविकारावर द्यावा. (४) गरमी, प्रमेह व धुपणीवर--कथल्या गोंद रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं खडीसाखर घालून द्यावा. (५) शोण व वायुवर--कांडोळीची साल पाण्यांत घालून तें पाणी उकळून त्यानें स्नान घालावें.

### ४३. कांटेधोत्रा. (गु. पीलोधंतुरो.) सं. स्वर्णक्षीरी.)

यास पिंवळाधोत्रा, विलायतीधोत्रा, बिलायत असेंही ह्मणतात. हें सुमारें हात दोन हात उंच वाढतें. याच्या सर्वांगावर बारीक कांटे असतात. यास जें बीं येतें तें बंदुकीच्या दारूप्रमाणें काळें असतें. हें कागदांत घालून जाळिलें असतां दारूप्रमाणें तडतड वाजतें. हीं झाडें पडसर जमिनींत पुष्कळ होतात. हीं झाडें सर्वत्र प्रसिद्ध आहेत. याच्या बियाचें तेल काढितात. याच्या मुळासही पिसोळ्याच्या मुळाप्रमाणें "चोक" ह्मणतात. याचे गुण पिसोळ्याप्रमाणें आहेत (१) विंचवाच्या विषारावर-कांटेधोत्र्याच्या मुळीची साल विड्यांतून खावी. (२) सामान्य विषावर-कांटेधोतऱ्याच्या मुळीची साल खावयास द्यावी. (३) हिवावर--कांटेधोत्र्याच्या मुळीची साल विड्यांतून खावी. (४) गर्मीच्या चट्टयांस मसा यांवर--कांटेधोतऱ्याचे शेंडे खुडले असतां जो चीक निघतो तो लावावा. अगर मूळ उगाळून लावावें. (५) डोळ्यांत फूल पडतें त्यास व सारा येतो त्यावर--कांटेधोत्र्याचा चीक डोळ्यांत घालावा. (६) डोळे आल्यास-कांटेधोतऱ्याच्या फुलांचा व पानांचा रस अ० चीक डोळ्यांत पि-

ळावा. ( ७ ) **रेच होण्यास**--मुळाचें चूर्ण शक्तीप्रमाणें उष्णोदकांतून द्यावें. ( ८ ) **प्रमेहावर**--कांटेधोतऱ्याच्या पाल्याचा रस दोन तोळे पर्यंत काढून त्यांत तितकेंच तूप घालून प्रत्यहीं एक वेळप्रमाणें पांच दिवस द्यावा. ( ९ ) **रक्तपित्तावर**--कांटेधोतऱ्याच्या पानांचा रस गाईच्या दुधांतून द्यावा. सहा महिनेपर्यंत घेतला असतां व्याधि निखालस जातो. ( १०. ) **खरजेवर**--कांटे धोतऱ्याचें बीं जाळून तेलांत खलून लावावें.

## ४४. कांटेरी डांबा.

रानांत एक प्रकारचा पांढरा कांटेरी डांबा होतो; तो पांच सहा महिने टिकतो. याचें झाड अर्धपुरुष उंच होऊन त्याच्या अंगास कांटे असतात. त्याची भाजी करितात. परंतु तीस स्वाद अगदी कमी असतो.

## ४५. कांटेशेवती. ( सं. भद्रतरणी. )

हीस 'पांढरीशेवती, ' 'गुलाबशेवती' 'शेवती गुलाब असेंही ह्मणतात. हिच्या झाडास गुलाबाप्रमाणे कांटे असून हिचीं पानेंही गुलाबाच्या पानाप्रमाणेच कात्रेदार असतात. हीस राखडीच्या आकाराचीं पांढऱ्या रंगाचीं सफेत फुलें येतात. हीं झाडे बगीच्यांतून लावितात. कांटेशेवतीचा पाक व गुलकंद करितात. तो पित्त आणि दाहशामक आहे.

**पांढरी कांटेशेवती**--सारक, शीतळ, हृद्य, शुक्रकर, लघु, तुरट, स्वादु, सुरभि, ग्राहक, वर्ण्य, तिखट, कडू, रुचिकर, अग्निदीपक, व त्रिदोष, मुखपाक, रक्तपित्त, कफ, पित्त, रक्तविकार, दाह यांचा नाश करिते. **हिचें पुष्प**--शीतळ, वर्णकर, व वात. पित्त, दाह, यांचा नाश करितें. **तांबडी कांटेशेवती**--रक्तविकृति, विंचवाचें विष, त्रिदोष यांचा नाश करिते. वरकड गुण पांढरीसारखेच आहेत.

## ४६. कातरवेल.

हीस कातरी असें ह्मणतात. हिच्या वेली असतात. कातरवेलीचीं पानें कातरनिर्गुंडीच्या पानासारखीं असतात. या वेली कुंपणीवर फार असतात. कातरनिर्गुंडिच्या पानास उग्रट वास येतो तसा हिच्या पानास येत नाहीं ही गुणानें फार थंड आहे.

( १ ) **गर्मीवर**--कातरवेलीच्या मुळया कुटून, त्यांचें अजमासें ६ मासे चूर्ण जुन्या गुळांतून दोन वेळां द्यावें. दि. ७,

## ४७. कांदा ( गु. डुंगरी. हिं. पिआज. सं. कंदक. पलांडु.)

कांदा सर्वत्र प्रसिद्ध आहे. कांद्याचा रोप हात सवाहात उंच वाढतो

**तो सरळ असून त्याच्या पात्या बारीक नळ्यांसारख्या असतात. कांद्यास जें बीं येतें तें काळें असून बंदुकीच्या दारूप्रमाणें असतें. कांद्याच्या मधून जो देठ निघतो त्यास नळा असें ह्मणतात. हे कोंवळे असतां त्याची भाजी करितात. कांद्यांत दोन जाती आहेत; पांढरा व तांबडा. पांढरा कांदा औषधांत जास्त उपयोगी आहे. कांद्यामध्यें अतिपौष्टिकपणा आहे. याविषयीं एक ह्मण आहे—" कांदा आणि मर्दाचा बांधा" सर्व प्रकारच्या भाज्यांत कांदा घातला असतां त्यांस स्वाद आणतो.**

**पांढरा कांदा**—बलकर, तिखट, वृष्य, गुरु, मधुर, रुचिकर, स्निग्ध, कफकर, धातुवर्धक, निद्राप्रद, दीपक असा आहे; व क्षय, हृद्रोग, वांति, अरुचि, रक्तपित्त, वात, पित्त, कफार्श, वातार्श, घाम, सूज व रक्तदोष यांचा नाश करितो. **हिरवा कांदा** ( हरितपलांडु )—याचे गुण पांढऱ्या कांद्याप्रमाणेंच आहेत. **तांबडा कांदा**—तांबडा कांदा शीतळ, वृष्य, स्निग्ध, अग्निदीपक, गुरु, तिखट, मधुर, किंचित् उष्ण, पित्तकर, वृष्य, बलकारक आहे व कफ, वायु, सूज, अर्श, कृमि यांचा नाश करितो. **कांद्याचें बीज**—वृष्य आहे व दांतांतील कृमि व प्रमेह यांचा नाश करितें. ( १ ) **मुलांच्या आंकडीरोगावर**—पांढरा कांदा फोडून हुंगावयास द्यावा. ( २ ) **उन्माद रोगावर**—पांढऱ्या कांद्याच्या रसाचें अंजन करावें. ( ३ ) **उन्हानें कपाळ उठलें तर त्यावर**—कांदा फोडून हुंगावा व कपाळावर चंदनाच्या गंधांत कापूर उगाळून त्यांचा लेप करावा. ( ४ ) **नाकांतून रक्त पडतें त्यास**—कांद्याच्या रसाचें नस्य द्यावें. ( ५ ) **महामारीवर**—दोन दोन तासांनीं कांद्याचा रस पाजावा. ( ६ ) **पटकीचा** उपद्रव न बाधण्यास—रात्रौ भोजनोत्तर कांद्याच्या रसांत चण्याबरोबर हिंग उगाळून, त्यांत बडीशोप १ मासा व धणे १ मासा टाकून तें घ्यावें. ( ७ ) **मुलांस मोडोशी व जंत झाल्यास**—कांद्याचा रस पाजावा. ( ८ ) **विंचवाच्या दंशावर**—कांद्याचीं दोन शकलें करून चोळावीं, ( ९ ) **उन्हाची झळ न लागण्यास**—एक कांदा जवळ बाळगावा ह्मणजे झळ लागत नाहीं. ( १० ) **तंबाखू लागली तर**—कांद्याचा रस द्यावा. ( ११ ) **उष्णतेवर**—भाजलेला पांढरा कांदा, जिरें व खडीसाखर एकत्र वाटून त्यांत गाईचें तूप दोन तोळे घालून द्यावें. (१२) **आलमापित्तानें** घशाजवळ जळल्यास-पांढरा कांदा बारीक चिरून सुमारें नवटांक अदमुऱ्या गोड दह्यांत कालवावा व त्यांत पिठीसाखर घालून द्यावा. ( १३. ) **वीर्यवृद्धीवर**—कांद्याचा रस व मध एकत्र करून घ्यावा. ( १४. ) **गांधील माशीच्या दंशावर**—कांद्याचा रस लावावा. ( १५. ) **मूल लवकर वाढण्यास**—कांदा आणि गूळ खात गेलें असतां मूल लवकर वाढतें.

( १६. ) **आंवरक्तास**—कांदा बारीक चिरून चार पांच वेळ धुवून टाकावा आणि तो गट्टेदार दह्यांबरोबर खाण्यास द्यावा. ( १७. ) **अतिसारावर**—कांद्याच्या रसांत अफू मिळवून द्यावी. ( १८. ) **उन्हाळ्यांस**—कांदा चिरून धुवून दह्यांबरोबर खावा व त्याचाच काप अथवा कांदा भाजून बारीक वाटून त्यांत तूप घालून गोळा करून बेंबीवर बांधावा. नुसता कांदा खाल्ल्यानेंही उन्हाळे राहतात. ( १९. ) **डोळे खरूं लागल्यास** कांद्याच्या रसांत खडीसाखर उगाळून रात्रीस डोळ्यांत घालावी व रक्तचंदन उगाळून डोळयांवर लावावें. ( २०. ) **पुरुषत्व गेलें असल्यास**—पांढऱ्या कांद्याचा रस, मध, आल्याचा रस व तूप एकत्र करून प्रातःकाळीं द्यावें, २१ दिवसांत पुरुषत्व येईल. ( २१. ) **जखमेस संताप** होईल तर--कांदा चिरून तुपांत तळून ऊन्हऊन्ह वर बांधावा. ( २२. ) **वीर्यवृद्धि होण्यास व उरःक्षतक्षयावर**--कांद्याचा रस ६ मासे, तूप ३ मासे व मध ३ मासे एकत्र करून दररोज दोन्ही सांज घेत जावें व रात्रीं अर्धा शेर तापलेलें दूध साखर टाकून पीत जावें. याप्रमाणें महिना दोन महिने द्यावें. ( २३. ) **अपस्मारावर**—पांढऱ्या कांद्याचा रस नाकांत पिळावा. ( २४. ) **कामीणरोगावर**—पांढरा कांदा, गूळ व त्यांत थोडी हळद घालून सकाळीं अथवा निजावयाचे वेळीं खावा. ( २५. ) **पड्स्यावर**—पांढरा कांदा कापून दोन्ही नाकपुड्यांनीं सडकून हुंगावा. ( २६. ) मुलांस **तानेचा** आजार होतो त्यास—पांढरा कांदा भाजून बारीक वाटावा. त्यांत गाईचें तूप घालून वडी करून टाळूवर बसवून वर एरंडाचें ओलें पान बसवून फडक्याचें वेष्टन द्यावें. याप्रमाणें ३ दिवस करावें. प्रतिदिवशीं सायंकाळीं कांद्याची वडी काढून टाकून डोकें स्वच्छ धुवावें व गाईचें तूप टाळूवर घालावें. आणि पांढऱ्या कांद्याचा रस काढून त्यांत थोडें जिरें व खडीसाखरेची पूड घालून तो पोटांत द्यावा. (२७.) **उन्हाची झळ लागते त्यावर**—पांढरा कांदा एक भाजून घ्यावा व दुसरा हिरवा घेऊन दोन्ही बारीक वाटून त्यांत जिऱ्याची पूड दोन मासे व खडीसाखर दोन तोळे याप्रमाणे मिश्र करून एक वेळ द्यावें. ( २८. ) **वळ, बद, गांठी, वगैरे पिकण्यास**—कांदा भाजून कुटावा आणि त्यांत तूप व हळदीची पूड घालून पुनः गरम करून सोसवेल तितकें गरम पोटीस बांधावें. हें सौम्य व उत्तम पोटीस आहे. ( २९. ) **डोळे येतात त्यास**—कांद्याचा रस डोळ्यांत घालावा. ( ३०. ) **गुरांस शेंबारोग** ( गुरांच्या नाकांतून श्लेष्म पडूं लागतो तो ) होतो त्यावर—पांढरे कांदे सात व गूळ पावशेर याप्रमाणें प्रत्यहीं प्रातःकाळीं तीन दिवस खाऊं घालावें; व फार दिवसांचा जुना सरक्या काढलेला कापूस घेऊन स्वच्छ मोकळा करून, एका अग्रास अग्नि लावावा व त्यांतून निघणारा धूर त्या गुराच्या श्वासोच्छ्वासानें मस्तकांत जाऊं शकेल अशा बेतानें ती धुमती वात गुराच्या नाकापुढें धरावी. याप्रमाणें तीन दिवस करावें. ( ३१. ) **मुळव्याधीवर**—कांदे बारीक चिरून सावलींत वाळवावे. नतंर

त्यांतील सुमारें १ तोळा सुकलेला कांदा तुपांत तळावा. मग त्यांत तिळांची पूड १ मासा व पिठीसाखर २ तोळे मिश्र करून नित्य सेवन करावें. ( ३२. ) **पित्तविकारावर**--पांढरा कांदा बारीक चिरून गोड दह्यांत मिश्र करून त्यांत थोडी साखर घालून खावा. ( ३३.) **दाढ दुखते त्यास**--कांद्याचें बीं चिलमेत घालून ओढावें. अ० नुसतेंच दाढेंत धरावें. (३४.) **मुळव्याधीवर**--कांद्याचा रस साखर व तूप घालून द्यावा.

## ४८. कापशी. ( गु. हिं. कपास. सं. कार्पासी. )

**कापशींत दोन प्रकार आहेत. देवकापशी व रानकापशी. बागांत किंवा घरीं लाविलेली तीस देवकापशी ह्मणतात. हें झाड कित्येक वर्षें पर्यंत वांचतें. शेतांत लावलेली तीस रानकापशी ह्मणतात. रानकापशीचें झाड वर्षायु असतें. रानकापशीचीं झाडें दोन तिन हात उंच वाढतात. देवकापशीचीं झाडें सुमारें पुरुष दीड पुरुष उंच वाढतात. देवकापशींतही दोन तीन प्रकार आहेत. एकींचें बीं रानकापशीप्रमाणेंच असतें. दुसरीचें बीं लांबट असून काळसर रंगाचें असतें. कापशीच्या झाडापासून कापूस उत्पन्न होतो. कापसाचा उपयोग सर्व जगास आहे. कापसाचीं वस्त्रें होऊन आपल्या शरीराचें संरक्षण होतें. आपल्या हिंदुस्थानदेशांत कापूस अतिशय पिकत असून वस्त्रांकरितां आपणास परकीयांच्या हाताकडे पहावें लागत आहे ही केवढी खेदाची गोष्ट आहे ? कापशीच्या बियाचें ( सरक्यांचें ) तेल काढतात.**

**कापशी**--मधुर, शीतळ, स्तन्यवर्धक, किंचित् उष्ण, बलकर, तुरट, लघु अशी आहे व कफ, पित्त, तृषा, दाह, भ्रम, श्रम, वांति, मूर्च्छा यांचा नाश करिते. **कापशीचें बोंड**--मूत्रवर्धक व वायु, रक्तविकार, कानांतलि फोड, कर्णनाद व पूतिकर्म यांचा नाश करितें. **सरक्या**--स्तन्यवर्धक, गुरु, वृष्य, कफकर व स्निग्ध आहेत. **कापूस**--किंचित् उष्ण, वातनाशक,लघु, मधुर असा आहे. ( १, ) **धुपणीवर**--कापशीच्या पाल्याचा रस द्यावा; अ० कापशीचें मूळ तांदुळांचें धुणांत उगाळून दोन्ही वेळ द्यावें. ( २. ) **मोडशीवर**--देवकापशीचीं कोवळीं बोंडें खावी; ह्मणजे दोन तीन दिवसांत मोडशी ताप हीं दूर होतात. ( ३. ) **सर्पदंशावर**--देवकापशीच्या पानांचा रस काढून तो सुमारें ४ । ५ तोळे द्यावा व दंशावरही चोळावा, किंवा पिचकारीनें आंत घालवेल तर घालावा. ( ४. ) **गंडमाळा व अपची** ( गंडमालेचा भेद ) **रोगावर**--रानकापशीच्या मुळांचें चूर्ण तांदुळांच्या पिठांत कालवून त्याची भाकर करून रोगाचा नाश होई तोंपावेतों खावी. ( ५.) **स्तनांत दूध येण्यास**--रानकापशीचें मूळ, व उंसाचें मूळ एकत्र कांजींत वाटून द्यावें. ( ६. ) **स्तनरोगा**

**वर**—रानकापशीचें मूळ, दुध्याभोपळा, गव्हांचे कांजींत वाटून लेप करावा. ( ७. ) **इंगळीच्या दंशावर**—कापशीचा पाला, बचनाग व मोहऱ्या यांचा वाटून लेप करावा; अथवा देवकापशीचें मूळ, मनुष्याच्या मूत्रांत उगाळून दंशस्थानीं लेप करा-वा; किंवा कापशीचें लांकूड उगाळून लेप करावा. ( ८. ) **ज्वरानें अंगावर कडू उठल्यास**—देवकापशीचे पाल्याचे रसांत कडू कारेळे वाटून अंगास लेप देऊन मर्दन करावें व नंतर चार घटकांनीं स्नान करावें. ( ९. ) **जखम भरण्यास**—पाचे-च्या पाल्याचा अंगरस काढून त्यांत देवकापशीची मुळी उगाळून लावावीं. अथवा देवकापशीच्या तुंवऱ्या व पाचेचीं पानें बारीक वाटून वडी करून जखमेवर बसवावीं, यानें त्वरित जखम भरते. ( १०. ) **विंचवाच्या दंशावर**—कापशीचा पाला व मोहऱ्या एकत्र वाटून लेप द्यावा. किंवा कापशीचें मूळ रविवारीं काढून ठेवावें, तें चावून खाल्लें असतां विष उतरतें. ( ११. ) **अफूवर उतार**—कापशीच्या बियांचें चूर्ण व तुरटीचें चूर्ण एकत्र करून भक्षावें. ( १२. ) **लघवींत धातु ( खर ) पडते त्यास**—देवकापशीचीं दोन तीन पानें व खडीसाखर असें एकत्र करून प्रातःकाळीं खावें. ( १३. ) **नाकातोंडातून रक्त पडतें त्यास**—जुन्या कापसाची धुरी नाकांत द्यावी. नंतर २ तोळे कापशीचे पाण्याचे रसांत १ तोळा खडीसाखर घालून तो रस पोटांत घ्यावा.(१४.)**अफूवर**—देवकापशीच्या पाल्याचा रस द्यावा.(१५) **स्त्रियांच्या नष्टपुष्पांवर व विटाळ योग्य वेळीं व बरोबर रीतीनें होत नसल्यास**—सरक्यांच्या तेलांत वेलदोडे, जिरें, हळद, सैंधव हीं एकेक मासा घेऊन बारीक वस्त्रामध्यें बांधून त्याची पुरचुंडी चौथ्यादिवसापासून योनींत ठेवावी. ( १६ ) **कामीण रोगावर**—देवकापशीच्या बोंडांचा रस नाकांत घालावा.(१७) **धोत्र्याचे विषावर**—कापशीच्या बिया व फुलें यांचा काढा द्यावा. ( १८. ) **बालकाच्या आतिसारावर**—देवकापशीचीं ओलीं बोंडें फुंफाट्यांत घालून त्यांस वाफ देऊन त्यांचा रस काढावा व तो मुलांस पाजावा. अथवा मुलाच्या आईनें तीं बोंडें चावून रस मुलांच्या तोंडांत घालावा. ( १९. ) **मगज शांत होण्यास व मस्तकशूळावर**—कापशीच्या बियांचें तेल माथ्यावर चोळावें. दिवस ३ अगर ७. ( २०. ) **मुळव्याधीवर**—देवकापशीचे पाल्याचा रस गाईचे दुधांतून तीन तोळेपर्यंत द्यावा. ( २१. ) **आगंतुक ज्वरावर**—देवकापशीचा पाला गाईचे दुधां-त वाटून ऊन्ह करून अंगास लेप द्यावा.

## ४९. कापुरवेल.

**कापुरवेल या झाडास वेलही संज्ञा आहे, परंतु याचें झाड असतें. हें झाड तीन हात उंच वाढतें. याचें पान लांबट व चिंचोळें असतें.**

हें अवळ घेऊन पाहिलें असतां फार चमत्कारिक असतें. हें दिसण्यांत फार खरखरीत दिसतें, परंतु हातास मऊ लागतें. यास बहुतेक कापराप्रमाणें वास येतो, ह्मणून त्यास कापुरवेल असें नांव पडलें आहे. यासच कोणी कापुरचिनई असें ह्मणतात. या झाडास कांहीं पांढऱ्या रंगाचे तुरे येतात. त्यांसही पानांप्रमाणेंच कांहींसा कापराचा वास येतो. हेच या झाडाचीं फुलें होत. हे तुरे अथवा याचीं पानें इतर फुलांच्या गुच्छांत घातलीं असतां त्यांत तऱ्हेतऱ्हेचे वास येतात.

( १ ) **पोटदुखीवर**—कापुरवेलाच्या पानांचा रस काढून द्यावा.

## ५०. कापूर. ( गु. कपुर. सं. कर्पूर वृक्ष. )

कापुराचे वृक्ष चीन देशांत व या देशांतही कोठें कोठें आहेत. कापूर दहा पांच प्रकारच्या झाडांपासून निघतो. हिंदुस्थानांत केळीच्या जातीचें एक झाड आहे त्यापासुन कापूर काढतात. त्या झाडास कापुरकेळ असें ह्मणतात, कापूर करण्याची कृति निरनिराळ्या देशांत निरनिराळी आहे. कापुरांत तीन प्रकार आहेत. भीमसेनी ( बरासकापूर ) पत्रीकापूर व चिनईकापूर. कापूर वस्त्रांत व पुस्तकांत ठेवला असतां त्यांस कसर लागत नाहीं. कापूर उघडा ठेवला असतां उडून जातो, सबब डब्यांत भरून ठेवला पाहिजे. कापूर सर्व ज्वरांवर चालतो असें एका इंग्रेजी वैद्याचें मत आहे. कापुराच्या पाण्यांत झाडाचें बीं भिजवून ठेवलें असतां कितीही दिवसांनीं बाहेर काढलें तरी तें जमिनींत घातल्याबरोबर उगवतें.

**कापूर साधारण**—मधुर, कडू, शीतळ, सुगंध, लघु, नेत्र्य, लेखन, वृष्य, तिखट, प्रीतिकारक, मृदु, मदकर, असा आहे व कफ,दाह, तृषा, रक्तपित्त, कंठरोग, नेत्ररोग, विष, पित्त, तोंडाची विरसता, दुर्गंध, उदर, मूत्रकृच्छ्र, प्रमेह व मलाचा गंध यांचा नाश करितो. हा ताजा असतां स्निग्ध, कडू, उष्ण, दाहकर आहे, व जुना झाला असतां दाह, शोष यांचा नाश करितो. तोच स्वच्छ केला असतां गुणांनीं अधिक होतो.

**भीमसेनी कापूर**—गोड, शीतळ, वृष्य, कडू, तिखट आहे व तृषा, दाह, रक्तपित्त, कफ यांचा नाश करितो. ( १. ) **विंचवाच्या विषावर**—विड्यांत चिंचोक्या इतका कापूर घालून खावा. ( २. ) **जनावरांच्या क्षतांत किडे पडतात त्यास**—क्षतांत कापूर भरावा. ( ३. ) **इसबरोगावर**—कापूर तोळा १ पांढरा काथ १ तोळा व शेंदूर अर्धा तोळा एकत्र खलून काशाच्या ताटांत घालून त्यांत तूप दहा तोळे घालावें. त्यास हातानें मर्दन करून, १२१ वेळां पाण्यानें धुवावें.

हा मलम जखम, गर्मीचे चट्टे, खवडे, कानकुरकुटी जळालेल्या ठिकाणीं सडलेले व मासलेले जखमेस उपयोगी आहे व हा इसबास बरा करितो. ( ४. ) बचनागाच्या विषावर—कापूर पाण्यांत कालवून द्यावा. ( ५. ) पापणी झडली असल्यास तीवर—कापूर निंबाच्या रसांत खलून लावावा. ( ६. ) गर्मीच्या चट्टयांवर—कापूर आळून राहिलेला शेष तुपांत खलून लावावा. ( ७. ) मेहरीवर—कापुराचें तेल मेहरी आलेजागीं लावावें. ( ८. ) जंतांवर—मुलांस किंचित् कापुर गुळांत घालून द्यावा., ( ९. ) दांत दुखतात त्यास व दांतांची कीड दूर होण्यास—कापूर दाढेखालीं धरावा. ( १०. ) डोळ्यांत फूल पडल्यास—कापूर वडाच्या चिकांत वाटून अंजन करावें ह्मणजे दोन महिन्यांचें जरी फूल असलें तरी त्याचा नाश होतो. ( ११. ) मूत्राघातावर—कापुराच्या चूर्णाची फडक्यांत वात करून हळूहळू शिश्नद्वारांत चालवावी आणि ठेवावी ह्मणजे मूत्राघाताचा नाश होतो. ( १२.) दुखावलेल्या भागाच्या वेदना शमन होण्यास कापुराचें तेल—कापूर खलांत घालून बारीक होईपर्यंत घोटावा व त्यांत चौपट तेल घालून पुन: घोटावा. ह्मणजे सर्व कापूर विरघळतो. हें तयार झालेंलें तेल थोडावेळ चोळून लावावें. ( १३. ) नारूवर—कापूर तुपांतून खावयास द्यावा.

## ५१. कापूरभेंडी.

कापूरभेंडीचीं झाडें डोंगराळ प्रदेशांत होतात. ह्या झाडाची उंची सुमारें पुरुष दोन पुरुष असते. कापूरभेंडीचीं पानें देवकापशीच्या पानासारखीं असतात. हिचीं फुलें पांढऱ्या रंगाचीं असतात. कापूरभेंडीचीं झाडें बहुतकरून डोंगराच्या कड्यांवर अवघड जागीं असतात कापूरभेंडीच्या मुळास उत्तम प्रकारचा सुवास असतो. कापूरभेंडी ही अनेक रोगांवर चालते.

( १. ) सर्पदंशावर—कापूरभेंडीचें मूळ उगाळून अजमासें ४ तोळे पोटांत द्यावें. ( २. ) आगंतुक जखमेवर—कापूरभेंडीचें मूळ उगाळून जखमेवर लावावें ह्मणजे जखमेचें शोधन होऊन जखम लवकर भरून येते. ( ३ ) भगंदरावर—कापूरभेंडीचें मूळ गंधाप्रमाणें उगाळून दिवसांतून चार पाच वेळां वर लावावें, व नित्य एक वेळ पोटांत द्यावें. ( ४. ) व्रणावर कापूरभेंडीचें मूळ थंड पाण्यांत उगाळून सहा मासेप्रमाणें दुवक्त पोटांत द्यावें; व मुळावरील सालीचें चूर्ण चिलमींत घालून ओढावें व मुळाचा व्रणावर लेप करावा. ( ५. ) रक्तपित्तीवर—कापूरभेंडीचें मूळ १ तोळा, थंड पाण्यात उगाळून नित्य दुवक्त पोटांत द्यावें. हें सहा महिने द्यावें. ( ६. ) गंडमाला व ग्रंथिरोग यांवर—कापूरभेंडीचें मूळ थंड पाण्यांत उगाळून नित्य लेप देत जावा.

## ५२- काफी. ( बुंद. )

अरबस्थान, हिंदुस्थान, हिंदुमहासागरांतील बेटें व वेस्टइंडिज बेटें एथें हीं झाडें फार होतात. हें झाड तीन चार हात उंच वाढतें अधिक वाढल्यास त्यास छाटून टाकतात. या झाडाचा रंग फार हिरवा असतो आणि फुलतें तेव्हां या झाडाचीं फुलें पांढऱ्या चमेलीसारखीं असतात. व त्यांस मधुर वास येतो; परंतु तीं फार वेळ टिकत नाहींत. फुलेंआल्यानंतर आठ महिन्यांनीं काफीचीं फळें पिकून तयार होतात. हीं फळें कांहींशीं लांबोडीं असतात व त्यांचा रंग, पिकलेपणीं तांबडा असतो. फळ पिकलें ह्मणजे बुंद काढून वाळवितात. एकेका फळांत बहुतकरून दोन दोन बुंद असतात आणि एकएका झाडावर सुमारें शेर अच्छेर बुंद उत्पन्न होतात. यांस कोणी काफी कोणी कावा असें ह्मणतात. आरब व मोगल या लोकांत काफी घेण्याची चाल फार आहे. काफी तयार करण्याची कृति अशी आहे कीं, ती पहिल्यानें तुपांत भाजून कुटतात, नंतर ती चहाप्रमाणें तयार करून तींत दूध व साखर घालून पितात. काफीचा गुण असा आहे, की ती घेतली असतां, अगातील सुस्ती व आळस जाऊन रक्तवृद्धि होते. जागरण झालें असतांही तिच्या योगाने अन्नपचन होऊन काहीं उपद्रव होत नाही. हिंदु लोकांत अलिकडे काफी घेण्याचा फार परिपाठ पडला आहे, परंतु चहा आणि काफी हीं उष्ण असल्यामुळें या उष्णहवेंत आपल्या लोकांस चहा काफी नित्य घेणें कधींही हितकर होणार नाहीं, याजकारितां गरज लागल्यास कधीं कधीं काफीचें सेवन करावें, नित्य सेवन करूं नये.

## ५३. कारली. ( गु. कारेली. हिं. करेली सं. कारवेल्ल. )

कारलीचा वेल असतो. यास जीं फळें येतात त्यांस कारलीं ह्मणतात कारलें फार कडू असतें. याची भाजी मोठ्या प्रीतीनें लोक खातात. कारलें साधारणपक्षीं वीतभर लांब असते. यांत पांढरें व हिरवें अशा दोन जाति आहेत. याची भाजी, कोशींबीर, तळलेली भाजी इ० करितात. कारल्यास 'कारेती' असेंही ह्मणतात.

**लघु कारलें**—अतिकडू, अग्निदीपक, लघु, उष्ण, शीत, भेदक, स्वादु, पथ्यकर आहे व अरुचि, कफ, वायु, रक्तदोष, ज्वर, कृमि, पित्त, पांडु, कुष्ट, यांचा नाश करितें. **थोर कारलें**--तिखट, कडू, अग्निदीपक, अवृष्य, भेदक, रुचिकर, खारट, लघु वातल, पित्तनाशक आहे, व रक्तरोग, पांडू अरुचि, कफ, श्वास, व्रण, कास, कृमि कोठरोग, कुष्ठ, ज्वर, प्रमेह, आध्मान, व कामला यांचा नाश करिते. ( १. ) नि

त्याचा विकार झाल्यास–कारलीच्या पाल्याचा रस द्यावा ह्मणजे वमन होऊन पित्त पडेल. वमन न झाल्यास एक किंवा दोन रेच होऊन पित्ताचा नाश होतो. उतार तूपभात. ( २. ) शीतपूर्वक कफपित्तज्वरावर—कारलीच्या पानांचा रस जिरें घालून द्यावा. ( ३. ) रातांधळ्यावर–कारलीच्या पानांच्या रसांत मिरीं उगाळून त्याचें सायंकाळीं अंजन करावें. ३ दिवसांत गुण येतो. ( ४. ) पारा अंगांत फुटला तर—कारलीची मुळी पाण्यांत उगाळून द्यावी. ( ५. ) मुलांस पोटांतलें येतें त्यावर—कारलीचे पानांचा रस पैसाभार काढून त्यांत हळद थोडीशी टाकून तो पाजावा, ह्मणजे उलटी व मलशुद्धि होऊन पोट साफ होईल. ( ६. ) विषूची ( मोडशी ) वर–कारलीचा रस तिळांचे तेलाबरोबर द्यावा. ( ७. ) रक्तार्शावर—कारलीच्या पानांचा रस अ० फळाचा रस लहान चमचाभर काढून साखरेशीं द्यावा. ( ८. ) मूत्राघातावर—कारलीच्या पाल्याचा रस नवटांक काढून त्यांत हिंग १ टांक घालून द्यावा. ( ९. ) मुलांच्या पोटांतील डबा वगैरेवर—कारलीचा पाला, अडुळशाचा पाला, पिकलेलीं बिब्याचीं पानें व जांभळीची साल यांचा एकत्र रस काढून त्यांत वेखंड उगाळून पोटांत द्यावें. दि० ७. पथ्य करावें. ( १०.) अंतांवर—कारलीच्या पानांचा अथवा फळाचा रस द्यावा.

## ५४. कारवी ( सं. करीर. )

हीं झाडें कोकणांत सर्वत्र प्रसिद्ध आहेत. कारवी पांच सहा हात उंच सरळ वाढते. हिचा उपयोग कूड व ओमणास होतो. कारवीच्या फुलांत मकरंद पुष्कळ असतो तो मधमाशा नेऊन त्यांचा मध करितात.

( १.. ) वाळंतरोगावर—कारवीचें बीं शेळीच्या मूत्रांतून ७ दिवस द्यावें.

## ५५. कारिंदा.

कारिंद्याचे वेल असतात. यास 'करांदा' असेंही ह्मणतात. कारिंद्याचीं पानें किंचित् वांटोळीं असून कोनाच्या पानापेक्षां दुपटीनें मोठीं असतात. याचा वेल माडाइतका उंच वाढतो. याची वाढ इतकी जलद आहे कीं, तो एका दिवसांत हात दीडहात वाढतो या वेलास दीड दीड वितीच्या अंतरानें गांठी असतात, तेथें पानें येतात. त्या गांठीवर कोंब येऊन त्याचे फांटे पसरतात; त्या गांठीच्या खालच्या बाजूनें आंग्या येऊन त्यांस लहान कारिंदे लागतात. ते वाढून सुमारें आंब्याएवढे मोठे होतात. वेल सुकली ह्मणजे ते काढून घेतात, व मूळ खणून जे जमिनींत लागलेले असतात तेहीं

कढून घेतात. कारिंद्यांत गोडा व कडवा असा दोन जाति आहेत. गोड्याची साल काळी असते. कडव्याची कोंवळेपणीं पांढरी असते. जून झाल्यावर यांत कांहीं फेर दिसत नाहीं. कडवे कारिंदे कोंकणांतील रानांत पावसाळ्यांत आपोआप उत्पन्न होतात. गोडे कारिंदे भाजून अथवा त्यांची उसळ करून खातात. हे निराहारास उपयोगीं पडतात. यांची खीर, कीस, कापट्या असे पदार्थ करितात. यांची रुचि चांगली असते. कडवे कारिंदे खाल्ले असतां त्यापासून घेरी, वांति असे उपद्रव होतात; तथापि गरीब लोक ते आणून खातात. त्यांपासून उपद्रव होऊं नये ह्मणून अशी कृती करावी लागते कीं, ते सोलून त्यांच्या पातळ कापट्या कराव्या, त्यांस राख चोळून त्या पाण्यांत उकडाव्या, मग त्या एकदां स्वच्छ पाण्यांत धुवून उन्हांत सुकवाव्या. नंतर तेलांत तळून खाव्या. या तळलेल्या कापट्या पांढर्‍या शुभ्र परीटघडीसारख्या दिसतात.

मुखपाकावर—कारिंद्याचा वाळलेला पाला व कोहळ्याची वाळलेली साल यांचें धूम्रपान करावें. (२.) मूळव्याधीवर—कारिंदा भाजून वरील साल काढून टाकून आंतील मगजांत खडीसाखरेची पूड, गाईचें तूप हे दोन्ही पदार्थ कारिंद्याच्या मगजाचे दुप्पट घालून तिन्हींही चांगलें मर्दन करून लहानशा आंब्याएवढी गोळी करून खावी. याप्रमाणें सतत गुण येईपर्यंत औषध द्यावें, ह्मणजे रोग नाहींसा होऊन धातुवृद्धि व शरीर पुष्ट होतें. (३.) उपदंशावर—कडू कारिंद्याचा जमिनींतील पांच वर्षांहून अधिक दिवसाचा कंद खणून काढून त्याजवरील पाळें व काळी साल सोलून टाकावी, नंतर तो कंद किसून सावलींत वाळवून चूर्ण करून ठेवावें. हें चूर्ण प्रतिदिवशीं प्रातःकाळीं व सायंकाळीं गाईचें निरसें दूध प्रावशेर घेऊन त्यांत चार मासे घालावें आणि जिर्‍याची पूड ४ गुंजा व खडीसाखरेची पूड दोन तोळे घालून द्यावें. (४.) पोटदुखी व अतिसार यांवर—वर सांगितलेले कडू कारिंद्याचें चूर्ण तुपांत कालवून गोळी करून द्यावें. (५.) रक्तातिसारावर—कडू कारिंदा भाजून सोलून बारीक वाटावा आणि त्यांत जिर्‍याची पूड, पिठीसाखर व तूप घालून द्यावें.

## ५६. कारिवणा. (सं. लघुब्राह्मी.)

हें झाड वेलीप्रमाणें वाढतें. हीं झाडें मळेजमिनींत बाराही महिने असतात. हीं बागांतून व घरींही कुंड्यांतून लावितात. कारिवण्याचीं पानें उंदराच्या कानाप्रमाणें असतात. हीं पानें दोन अंगुलें रुंदीचीं अ-

सतात. हीं झाडें कुंड्यांतून लावलीं असतां मुळांस फुटफुटून यांचा बराच विस्तार होतो. याच्या पानांची चटणीही करितात, ब्राह्मीप्रमाणेंच याचे गुण आहेत.

( १.) **भोंवळ येते त्यास**—कारिवण्याच्या पानांचा रस मस्तकास चोळावा. ( २.) **लहान मुलाचा शब्दोच्चार स्पष्ट होण्यास**—नित्य प्रातःकाळीं कारिवण्याचीं ओलीं पानें खावयास द्यावीं, ह्मणजे जिव्हेचें जडत्व कमी होऊन वर्णोच्चार स्पष्ट होऊं लागतो. ( ३. ) **पित्तापस्मारावर**—कारिवण्याच्या पाल्याचा रस व तूप एकत्र करून आटवून घृत सिद्ध करावें व तें सेवन करावें. ( ४.) **उष्णता व उन्हाळ्यावर**—कारिवण्याच्या पाल्याचा रस जिरें व खडीसाखर घालून द्यावा, व बेंबीवर कारिवण्याच्या रसांत फडकें भिजवून घडी घालावी. डोळ्यांत उष्णता असल्यास हा रस ताळवेवर चोळावा. ( ५. ) **उष्णतेनें मुलांच्या अंगावर गांठी येतात त्यावर**—कारिवण्याचा रस व कळंबाचे सालीचा रस काढून त्यांत गाईचें तूप व शंखजिरें घालून खल करून अंगास लावावें. ( ६. ) **सुजेवर**—कारिवण्याच्या पाल्याचा लेप करावा. ( ७. ) **मुलांच्या अतिसारावर**—कारिवण्याच्या पाल्याचा रस द्यावा. ( ८. ) **मुलांस तान्हेचा आजार झाल्यास**—कारिवण्याच्या पाल्याचा रस काढून त्यांत जिऱ्याची पूड व पिठिसाखर घालून द्यावा. ( ९. ) **उन्माद व चित्तभ्रम—अपस्मारावर**—कारिवण्याच्या पाल्याचा रस एक तोळा घेऊन त्यांत कोळिंजनाचें अ० अक्कलकाढ्याचें. चूर्ण ३ मासे व तितकाच मध घालून प्रत्यहीं दुवक्त देत जावें. ही वनस्पति या रोगावर मोठी प्रशस्त आहे, ( १० ) **देवीच्या आजारावर**—कारिवण्याचा रस अथवा चाकवताचा रस मधाशीं द्यावा. ( ११ ) **ब्राह्मीघृत**—ब्राह्मीचा रस ४ शेर, तूप ४ शेर वेखंड, कोष्ट, शंखपुष्पी या तिहींचें चूर्ण अर्धाशेर हीं एकत्र करून घृत सिद्ध करावें हें सेवन केल्यापासून उपदंशानें झालेले संधिवात, विस्फोटक, ग्रंथी इ०रोग; वातरक्त, उन्माद, अपस्मार, हे दूर होतात. सदर्हु रोगांवर या घृताचा वरही लेप करावा, तेणेंकरून कुष्ठ वगैरे रोगही दूर होतात, व मगज शांत होतो. ( १२. ) **स्वरभंगावर सारस्वतचूर्ण**—ब्राह्मी, वेखंड, हिरडे, अडुळसा व पिंपळी यांचें चूर्ण करून तें मधांत द्यावें.

## ५७. कारळें ( सं. कृष्णतिल. )

यास खुरासणी असेंही ह्मणतात. हें धान्य घाटावर फार पिकतें कारळ्याच्या रोपा सुमारें दीड दोन हात उंच वाढतो. यास पिवळ्या रंगाचीं फुलें येतात. ज्या वेळेस फुलें येतात त्या वेळीं, कारळ्याच्या

शेताची कुरून फार चमत्कारिक शोभा दिसते. कारळ्याचा रंग काळा असतो. याचें तेल काढतात. तें जाळावयास व खावयास उपयोगीं पडतें. याची पेंड गुरांस खावयास घालतात.

(१.) नेत्ररोगावर–कारळ्यांचें ताजें तेल प्रत्यहीं निजतेवेळीं डोळ्यांत घालावें.

### ५८. कावळी पांढरी. ( ते. हिंकबैआ., सं. काकमाची. )

कावळीच्या वेली असतात. या वेलींचीं पानें त्रिदळ असून त्यांस कात्रे असतात. वेलींचा रंग प्रथम तांबूस असून नंतर पांढरा होतो या वेली बहुतेक प्रांतांत कुंपणीवर असतात.

**कावळी**--रसकाळीं उष्ण, कडू, तिखट, रसायन, वृष्य, स्निग्ध, स्वर्य, हृद्य, धातुवर्धक, नेड्य, रुचिकर, सारक, लघु, अशी आहे; व कफ शूल, अर्श, सूज, त्रिदोष, कुष्ठ, कंडु, कर्णकीट, अतिसार, उचकी, वांति, दमा, खोकला, ज्वर, हृद्रोग व मेह यांचा नाश करिते. ( १. ) **सुखप्रसव होण्यास**–कावळीचें मूळ कमरेस बांधावें. (२.) **प्रदरावर**–कावळीचें मूळ तांदुळाच्या धुणांत उगाळून द्यावें. (३.) **आवाज सुटण्यास**—कावळी व पांढऱ्या गुंजेचा पाला, वेखंड, कोष्ट हीं समभाग घेऊन सुकवून चूर्ण करावें. या चूर्णांत थोडी पिंपळीची पूड घालून मधांत कालवून चिकण्या सुपारीएवढ्या गोळ्या कराव्या. ही गोळी तोंडात धरून द्रव गिळावा, याच्या योगानें आवाज बसलेला सुटतो. ( ४. ) **वांतीवर**—कावळीची मुळी व हिंग एकत्र करून द्यावें. **निद्रानाश दूर होण्यास**—कावळीचें मूळ सुतांत बांधून शेंडीस बांधावे, ह्मणजे निद्रा येते. (५,) **अम्लपित्तावर** कावळीच्या मुळांचा काढा अथवा स्वरस घेऊन, त्यात थोडासा हिंग भाजून घालून द्यावा. ( ६. ) **धातुस्थानच्या कडकीवर**—कावळीची मुळी थंड पाण्यांत किंवा गाईचे निरसे दुधांत उगाळून. त्यांत खडीसाखरेची पूड घालून शक्त्यनुरूप द्यावें. ,( ७ ) **भूतज्वरावर**—पुष्यार्कीं थोर श्वेतकावळीचें मूळ आणावें व तें लाल सुतानें बाहूला अथवा गळा, मस्तक याला बांधावे.

### ५९ कावळें.

गोमांतकाकडेस वईत पुरुष दीड पुरुष उंच असें एक झाड होतें. त्यास चिंचेसारखीं पानें असून हिरव्या वाटाण्याएवढीं जांभळ्या रंगाचीं वाटोळीं फळें येतात, तीं मुलें खातात.

### ६० कासविंदा. ( गु. कासुंदरो. हिं. कसौंदी' सं. कासमर्द. )

हीं झाडें कंबरेइतकीं वाढतात. तरोट्याच्या झाडाच्या पानाहून याचीं पानें बारीक असतात. यास पिंवळीं फुलें येतात व शेंगा दाभ

कासवाच्या आड कांबट येतात. हीं झाडें कुंपणाच्या कडेला पुष्कळ उगवतात.

**कासविंदा**—तिखट, कडू, मधुर, उष्ण. रुचिकर, पाचक, दीपक, कंठशुद्धिकर ग्राही, लघु, रूक्ष, असा आहे व कफ, अजीर्ण, वायु, कास, पित्त, विष, कृमि, विषूचि यांचा नाश करतो. याचें पान पाककाळीं तिखट, वृष्य, उष्ण, लघु आहे व तृषा, कोकला, अरुचि यांचा नाश करितें. याचें फूल, कास, श्वास, ऊर्ध्ववात यांचा नाश करितें. (१) **गजकर्णावर**—कासविंद्याची मुळी उगाळून लावावी; अ० पाल्याचा रस निंबाच्या रसांत घालून तो लावावा. (२.) **उचकी-श्वासावर** कासविंद्याच्या पानांचा काढा द्यावा. (३.) **सुजेवर**—कासविंद्याचा पाला शेळीच्या दुधांत वाटून सुजेवर लावावा. (४.) **पाऱ्यास उतारा**—कासविंद्याचे पाल्याचा रस काढून पाजावा. (५.) **शीघ्र प्रसूतीवर**—कासविंद्याच्या पाल्याचा रस पोटांत द्यावा. (६.) **गोमाशा वगैरे कानांत गेल्यास**—कासविंद्याचा रस कानांत पिळावा. (७.) **दद्रु, किटिभ व कुष्ठें यांवर**—कासविंद्याचीं मुळें कांजींत वाटून लेप करावा. (८.) **विब्बा उततो त्यास**—कासविंद्याचा पाला वाटून लावावा.

## ६१. कांसाळू. (सं. कासालु.)

**कांसाळू 'कांसाळवळ' असेही ह्मणतात. कांसाळूंत काळें व पांढरें अशा दोन जाती आहेत. कांसाळूचीं पानें व देंट्या हीं, अळवाचीं पानें व देंठ्या यांपेक्षां मोठीं असतात. कांसाळू हें गोड, पथ्यकारक, दीपक, रुचिप्रद आहे व कफ, वात यांचा नाश करितें.**

(१.) **काळपुळीस**—झाडावरील कांसाळूचा कांदा पाण्यांत उगाळून पुळीवर लेप करावा. पथ्य अळणी करावें. (२.) **गळ्यावायु ह्मणजे अंग आंखडतें त्यावर**—काळ्या कांसाळूचा कांदा व बेंदरीच्या वेलीचा कांदा हे दोन्हीं एकत्र किसून या किसाच्या चार पोटल्या बांधाव्या व तापलेल्या तव्यावर त्या पोटल्या ऊन करून सोसवेल तितका अंगास शेक द्यावा. (३.) **संधिवायूस**—काळ्या कांसाळूची देंटी मंदाग्नींत भाजून त्याचा रस ६ मासे गाईच्या दुधांत घालून ऊन करून द्यावा. दि० ७. यानें कफ व लाळ गळेल. उतार तूपभात. (४.) **बद त्वरित फुटण्यास**—रानकांसाळूचा कंद थंड पाण्यांत उगाळून त्याचा ठिपका द्यावा व तो सुकल्यावर पुन: त्याच जागीं त्याच औषधाचा ठिपका द्यावा. याप्रमाणें तीन चार वेळा ठिपके द्यावे ह्मणजे छिद्र होऊन दर्द निघेल. (५.) **उदररोगावर**—काळ्या कांसाळूचा कांदा १ तोळाप्रमाण किसून नारळाचे रसांत घालून थोडे तांदुळ घालून शिजवून खीर करावी. व गूळ घालून खावी. हें औषध रोग फुटून मलमार्गानें रेच होऊन पडतो एक किंवा दोन दिवस खावें. उतार, भाताचे पेजेंत तूप

घालून घावें. तोंडास खाज सुटल्यास अमसुलाच्या अथवा चिंचेच्या पाण्याच्या गुळ्या भरून टाकाव्या. ( ६. ) भ्रम व पित्तविकारावर—काळ्या कांसाळूच्या देठ्या कोंपाळ्यांत माजून रस काढावा व पांच शेरपर्यंत नारळाचा रस काढून त्यांत अच्छेरपर्यंत माल्कांगोणीच्या बिया वांटून कालवाव्या. आणि सर्व एकत्र करून मंदाग्निवर सर्व पाणी आटेपर्यंत कढवावें; म्हणजे वर तेल येतें तें काढून घ्यावें. हें तेल, आंख व मानेच्या शिरा इतक्या जागीं दिवसांतून दोन वेळां चोळून चोळून जिरवीत जावें. ( ७. ) पांडुरोगावर—समूळ कांसाळू घेऊन त्याचें ६ मासे चूर्ण करून दुधांतून घावें. ( ८. ) जलोदरावर—कांसाळूचा कांदा १ तोळा ताकाशीं वाटून घ्यावा.

( ९. ) पक्षजिभेस—कांसाळूच्या देठीची राख लावली म्हणजे पक्षजिभ बरी होईल. ( १०. ) अनंतवात—शिरोरोगावर—काळ्या कांसाळूचा कांदा किसून त्याच्या पोटल्या कराव्या, व तव्यावर गरम करून मस्तकास शेक द्यावा. मंतर कांहीं वेळां तोच कीस गरम करून त्याचा मस्तकावर पेंड बांधावा. ( ११. ) सर्व वातविकारांवर—कांसाळूचा कांदा १ तोळा किसून रस काढून नारळाचा रस व दूध यांत खीर करून खावी; म्हणजे सर्व वात व उदरें नाश पावतात. ( १२. ) अंतांवर—कांसाळूच्या कांद्याची २१४ गुंजा राख मधांत ४० मात्रांत द्यावी.

## ६२. काळी खजूर.

हा एक कडू निंबाच्या जातीचा वृक्ष आहे, याचे वृक्ष सह्याद्रिपर्वतावर आहेत. याचीं पानें एक फूट लांबीचीं. दुभागलेलीं असतात. याचीं फुलें सफेत रंगाचीं असून उग्रगंधि असतात. काळी खजूर हें फळ खजूरीच्या आकाराचें असून फार कडू आहे.

( १. ) पित्त पाडण्यास—काळी खजूर उगाळून चाटण द्यावें. ( २. ) ज्वराच्या योगानें जीभ चरचरीत झाल्यास व मुखपाकावर—काळी खजूर उगाळून लावावी. ( ३. ) गोम चावल्यास—काळी खजूर तेलांत उगाळून लेप द्यावा. ( पोटशूळावर)—काळी खजूर उगाळून द्यावी.

## ६३. काळी बेल.

काळी बेल बहुत करून कुंपणीवर असते. हिच्या पानांचा आकार कांहींसा एरंडाच्या पानांसारखा असतो हीं पानें एरंडाच्या पानांहून लांबट असतात

( १. )कर्णमूल, खवडे, स्तनरोग व रक्तबाऊ किंवा धावन्यावर—काळ्या वेलीची मुळी थंड पाण्यात गाळून लेप द्यावा. ( २. ) फुरशाच्या विषावर—काळ्या वेलीचीं कोंवळीं पानें व तांबड्या कुंभाची साल यांचा रस शक्तीप्र

माणें द्यावा. हें औषध तीन दिवस प्रत्यहीं दोन वेळाप्रमाणें द्यावें उतार, काळ्या तुळशीचा अगर तांबड्या अगस्त्याचा रस द्यावा. विषानें सूज असल्यास त्यावर काळ्या वेलीचा कांदा ठेंचून बांधावा. (३.) उवा मरण्यास—काळ्या वेलीच्या पानांच्या रसांत कापूर घालून खल करून त्यांत पाणी घालून तें घेंादून तें मिश्रण रात्रीं निजतेवेळीं केसांस लावावें. वर काळया वेलाचीं पानें बांधावीं व वरून चौघडीवस्त्राचें वेष्टन द्यावें; म्हणजे दुसरे दिवशीं सकाळीं सर्व उवा मरतात.

## ६४. किंजळ.

**किंजळीचा वृक्ष मोठा होतो. याचीं पानें लांबट असतात. किंजळीचें लांकूड इमारतीकामास चांगलें उपयोगीं पडतें. जादूटोणा वगैरे चालूं नये म्हणून किंजळीच्या झाडाची काठी कोणी कोणी जवळ बाळगितात. हीस किंदळ असेंही म्हणतात.**

(१) **अफूवर**—किंजळीच्या पानाचा रस द्यावा. (२.) **पटकीवर**—किंजळीच्या पानांचा रस अजमासें पावशेरपर्यंत द्यावा. (३.) **कर्णमूळास**—किंजळीच्या पाल्याच्या रसांत म्हशीचें तूप घालून व त्यांत शेंदेलोण उगाळून प्रतिदिवशीं चार पांच वेळ कानांत घालावें. (४) **कर्णस्रावावर**—किंजळीच्या कोंवळ्या तुंवऱ्याचा व सालीचा रस एकत्र करून घालावा. (५.) **विसर्प व विस्फोट रोगावर**—किंजळीचे सालीचा रस काढून त्यांत कोंवळ्या दुर्वा आणि तांदूळ वाटून त्याचा लेप करावा.

## ६५. किन्हई. ( सं. कटभी. )

**हें झाड मोठें होतें. याचीं पानें टाकळ्याच्या पानांसारखीं असतात या झाडास चापट शेंगा येतात. झाडाचा वर्ण कांहींसा पांडुरका असतो.**

**मोठी श्वेतकिन्हई**—तिखट, उष्ण, तुरट, कडू अशी आहे व नाडीव्रण, रक्तदोष, प्रमेह, विष, कृमि, श्वेतकुष्ठ, कफ, त्रिदोष, व्रण, शिरोरोग, व अजीर्ण यांचा नाश करिते. हिचें फल धातु व कफ यांना वाढविणारें आहे. हिचा चीक गुरु, वृष्य, बल्य व वातनाशक आहे. **लघुश्वेतकिन्हई**—उष्ण, तिखट आहे व कुष्ठ, कफ, रक्तदोष, मेदोरोग, नाडीव्रण, विष, मेह व कृमि याचा नाश करिते. **काळीकिन्हई**—उष्ण व तिखट आहे. व गुल्म, आध्मानशूल यांचा नाश करिते. वरकड गुण पांढरीसारखे आहेत. ( १. ) **कंडू गजकर्ण** यांवर—**किन्हईचा** पाला वाटून लावावा.

## ६६. किरमाणी ओंवा. ( सं. चौरः )

**यास 'चोरओंवा असेंही म्हणतात. हा पर्शियां देशांत पिकतो. हें**

बीज अफगाणिस्तान व पर्शिया येथून हिंदुस्थानांत येतें. हें कडवट असतें. या ओंव्यांतून एक सत्व शोधून काढलें आहे; त्यास 'सँटोनाइन' असें इंग्रजी भाषेंत नांव आहे. हें एका रशियन वैद्यानें सन १८३० सालीं शोधून काढलें. हें सत्व १।२।३ गुंजापर्यंत कृमींवर सा खरेशीं रात्रीं देतात व सकाळीं सुंठीचा काढा अ० एरंडेल घ्यावयास सांगतात. सुंठीचा काढा घेतला नाहीं तर या औषधाचा प्रभाव कांहींच नजरेस येत नाहीं; यावरून हें औषध लंगडें असावें असें वाटतें. कारण, सुंठ ही यष्टी नसली कीं हें औषध लंगड्यासारखें होतें. सांप्रत या औषधाचें हिंदुस्थानांत फारच प्रस्थ वाढलें आहे. परंतु याच्या तोंडांत मारणारीं इकडे पुष्कळ औषधें आहेत असें शोधांतीं समजून येणारें आहे. आपल्या इकडे या जातीचें झाड —ज्यास साष्टी प्रांतात 'मारबेटी' अ०सुरबंद ह्मणतात तें आहे. त्याचें वर्णन पुढें केलेलें आहे.

**किरमाणी ओंवा**—कडू, उष्ण, तिखट, तीक्ष्ण, अग्निदीपक, वृष्य, लघु आहे; व त्रिदोष, अजीर्ण, कृमि. शूल, आम, यांचा नाश करितो. बाकी गुण ओंव्याप्रमाणें आहेत. ( १ ) **कृमिरोगावर**—किरमाणी ओंवा प्रातःकाळीं शिळ्यापाण्यांत घ्यावा; अ०विड्यांतून खावा, ह्मणजे कृमिरोग ( जंतविकार ) दूर होतो.

### ६७. किराईत. ( गु. करियातुं. हिं. किराइत. )
### ( सं किराततिक्त, भूनिंब. )

यांत दोन जाति आहेत. एक काडेकिराईत व दुसरी पालेकिराईत. किराइताचीं झाडें लहान—हात दीडहात उंच असून, याचीं पानें लहानसर लांबट असतात. पालेकिराईत हें या देशांतील बागांतून होतें. काडेकिराईत हें नेपाळाकडून कलकत्याच्या मार्गानें मुंबईस येतें. हें फार कडू आहे. यास 'चिराईत' असेंही ह्मणतात.

**किराईत**—वातल, कडू, व्रणरोपक, सारक, शीत, पथ्यकर, लघु, रूक्ष व तृषा, कफ, पित्त, ज्वर, कुष्ट, कंडू, सूज, कृमि, सन्निपातज्वर, दाह, शूल, मेह, व्रण, श्वास, कास, प्रदर, शोष, अर्श व अरुचि यांचा नाश करितें. **नेपाल किराईत**—किंचित् उष्ण, योगवाहक, लघु, कडू; व पित्त, कफ, शोथ, रक्तरोग, तृषा, ज्वर, यांचा नाश करितें. वरकड गुण किराईतासारखे आहेत. ( १. ) **आमवात जीर्णज्वर** व सर्व प्रकारचे **गर्मीच्या** रोगांवर—रात्रीं तीन मासे चिराइतांत दोन तोळे पाणी घालून भिजत ठेवावें. सकाळीं वस्त्रगाळ करून त्यांत दोन गुंजा कापूर

दोन गुंजा शिलाजित व अर्धतोळा मध याप्रमाणें दररोज सेवन केल्यानें सात दिवसांत गुण आल्यावांचून राहत नाहीं, व सर्व रोगमुक्त होऊन चांगली शक्ति येते, हें अनुभविक आहे. ( २. ) **साधारण सर्व ज्वरांवर**—किराईत, सुंठ, डिकेमाळी, यांचा अष्टमांश काढा करून ठेवावा, व नित्य सकाळीं, तिसरेप्रहरीं व सायंकाळीं याप्रमाणें तीन वेळ घ्यावा. ( ३. ) **नळविकार व पोटदुखीवर**—किराईताचा ओला पाला बारीक वाटून त्याचा रस काढावा. त्यांत मिरपूड व सैंधव अथवा पादेलोण किंवा वडागरी मीठ व किंचित् हिंग घालून द्यावा. यानें अजीर्णही दूर होतें. ( ४. ) **कापऱ्यावर** ( एखाद्यास दिवसांतून दहापांच वेळ अंगांतून स्वभावतः शिरशिरी येते; याचें कारण—अस्थिगत जीर्णज्वर आहे. )—काडेकिराईत, सुंठ, कुटकी, खारीक, कुड्याचे पाळावरील साल, यांचा काढा करून त्यांत मध घालून द्यावा. ( ५ ) **आम्लपित्तावर**—किराईत व माका यांचा काढा करून त्यांत मध घालून द्यावा. ( ६ ) **हरताळाचे विषावर**—किराइताचा काढा द्यावा.

### ६८. कुटकी. ( सं. कटुकी. गु. कडु. हिं. कटुकी. )

**कुटकीची उत्पत्ति हिमालय पर्वताच्या उतरणीवरील कमाउन प्रांतांत विशेष होते. तिकडून या वनस्पतीच्या मुळें तुकडे येतात. कुटकीस " बाळकडू " असेंही ह्मणतात. कुटकी ही अतिशय कडू आहे.**

**कुटकी**—शीतळ, तिखट, कडू, अग्निदीपक, भेदक, सारक, रूक्ष, लघु आहे व रक्तरोग, शीत, पित्त, दमा, कफ, दाह, अरुचि, ज्वर, मेह, कुष्ठ, विषमज्वर, खोकला, क्षय, कावीळ, विष, हृद्रोग, यांचा नाश करिते. ( १. ) **कामिणरोगावर**—कुटकीचा काढा करून त्यांत मध घालून द्यावा; अथवा कुटकीचें चूर्ण साखरेंतून द्यावें. ( २. ) **एकाहिक विषमज्वरावर** कुटकीचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे तो, खोकला व दमा यांणीं युक्त एकाहिक ज्वराचा नाश करितो. ( ३. ) **उचकी व वांति** यांवर—कुटकीचें चूर्ण मधाशीं द्यावें. ( ४. ) **कफपित्तज्वरावर**—कुटकीचें चूर्ण साखर मिळवून उष्णोदकाशीं द्यावें.

### ६९. कुडा. ( सं. कुटज. गु. इंद्रजवनं झाड. )
### ( हिं. कोरैआ. )

**हीं वनझाडें आहेत. हें झाड सहा सात हातांपेक्षां उंच होत नाहीं. याचीं पानें बदामाच्या पानासारखीं लांबोडीं असतात. कोंकणांत या पानांचा फार खप होतो. याच्या फुलांची भाजी होते. याच्या शेंगा बारीक व लांब असतात; या भाजी व लोणच्यास उपयोगीं पडतात. शेंगांतून जवाच्या आकृतीच्या लांबट बिया निघतात, त्यांस इंद्रजव**

ह्मणतात. त्या बिया कडू असतात. याचें मूळही कडू असतें. मुळांचा पाक होतो, त्यास कुडेपाक ह्मणतात. कुड्यांत पांढरा व काळा अशा दोन जाति आहेत.

**पांढरा कुडा**—कडू, तिखट; उष्ण, अग्निदीपक, पाचक, तुरट, रूक्ष, ग्राहक व रक्तदोष, कुष्ठ, अतिसार, पित्तार्श, कफ, तृषा, कृमि, ज्वर, आंव व दाह यांचा नाश करितो. **काळा कुडा**—रक्तदोष, अर्शरोग, त्वग्दोष व पित्त यांचा नाश करितो. •वरकड गुण पांढऱ्या कुड्यासारखे आहेत. ( १. ) **कृमींवर**—कुड्याचें पाळ उगाळून नुसतें अथवा वावडिंगाची पूड घालून द्यावें.( २. )**अतिसारावर**—कुड्याच्या सालीचा अंगरस काढून तो द्यावा. अ०सालीच्या पुटपाकानें रस काढून तो मधाशीं द्यावा. ( ३. ) **मुतखड्यावर**—इंद्रजव व निशोत्तर यांचें चूर्ण दुधांत किंवा तांदुळांच्या धुवण्याशीं द्यावें ( ४. ) **फुरशाच्या विषावर**—काळ्या कुड्याचें पाळ उगाळून त्यांत इंद्रजवाचें चूण अर्धमासा घालून द्यावें. अ० सालीचा रस कढून द्यावा. ( ५. ) **खवड्यावर**—कुडेसाल व सैंधव गोमूत्रांत वाटून लेप करावा. ( ६. ) **कावीळीस व सर्व विषावर**—काळ्या कुड्याच्या अंकुरांचा चार पैसेभार रस द्यावा. दिवस ३. पथ्य तूप भात अळणी. ( ७. ) **नळ फुगल्यास**—इंद्रजव भाजून त्याची पूड पैसाभार. मध पैसाभार व तूप पैसाभार हीं एकत्र करून द्यावी. दि० ७. ( ८. ) **जीर्णज्वरास**—कुड्याच्या मुळाची साल व गुळवेल यांचा काढा द्यावा. अ० साल रात्रीं पाण्यांत भिजूं घालून सकाळीं तें पाणी प्यावें. ( ९. ) **कान वाहतो त्यास**—कुड्याच्या सालीचें चूर्ण वस्त्रगाळ करून कानांत घालावें व वर मखमालीचे पाल्याचा रस पिळावा. ( १०. ) **उन्हाळीवर**—कुड्याची साल गाईच्या दुधांत वाटून द्यावी, ह्मणजे कठिणही मूत्रकृच्छ्राचा नाश होईल. ( ११. ) **परिणामशूळावर**—इंद्रजवाचें चूर्ण उष्णोदकाशीं द्यावें. ( १२. ) **मुलांस भसऱ्याच्या हगवणीवर**—कुड्याचें पाळ ताकाचे निवळींत उगाळून थोडा हिंग लावून पाजावें. ( १३. ) **मुलांच्या मोडशीवर**—कुड्याचें मूळ व मोगली एरंडाचें मूळ ताकाचे निवळींत उगाळून थोडा हिंग घालून पाजावें ( १४. ) **वातशूळावर**—इंद्रजवाचा काढा करून त्यांत पादेलोण व भाजलेला हिंग घालून द्यावा. ( १५. ) **गुरांच्या कुंदरोगावर**—( गुरूं सुक्या लेंड्या हगतें) कुड्याच्या कोंवळया तुवऱ्या बारीक कुटून पावशेर रस काढावा. त्यांत तितकाच नारळाचा. रस व नवटांक गूळ घालून सात दिवस प्रत्यहीं दुवक्त हें औषध द्यावें. ( १६. ) **सर्व प्रकारचा अतिसार, संग्रहणी, पांडु, जीर्णज्वर, यांवर कुडेपाक**—कुड्याचीं मुळें धुऊन त्यांची साल काढावी. तिचा पाणी घालून कुटून रस काढावा तो रस अग्निवर ठेऊन आटवीत राहावें. साधारण आटल्यावर त्यांत सुंठ, मिरें

पिंपळी, जायफळ, मायफळ, पत्री, लवंग, वावडिंग, मुरुडशेंग, बाळबेलफळ, नागकेशर यांचें चूर्ण. बेतानें घालून सारखें मिश्रण झाल्यावर हरभऱ्याएवढ्या गोळ्या कराव्या. ही गोळी अतिसार व संग्रहणीस ताकाचे निवळींत किंचित् हिंगाचें चूर्ण टाकून त्यांतून; अ० गोड अदमुरें दह्यांतून; सुंठीचे काढ्यांतून; तूपांतून द्यावी. लहान मुलांसही हें औषध गुणावह आहे. पांडुरोगावर फक्त ही गोळी गोमूत्रांत उगाळून द्यावी (१७.) **वातज्वरावर**—कुड्याच्या मुळाची साल १ तोळा घेऊन बारीक वाटावी व ५ तोळे पाण्यांत कालवून तें पाणी वस्त्रगाळ करून द्यावें व त्यांत थोडा ओंवा बारीक वाटून कालवून कौलाचा तुकडा तापवून विझवावा आणि तें द्यावें. (१८.) **नाळगुदावर**—वारुळांतील कुड्याचें मूळ ऊन्ह पाण्यांत उगाळून प्रत्यहीं दोन वेळप्रमाणें १४ अगर २१ दिवस द्यावें (१९.) **सर्वातिसारावर**--कुड्याचे सालीचा काढा अष्टमांश करून त्यांत अतिविषाची पूड घालून तो द्यावा; अथवा कुड्याचे मुळाची साल व अतिविष यांचें चूर्ण मधाशीं द्यावें. (२०) **मुतखड्यावर**—कुड्याची साल दह्यांत उगाळून प्यावी. (२१.) **कुटजाष्टकावलेह**--कुड्याच्या मुळाची साल ओली. वजन ५ शेर, पाणी १६ शेर घेऊन काढा करावा. अष्टमांश उरला ह्मणजे वस्त्रानें गाळून पुन्हा आटवावा. दाट झाला ह्मणजे त्यांत औषधें घालावयाचीं तीं:—पहाडमूळ, कांटेसांवरीचा डींक, धायटीचें फूल, नागरमोथे अतिविष, लाजाळू, बाळबेल, यांचें चूर्ण चार चार तोळे त्यांत घालून तो अवलेह तयार करावा. तो-पाणी, गाईचें दूध, शेळीचें दूध, भाताची पेज, यांतून एखाद्या अनुपानाशीं दिला असतां अतिसार, संग्रहणी, रक्तप्रदर, रक्तपित्त, मूळव्याधीचें रक्त, यांस बंद करितो.(२२.) **वातगुल्म, वायु, क्षय, कंडू ज्वर** यांवर—कुड्याच्या मुळांची साल आणून तिचा पुटपाकानें रस काढून तो द्यावा.

## ७०. कुंद.

**कुंदाचे वेल असतात. हे वेल चमेलीच्या वेलासारखे होतात. यांस अश्विन-कार्तिकांत फुलें येऊं लागतात. हें फूल रानमोगरीप्रमाणें असतें. हें किंचित् लांबट असतें. याचा चैत्र-वैशाखांत फार भर होतो. यांस बराच वास येतो; परंतु तो जरा उग्रट असतो.**

## ७१. कुंभा. (गु. कायफळ. सं. कुंभी, कुमुदिका.)

**कुंभ्याचीं झाडें कोंकणांत प्रसिद्ध आहेत. याचीं पानें लांबोडीं असतात. तीं पत्रावळीच्या उपयोगीं पडतात. याचें फळ बेलफळाप्रमाणें गोल होतें. यांत तांबडा व पांढरा अशा दोन जाती आहेत. याच्या सालीचे बंद चांगले होताता. तांबडा कुंभा औषधास अधिक उपयोगी आहे. ह्याच्या सालीस 'कायफळ' असें ह्मणतात.**

**कुंभा**—तिखट, उष्ण, तुरट, ग्राहक व वात, पित्त, ज्वर, दाह, कफ, रक्तातिसार, योनिरोग, विष व कृमि यांचा नाश करितो. ( १. ) **फुरशाच्याविषावर**—तांबड्या कुंभ्याच्या सालीचा रस पावशेर व थोडासा काळेवेलीचा रस पाण्यांत काढून हे दोन्ही एकत्र करून त्यांत मिरपूड घालून पोटांत द्यावें. उतार काळे तुळशीचा रस पाजावा. ( २. ) **खोकल्यावर**—कुंभ्याचे सालीचा रस मध एकत्र द्यावा. दि. ७. ( ३. ) **उन्हाळ्यास**—कुंभ्याच्या सालीचा रस साखर घालून द्यावा. ( ४. ) **दम्यास**—कुंभ्याच्या सालीच्या रसांत मोहरी वाटून द्यावा ( ५. ) **धातुपरम्यास**—कुंभ्याचे सालीचा व नारळाचा रस एकत्र करून द्यावा दि. ७. ( ६. ) **अंग भाजल्यास**—तांबड्या कुंभ्याचे सालीचा रस वर लावावा. ( ७. ) **मोडशीवर**—कायफळ उगाळून द्यावें. ( ८. ) **अतिसारावर**—कुंभ्याच्या सालीचा काढा द्यावा. ( ९. ) **मस्तकशूळावर**—कायफळाची पूड ओढावी. ( १०. ) **व्रणशुद्धीस**—कुंभ्याच्या सालीचा काढा करून त्यानें व्रण धुवावा.(११) **दंतरोगावर**—कुंभ्याच्या सालीचा काढा करून त्याच्या गुळण्या. कराव्या ह्मणजे दंतशूळ दूर होऊन दांत मजबूत होतात.

### ७२. कुरकुला.

कुरकुला हा एक चिखलांत व सर्द जमिनींत होणारा रोपा आहे. याची आकृति अळवासारखी आहे. याची उंची वितीवर नसते. पान कारंद्याच्या पानासारखें असून वाटोळें व फार लहान असतें. कुरकुल्याचें एकच पान वर येतें, तेव्हां तो देंठासुद्धा तोडून काढतात याची भाजी अळवासारखी परंतु बुळबुळित होते. यांत दाळ घातली पाहिजे.

### ७३. कुरडू ( सं. भूरुंडी. )

ही भाजी पांढऱ्या माठासारखी आहे. परंतु ती रानभाजी असल्या मुळें कोणी लावीत नाहींत. पावसाळ्यांत ही आपोआप उगवते हिची उंची सुमारें २ हात असते. हिचीं पानें पातळ असून हीस बीं फार येतें. हिच्या शेंड्यावर पांढऱ्या रंगाचे झुबके येतात; त्यांत हिचें बीं असतें. हें बीं थंड आहे. तांबड्या जातीचीं फुलें ज्या कुरडूवर येतात तीस "देवकुरडू" असें ह्मणतात.

**कुरडू**—तुरट, ग्राहक, उष्ण, रसायन; व मेधा, रुचि यांतें करणारी, शीत रूक्ष, अग्निदीपक, अविदाही, लघु, स्वादु, हृद्य, वृष्य व त्रिदोष ज्वर, मेह, श्वास, दाह, भेद, कुष्ट, भ्रम, अरुचि यांचा नाश करितो. ( १. ) **मुतखडा व मूत्राघा-**

तावर—कुरडूचें बीं १ मासा व खडीसाखर १ मासा एकत्र करून द्यावें. मूत्र बंद झालें असल्यास हें औषध दोन तीन वेळ द्यावें; ह्मणजे मूत्र सुटेल. (२.) **भांग व गांजा यांवर उतार**—कुरडूचीं मुळें थंड पाण्यांत उगाळून तें शक्त्य-नुरूप द्यावें. (३.) **कफ मूत्रकृच्छ्रावर**—ताकाबरोबर कुरडूचें बीं कुटून द्यावें.

## ७४. कुलित्थ. (सं.)

**यांस हुलगे असें ह्मणतात. जसा तृणधान्यांत हरीक केवळ गरीब धान्य तसें द्विदलधान्यांत कुलित्थ हें धान्य आहे. हें धान्य सर्वत्र होतें. हें झाड लहान असतें, याची उंची एक हात असते. या झाडाची आकृति व पानें कांहींशीं उडदासारखींच आहेत. याची शेंग किंचित् वांकलेली व चपटी असते. कुलित्थांचा रंग तांबूस असतो. कोठें काळ्या व पांढऱ्या रंगाचेही कुलित्थ होतात. कुलित्थ घोड्यांस व दुभत्या गुरांस खावयास घालतात. कुलित्थ उकडून, त्यांच्यावरचें पाणी काढून त्याचें सार करितात. त्यास काट असें ह्मणतात. बहुधा रोगी मनुष्यास या प्रकारच्या सारानें भात जेवावयास घालतात.**

**कुलित्थ**—मधुर, तीक्ष्ण, रक्तपित्तकारक, सारक, घर्माला शोषण करणारा उष्ण, पाककाळीं आंबट तिखट, विदाही, तुरट, रूक्ष, पित्तल, लघु; व उचकी, कफ, श्वास, कास, वात, अश्मरी, दृष्टिरोग, पीनस, आनाह, शुक्र, गुल्म, अर्श, ज्वर, मद, कृमि व सूज यांचा नाश करितो. (१.) **वायूचा विकार न होण्यास**—कुलित्थांचा काढा द्यावा, ह्मणजे रोगी मनुष्यास वायूचा विकार होत नाहीं. (२.) **गंडमालांवर**—हुलगे व मिरीं यांचा काढा द्यावा. (३.) **अतिसारावर**—हुलग्याचीं झाडें ठेंचून त्यांचा रस तोळा १ व कात पावतोळा हीं एकत्र करून दिवसांतून तीन वेळ द्यावीं. (४.) **घाम बंद होण्यास**—भाजलेल्या हुलग्यांचें पीठ अंगास चोळावें. (५.) **उरांतून व पोटांतून रक्त** पडतें त्यास—पावशेर कुलित्थ शिजत घालून त्यांत ५ बिबे कापून घालावे व तें काट प्रत्यहीं पिण्यास द्यावें. (६.) **शूलावर**—कुलित्थांचा काढा करून हिंग, बिडलोण व सुंठ यांचें चूर्ण घालून द्यावा. (७.) **मुतखड्यावर**—कुलित्थांचा काढा, उन्हाळीचें चूर्ण व सैंधव २ मासे घालून द्यावा.

## ७५. कुवा.

**या वृक्षास नागिणीचा वृक्ष असेंही ह्मणतात. हे वृक्ष सह्याद्रीच्या खालच्या प्रदेशांत पुष्कळ होतात. यापासून फारशी छाया मिळत नाहीं, कारण हा ५० । ६० हात उंच वाढतो; व २ । २॥ हात रुंद अ-**

सून वरही फारसा विस्तृत होत नाहीं. या वृक्षाचें लांकूड कठीण व सरळ असतें. यास्तव तारवास त्याच्या डोळकाठ्या करितात. गोमांतक व कर्नाटकांत यास कुवा ह्मणतात. यास नागाच्या फणीसारखीं तांबडीं फळें येतात ह्मणून नागिणीचा वृक्ष असेंही ह्मणतात. याचें फळ फोडलें ह्मणजे त्यास विलक्षण वास असून त्यांत दोन काळ्या बिया असतात, त्यांतील गीर मुलें खातात. याचें लांकूड पुष्कळ कामास उपयोगीं पडतें.

## ७६. कुसर. ( सं. माधवी, वासंती. )

कुसरीच्या वेलीस कस्तुरमोगरा, मधुमाधवी, असेंही ह्मणतात. हिचीं पानें मोठीं असून फुलें पांढरीं शुभ्र असून तीं जाईचे फुलांहून मोठीं असतात. या वेली जंगलांत पुष्कळ होतात. फुलांचा बहार वसंतऋतूमध्यें असतो. हीं फुलें फुललीं ह्मणजे यांचा चाहोंकडे मधुर सुवास सुटतो.

**कुसर**—तिखट, कडू, तुरट, मदगंधि, मधुर, शीतल, लघु, व पित्त, कास, व्रण, दाह, शोष, त्रिदोष यांचा नाश करितें. ( १. ) **वाट सरल्यास**—कुसरीचे पाल्याच्या दोन पैसेभार रसांत तितकेंच तूप घालून देणें. दि. ३. ( २. ) **कफविकारानें मुलांस वायगमन झाल्यास**—कुसरीचीं पानें ७ घेऊन त्यांत मिरें ७ व लसणाच्या पाकळ्या ७, शेवग्याची साल ४ मासे. व तांबड्या हसाणीची साल चार मासे, हीं सर्व एकत्र करून थंड पाण्यांत वाटावीं, व वस्त्रगाळ करून रस एक तोळापर्यंत काढून शक्तीप्रमाणें एक वेळ दिला असतां, वमन किंवा रेच होऊन विकार शमन होतो. ( ३. ) **मुलांच्या कफविकारांवर**—कुसरीचें पान अर्धे व तांबड्या अगस्त्याचीं पानें ४. मिऱ्यांचे दाणे २ हीं वाटून त्यांचा रस काढावा, त्यांत उडदाच्या डाळीएवढी टांकणखाराची लाही व रसाइतकाच मध घालून चाटण करून द्यावें.

## ७७. कुहिरी. ( सं मर्कटी. गु. कौचो. )

कुहिरीचीं रोपें रानांत मृगाचा पाऊस पडूं लागला ह्मणजे चोहों कडे उगवतात. मग त्यांचे मोठे वेल होऊन झाडावर किंवा कुंपणावर चढतात. कुहिरीच्या वेलास पानाच्या बाजूस लांब देंठ फुटून त्यास फुलांचा तुरा येतो. एका तुऱ्यांत वीस पंचवीस फुलें असतात. या फुलांस एक एक बोट लांब व तितक्या जाड अशा शेंगांचे घोंस लाग-

तात. दर घोंसांत पांचांपासून दहापर्यंत शेंगा असतात. या शेंगांवर बारीक कांटे असतात.हे कांटे अंगास लागले कीं अंगाची विलक्षण आग होऊन ती जागा सुजते. फोड आणण्याच्या कामीं यांचा उपयोग करितां येतो. शेंगांतील बियांस कवचबीज असें ह्मणतात. कुहिरींत दोन जाति आहेत. रेडेकुहिरी व मेंढेकुहिरी, अ० गोड्डी कुहिरी; पैकीं मेंढेकुहिरीची शेंग किंचित् मोठी व नाजूक असून वरील कांटे जलाल नसतात. या शेंगेवरील कांटे सुरीनें काढून टाकून त्यांची भाजी करितात. ही हिरव्या केळ्याच्या भाजीसारखी लागते.

कुहिरी—मधुर, वृष्य, शीत, धातुवर्धक, बलकर गुरु, कडू व क्षय, वायु, शीत पित्त, रक्तदोष, व्रण, कफ, रक्तपित्त, यांचा नाश करिते. हिचें बीज धातूवर्धक, वृष्य शीतळ, स्वादु, गुरु; व वात, दुष्टव्रण व रक्तपित्त यांचा नाश करितें. वरकड गुण उडदासारखे आहे. (१.) **जंतांवर**--कुहिरीच्या शेंगेवरील थोडेसे कांटे दुधांत किंवा गुळांत घालून तें लहान मुलांस द्यावें. हें औषध फार देऊं नये. यानें जंतांचा उपद्रव त्वरीत दूर होतो. हें मोठें रामबाण औषध आहे. (२.) **कुहिरीचें विषास**—तूप, साखर व मध एकत्र करून द्यावें. (३.) **लहान वासरांस जंत झाल्यास**—कुहिरीचें मूळ पाण्यांत उगाळून पाजावें अथवा कुहिरीचीं कुसें ताकांत पाजावीं. (४.) **गर्भधारणास**—गोड कुहिरीची मुळी व कवठाचा गीर हे दुधाशीं वाटून द्यावे. (५.) **धातुपुष्टतेस**—कवचबीज व तालीमखान्याचें चूर्ण साखरेबरोबर खावें; वर धारोष्ण दूध प्यावें. (६.) **सोमलाचे विषास**—खाजकुहिरीची साल व पांढरा कात एकत्र करून पाण्यांत वाटून थोडथोडें पाणी पाजीत जावें (७.) **मूर्च्छा दूर होण्यांस**—कुहिरीचीं कुसें अंगास लावावीं. (८.) **श्वासावर**—कुहिरीच्या बियांचें चूर्ण प्रातःकाळीं मध व तूप यांबरोबर चाटावें. (९.) **गांठ, बद, मांजरी यांवर**—कुहिरीचें बीं उगाळून लावावें. दिवसांतून २।३ लेप करावे.

### ७८. कुळई. (सं. सुषवीपुष्प.)

ज्येष्ठअखेरीच्या सुमारास जेव्हां एकदा पाऊस पडतो तेव्हां ही भाजी रानांत जिकडेतिकडे होते. तांबडमातीच्या जमीनींत व डोंगरी प्रदेशांत ही पुष्कळ सांपडते. या भाजीचे कांदे पांढरे असून ते जमिनींत असतात. ही भाजी केवळ गवतासारखी आहे. कुळईची भाजी कोंवळी आहे ती मात्र खावयाच्या उपयोगीं. हीस लहान पांढरीं फुलें येतात ही भाजी खायास चांगली आहे, ही भाजी घेऊन पिळून टाकू

तात, अथवा आधीं मीठ लावून पाणी काढून पिळून मग फोडणीस टाकतात. हीस "फोडशी" असेंही ह्मणतात.

**कुळई**--शीतळ, स्वादु, वातकर, कफकर, गुरु अशी आहे.

## ७९. केवडा. ( सं. केतकी. )

केवड्याचें झाड दोन पुरुष उंच वाढतें. याचीं लांबचेलांब बेटें वाढतात. हीं झाडें बहुतेक ठिकाणीं होतात. याचे पातीस कांटे असतात. केवड्याचीं वनें फार दाट असतात यांत पांढरा व पिंवळा अशा दोन जाती आहे. पांढऱ्या जातीस केवडा व पिंवळीस केतकी ह्मणतात. केतकीस फार वास येतो व तिची पाती फार सुकुमार दिसते श्रावणांत केवडयांचा भर असतो. केतकी, माघ व फाल्गुन या महिन्यांतच होते; पांढरे केवडे बारमाही होतात. केवडयाच्या वनांत सर्प राहतात कर्नाटकांत या झाडाच्यापातींच्या छत्र्या व हांतऱ्या करितात. ही पाती कातारी लोकांस फार उपयोगीं पडते. केवड्याचें तेल काढतात; तें फार सुवासिका असतें. केवडयाच्या पानांत केलेल्या कातगोळ्या फार सुवासिक होतात. केवड्याच्या आंत जी कांजीण असते तिची भाजी करितात.

**श्वेतकेतकी**— तिखट, गोड, कडू, लघु व विष, कफ यांचा नाश करिते. हिचें फूल –लघु, तिखट, कडू, कांतिकर, उष्ण; व वायु, कफ, केशांचा दुर्गंध यांचा नाश करितें. त्याचें केशर शिब्यांचें नाशक व किंचित् उष्ण आहे. हिचें फळ–गोड, वायु, मेह व कफ यांचा नाश करिते. **सुवर्णकेतकी**—कडू, नेत्रांला हितावह उष्ण, लघु तिखट, मधुर; व विषदोष, कफ यांचा नाश करिते. हिचें फूल सुखकर कामोद्दीपन, किंचित् उष्ण, कडू, तिखट नेत्रहितावह, सुगंधि आहे. हिच्या पारंब्या अतिथंड, देहाला दृढ करणाऱ्या, तिखट, बलकर, रसायन व पित्त, कफ यांचा नाश करितात. हिच्या फळाचे व केशराचे गुण श्वेतकेतकीचें फळ व केशर यांसारखे आहेत. ( १. ) **रक्तप्रदरावर**--केवड्याची मुळी पाण्यांत उगाळून खडीसाखर घालून द्यावी. ( २. ) **अपस्मारावर**—केवड्याच्या कणसावरील भुकटा व केतकीचा फुलोरा समभाग घेऊन एकत्र कुटावीं व तें चूर्ण तपकिरीप्रमाणें नाकांत ओढावें. ( ३. ) **उष्णतेनें कपाळ उठतें त्यावर**--केवड्याचें पाणी व पांढरें चंदनाचें गंध हीं एका कांचेच्या बाटलींत घालून त्या बाटलीच्या तोंडावर बारीक फडकें बांधून ती बाटली वरचेवर हलवून हुंगीत जावें; ह्मणजे कपाळ राहतें. ( ५. ) **प्रमेहावर**—केतकीचें मूळ वाफून त्याचा रस तोळे २ व साखर टांक २ एकत्र करून प्यावें ( ५. )

**सर्व प्रकारच्या उष्णतेवर**—केवड्याच्या पातीच्या रसांत जिरें वाटून साखर घालून तो रस द्यावा. दि. ७. पथ्य ताकभात, अळणी. ( ६. ) **कंठरोगावर**—केवड्याच्या कणसाच्या आंतील फुलाची विडी;करून ओढावी ह्मणजे कंठसर्पादि रोग दूर होतात ( ७. ) **मुसळ्यारोगावर**--केवड्याच्या कांद्याचा रस पाजावा.

## ८०. केवण. ( सं. ऋद्धि. )

**केवणीस ' मुरुडशिंगी' असेंही ह्मणतात. केवणीचें झाड साधारण पुरुषभर उंच वाढतें हिचीं पानें फार मोठीं नसतात. हीस तोंडयाच्या मुरडीप्रमाणें मुरड घातलेल्या शेंगा येतात. यावरून यांस मुरुडशेंगा असें नांव पडलें असावें.**

" **मुरुडशेंग**—मधुर, स्निग्ध, मेधाकर, शीतळ कफकर, शुक्रवर्धक, प्राणधारक ऐश्वर्यकर, बलप्रद, रक्तशुद्धिकर, रुचिकारक, गुरु आहे; व कुष्ट, कृमिदोष, मूर्च्छा रक्तपित्त, तृषा, क्षय, पित्त, वातरक्त व ज्वर यांचा नाश करिते. ( १. ) **लहान, मुलांस पोटांत मुरडा** वगैरे न होण्यास बाळघुटींत मुरुडशेंग उगाळून द्यावी, ( २. ) **कानांत गोमाशी गेल्यास**—केवणीचें मूळ एरंडेलांत उगाळून १०।५ वेळ कानांत घालावें; ह्मणजे गोमाशी मरून फुगून वर येते. ( ३. ) **मुरडा होतो त्यावर**—केवणीचें मूळ ताकांत उगाळून द्यावें ( ४. ) **खांडूक व जखम** वगैरे. वर-केवणीचें मूळ उगाळून लावावें.

## ८१. केकती.

**घायपातीच्या पानाप्रमाणेंच केकतीचीं पानें असतात; परंतु त्याहून तीं थोडीं अरुंद असतात. या पानांच्या शेवटांस करवतीप्रमाणें कांटे असतात. हीं झाडें सर्वत्र आहेत. केकतीच्या पात्या भिजूं घालून त्यांचे दोर वळतात. ते मजबूत असतात. केकतीच्या पात्यांमधून उभी व सरळ अशी एक काठी निघते. ही काठी अबदागिरीस दांडी कर-ण्याच्या कामीं पडते. हीस कोणी "घायाळ" असेंही ह्मणतात.**

( १. ) **कंडूवर**—केकतीच्या पानांचा रस काढून तो अंगास चोळावा. यानें आग होते. फारच आग होऊं लागल्यास शेण चोळून थंड पाण्यानें स्नान करावें.( २. ) **मुसळ्यारोगार**—केकतीच्या कांद्याचा रस पाजावा.

**केशर**-सुगंधी, कडू, तिखट, रुचिकर, आनंदकारक, उष्ण, कांतिकर, तुरट स्निग्ध; व कंठरोग, वायु कफ, खोकला, मस्तकशूल, विष, वांति, व्रण, व्यंग कृमि हिक्का, त्रिदोष कुष्ठ यांचा नाश करिते ( १. ) **रक्तपित्तावर**—शेळीच्या दुधांत केशर शिजवून प्यावें व शेळीच्या दुधांत भात खावा. ( २. ) **अंगांतून रक्त फार फार गेल्यास**--मधाबरोबर केशर खावें. ( ३. ) **पीनसरोगावर**—केशर तुपांत

खलून नस्य द्यावें. (४.) **अर्धशिशीवर**—केशर व तूप एकत्र खलून नस्य द्यावें. (५.) **मोडशीवर**—केशर निंबाच्या रसांत द्यावें. (६.) **मृत्तिकाजन्यपांडुरोगावर**—केशर, ज्येष्ठमध, पिंपळी, निशोत्तर यांचा काढा करून त्याचीं ४ पुटें मातीस द्यावी आणि ती माती खाण्यास द्यावी; ह्मणजे खाल्लेली माती पडून विकार दूर होईल. (७.) **मस्तकरोगावर**—केशर व बदाम यांचा गाईचे तुपांत खल करून त्याचें नस्य द्यावें. (८.) **अहिऱ्यावर**—केशर मधांत खलून त्याचें अंजन करावें. (९.) **मूत्राघातावर**—रात्रीस पाण्यांत केशर भिजत घालून सकाळीं त्यांत मध घालून तें कोळून प्यावें. (१०.) **स्वर पडते त्यास**—जुन्या तुपांत केशर खलून तीन दिवस प्राशन करावें. (११.) **कृमींवर**—केशर व कापूर हें दुधांत द्यावें. (१२.) **गर्भिणीच्या रक्तस्रावावर व पोटदुखीवर**—गाईचें लोणी (त्यांतील पाण्याचा अंश काढून), केशर २ मासे घालून १ तोळा देणें

## *८२. केशर. (सं.) (गु. केसर.)

केशर नेपाळ व इंग्लंड या देशांत पिकतें. केशराचें झाड लहान असतें. त्याचे कांदे दोन दोन हाताच्या अंतरानें हारीनें लावतात. ते लावल्यानंतर २।३ महिन्यांनीं झाडें होऊन त्यांस फुलें येतात. त्यांस तीन पाकळ्या असतात आणि आंत तंतु असतात, तेच केशर होत केशराचा रंग तांबूस असून तंतु लांब असले ह्मणजे तें उंचप्रतीचें असें समजावें. केशर एक वर्षावर राहिलें असतां बिघडतें. हें रंगास व औषधास उपयोगीं पडतें. यास चांगला वास येतो.

## ८३. केळ. (सं. कदली. गु. केर. हिं. कदली.)

केळीचीं झाडें बहुतकरून सर्व देशांत आहेत. तिच्या मुळांतून जे कोंब फुटतात ते काढून दुसऱ्या ठिकाणीं लावतात, ह्मणजे तिचीं झाडें होतात. केळ्यांच्या सुमारें वीस जाति आहेत. गोमांतक, कर्नाटक व वसई या प्रांतांत केळ्यांचें पीक फार होतें. वसईप्रांतांत आगाशी गांवीं सुकीं केळीं करून तीं चहूंकडे पाठवितात. अरण्यांत वरसातींत ज्या केळी आपोआप पिकतात त्यांस चव्हेळी अथवा रानकेळी ह्मणतात. कच्याकेळ्यांचीं, केळफुलांचीं व गाभ्याची भाजी होते. सोपटांचीं राख रंगाच्या उपयोगीं पडते. सूत रंगविणारे धनगर व कोष्टी इचा फार उपयोग करितात. पिकल्या केळ्यांची कोशिंबिर चांगली होते. केळीच्या योगानें हत्यारांस पाणी देतां येतें. केळीच्या पानांचे दांडारे वाळवून जाळले असतां त्यांपासून क्षार उत्पन्न होतो. त्याचा कोंकणांत परीटलोक साबणाबद्दल उपयोग करितात. गांवढे-

---

* सूचना—पान ५६ यांतील केशराचे गुण आहेत त्याचे अगोदर हें वर्णन वाचावें.

गांवांत ज्या गरीब लोकांस मलम ह्मणून पदार्थ माहीत नाहीं व औषध देण्यास वैद्यही नाहीं; ते लोक केळांतल्या चिकाची, मलमाप्रमाणें जखमेवर पट्टी देतात व त्यांचा तो घाय बरा होतो. पिकलेल्या केळांचा खाण्याकडे उपयोग होतो. रानकेळीं कोणी खात नाहीं त्यांच्या कच्या केळयांची, फुलांची व गाभ्याची भाजी मात्र करितात व पानें जेवणाच्या उपयोगीं पडतात. कोळी, कातकरी, ठाकूर वगैरे गरीब लोक जमिनींतून रानकेळींचे कंद काढून वाळवून त्याचें दळून पीठ करितात. व त्याच्या भाकरी करून खातात.

**केळ**—शीतळ, गुरु, वृष्य, स्निग्ध, मधुर आहे व पित्त, रक्तविकार, योनिदोष, अश्मरी, रक्तपित्त, यांचा नाश करिते. **पिकलेलें केळ**--बलकर, तुरट, मधुर, गुरु, शीत, वृष्य, शुक्रवर्धक, संतर्पण; व मांस, कांति, अरुचि, यांना वाढविणारें दुर्जर, कफकारक, असें आहे व तृषा, ग्लानि, पित्त, रक्तविकार, मेह, क्षुधा, नेत्ररोग, यांचा नाश करिते; व मंदाग्निपुरुषानें भक्षिलें असतां विकार करितें. **केळफूल**—स्निग्ध, मधुर, तुरट, गुरु, ग्राहक, कडू, अग्निदीपक, वातनाशक, किंचिदुष्णवीर्य आहे, व रक्तपित्त, क्षय, कृमि, पित्त, कफ यांचा नाश करितें. **कदलीसार**--(कालें) ग्राहक, अप्रिय, गुरु, शीत आहे व तृषा, दाह, मूत्रकृच्छ्र, अतिसार, सोमरोग, अस्थिस्राव, रक्तपित्त व विस्फोट यांचा नाश करितें. **कदलीकंद**—रूक्ष, वातल, तुरट, गुरु, शील, बलकर, मधुर, केश्य, रुच्य, अग्निमांद्यकर आहे व कर्णशूल, आम्लपित्त, दाह, रक्तदोष, सोमरोग, रजोदोष, कृमि व कुष्ठ यांचा नाश करितो. **केळीचें पाणी**—शीतळ व ग्राहक आहे व मूत्रकृच्छ्र, मेह, तृषा, कर्णरोग, अतिसार, अस्थिस्राव, रक्तपित्त, विस्फोट, रक्तदोष, योनिदोष व दाह यांचा नाश करितें. **रानकेळ**—शीतळ, मधुर, बलवर्धक, वीर्यवर्धक, रुच्य, दुर्जर, जड आहे; व तृषा दाह, शोष, पित्त, यांचा नाश करितें. हिचें फळ तुरट, मधुर व गुरु असें आहे. (१.) **पोटांत विष गेल्यास त्यावर**—केळीच्या गाभ्याचा रस काढून पाजावा. (२.) **पिसाळलेल्या कुत्र्याच्या विषावर**--पिकलेल्या रानकेळ्याचें बीं खावयास द्यावें व दंशावरही वाटून लावावें. (३.) **श्वासावर**—केळयाच्या आंतील केसरयुक्त भाग पोखरून त्यांत मिऱ्याचें चूर्ण भरून रात्रीस ठेवावें; प्रातःकाळीं तें केळ मंदाग्नीवर भाजून खावें; ह्मणजे श्वासरोग लवकर दूर होतो. (४.) **सुखप्रसूति होण्यास**--केळीचा कांदा कंबरेस बांधावा; प्रसूत झाल्याबरोबर सोडून टाकावा. (५.) **उचकीवर**—रानकेळीच्या पानांची राख मासा १ व मध तोळा १ हीं एकत्र करून द्यावी. (६.) **सुजेवर**—गव्हांची कणीक व पिकलेलें केळें पाण्यांत कालवून उन्ह करून सुजेवर बांधावें. (७.) **सोमलाचे विषावर**—केळीच्या सोपांचा रस पावशेर पोटांत द्यावा. (८.) **जिभेस**

**खरें येतात त्यास**—पिकलेलें केळें गाईच्या दुधाबरोबर सूर्योदयापूर्वी खावें. (९.) **कामिणीवर**—पिकलेलें केळें मधांत कालवून द्यावें. (१०.) **भस्मक रोगावर**—केळयांची शिकरण तुपांत करून खावी; अथवा केळीच्या कालाचें पाणी काढून पीत जावें.(११.) **धुपरोगावर व सोमरोग ह्मणजे मूत्रातिसाराप्रमाणें रोग होतो त्यावर**—पिकलेलें केळें, आंवळयांचा रस,साखर दोन भाग एकत्र करून द्यावें. (१२.) **मूत्रकृच्छ्र ह्म० उन्हाळीवर**—गोमूत्रांत केळीचे कांद्याचा रस घालून द्यावा. (१३.) **दाह शमन होण्यास**—केळीच्या व कमळाच्या पानावर निजावें. (१४.) **मुलांस दंतोद्भव रोग होतो त्यावर**—केळफुलांतून ज्या बारीक पारंब्या ( बाळकेळी ) गळून पडतात, त्या बारीक वाटून रस काढावा. त्यांत थोडी जिन्याची पूड व खडीसाखर घालून मुलांचे शक्तीप्रमाणें नित्य एक वेळ चार माशांपासून ६ मासेपर्यंत या क्रमानें सतत सात रोज द्यावें; व फक्त नुसता हाच रस दहा वीस वेळ हिरड्यांस लावावा; ह्मणजे ताप वगैरे त्वरित शमतात. (१५.) **देवी हलक्या येण्यास**—रानकेळीच्या बिया ह्मशीचे दुधांत वाटून कपडछान करून तें दूध पाजावें. (१६.) **मूत्राघात ह्म० मूत्र बंद होतें त्यावर**—केळीच्या सोपाचें पाणी काढून तें ३—५ तोळे घेऊन त्यांत पातळ केलेलें तूप १।२ तोळे मिश्र करून पाजावें. याचा असा चमत्कार आहे कीं, केळीच्या पाण्याशीं तुपाचा संयोग होऊन पोटांत गेलेलें तूप मूत्रद्वारें फार त्वरित निघून जातें व त्या योगानें द्वार मोकळें होतें आणि लघवी सुटते. पुरुषाहून स्त्रियांस तर फारच त्वरित लागू पडतें. (१७.) **प्रदर व धातुविकार यांवर**—पिकलेलें एक केळें अर्धा तोळा तुपाबरोबर दररोज सकाळीं व सायंकाळीं खात जावें. याप्रमाणें सतत आठ दिवस सेवन केलें असता वरील विकार शमन होतात. या औषधानें कोणास थंडी झाली असें वाटल्यास यांतच मधाचे ४ थेंब घालून हें औषध घेत जावें. (१८.) **गुरांस सोमल घातल्यास**—केळीचा रस १ शेर काढून त्यांत तुरटी तोळे १० पांढरा कात तोळा १ घालून तीन दिवस पाजावें. (१९.) **पित्तरोगावर**—पिकलेलें केळें व तूप भक्षण करावें. (२०.) **गुरांच्या मूत्रावरोधावर**—केळीच्या सोपाचें पाणी एक शेरपर्यंत काढून त्यांतून सोनकाव एक तोळा उगाळावा व थोडें सोरमीठ आणि मिरपूड ४ गुंजापर्यंत घालून पाजावें. (२१.) **केळीं खाऊन अजीर्ण झाल्यास**—वेलदोडे खावे. (२२.) **केळीं लवकर पिकण्यास**—लोंगराचा दांडा ४।६ बोटें ठेवून बाकीचा कापून टाकल्यानंतर त्यास खिळयानें टोंचून भोंक पाडून त्यांत वेलदोड्याची पूड भरावी; ह्मणजे केळीं लवकर पिकतात पुष्कळ केळयांत जर थोडीशी वेलदोड्याची पूड टाकली तर केळीं नासून जातात असा वेलदोड्यांत गुण आहे. (२३.) **क्षुपणीवर**—केळीचीं पानें बारीक वाटून त्याची दुधांत क्षीर करून दोन तीन दिवस भक्षावी. (२४.) **ओकारीवर**—केळी

च्या कांद्याचा रस मधाबरोबर प्यावा. ( २५. ) **अंगांत भिनलेली गर्मी व प- रमा यांवर**—केळीचा गाभा सांवलींत सुकवून चूर्ण करून तें साखर व पाणी यांशीं द्यावें.

## ८४. कोंठिंबर.

**कोंठिंबर ही कारिटाची जात आहे, परंतु कारीट हें फार कडू आहे ह्मणून यास गोडें कारीट ह्मटलें असतां चिंता नाहीं. गुजराथेंत पुष्कळ होतात. यांची भाजी होते, व तीं वाळवून जेवणाबरोबर खातात. यांतही कडवी व गोडी अशा दोन जाति आहेत.**

## ८५. कोथिंबीर. ( सं. कुस्तुंबरी. )

**कोथिंबीर सर्वत्र प्रसिद्ध आहे, हिचा स्वयंपाकांत नित्य उपयोग होतो. या झाडास जें बीं येतें त्यास धणे असें ह्मणतात. धणे मसाल्यांत घालतात. हा पदार्थ स्वादिष्ट, थंड व पित्तशामक, आहे, धणे फोडून लाविले असतां थोडक्या दिवसांत जरूरीपुरती कोथिंबीर तयार होते. कोथिंबीरीच्या वड्या फार उत्तम होतात, कोथिंबिरीची चटणी होते.**

**धणे**—मधुर, हृद्य, तुरट, दीपन, स्निग्ध, कडू, किंचिदुष्ण, अवृष्य, मूत्रल, लघु पाचक, ग्राहक, रुचिर; व तृषा, दाह, अतिसार, खोकला, पित्त, ज्वर, वांति, कफ, दमा, त्रिदोष, अर्श, कृमि व विशेषेंकरून पित्त यांचा नाश करितात. ( १. ) **बिबा उतल्यावर**—कोथिंबीर वाटून लावावी. ( २. ) **अंगांतील देवीची भिनलेली उष्णता निघण्यास**—देवी चांगल्या बऱ्या झाल्यावर रात्रीं धणे व जिरें चौपट पाण्यांत भिजत टाकून, सकाळीं कुसकरून गाळून त्यांत खडीसाखर घालून द्यावें; ह्मणजे कोठ्यांतील उष्णता शांत होते. हा योग पांच चार दिवस करावा। ( ३. **आमावर**—धणे व सुंठ यांच्या काढ्यांत एरंडमुळाचें चूर्ण द्यावें( ४. )**अरुचीवर**—धणे, एलची व मिरीं यांचें चूर्ण तूपसाखरेंतून द्यावें ( ५. ) **दाह व तृषा यांवर**—धणे, अडुळसा, आंवळे, काळीं द्राक्षें व पित्तपापडा, हीं सर्व साधारण कुटून कोऱ्या मडक्यांत घालून त्यांत पाणी घालावें व तशींच एकत्र ठेवून दुसरे दिवशीं तें पाणी प्यावें. ( ६. ) **धान्याचूर्ण--अग्निमांद्य, श्वास, विषमज्वर व अजीर्ण यांवर**--धणे, लवंगा, तेड ( निशोत्तर ) व सुंठ यांचें चूर्ण करून उन्ह पाण्याशीं द्यावें.( ७. ) **ज्वरावर पाचन**—धणे, देवदार, सुंठ, रिंगणी, डोरली यांचा काढा द्यावा. ( ८. ) **पित्तज्वर व अंतर्दाह यांवर**—धणे व तांदूळ रात्रीं पाण्यांत भिजत घालून ठेवावे. दुसरे दिवशीं सकाळीं त्याच पाण्यांत शिजवून पातळ पेज करून ती चांगली थंड झाल्यावर द्यावी. ( ९. ) **दाहावर**—धणे रात्रौ पाण्यांत भिजत

घालून सकाळीं तें पाणी गाळून घेऊन त्यांत खडीसाखर १ तोळा टाकून प्यावें. (१०.) **मूत्राघातावर**—धणे व गोखरू यांचा काढा तूप घालून द्यावा |( ११. ) **जेपाळाचे विषावर**—धण्याचें चूर्ण, साखर व दहीं हीं एकत्र करून द्यावीं. (१२) **गर्भिणीचे ओकारीस**—धण्यांचें चूर्ण ३ मासे, साखर १ तोळा हीं तांदुळांचे धुणांत द्यावीं; अथवा धण्यांचा कल्क तांदुळांच्या धुणांतून साखर घालून द्यावा. (१३.) **रक्तपित्तावर**—धणे, द्राक्ष, बेदाणा यांचा काढा द्यावा. (१४.) **बालकाच्या शूळ, आम व अजीर्णावर**—धणे व सुंठ यांचा काढा द्यावा. (१५.) **मुलांचे डोळे येतात त्यावर**—धण्यांची पोटली बांधून पाण्यांत भिजत घालून ती वारंवार डोळ्यांवर फिरवावी. (१६.) **उन्हाची झळा न लागण्यास**—धणे कोळून त्यांत खडीसाखर घालून तें पाणी प्यावें. (१७.) **बालकाचा खोकला व दमा यांवर**—खडीसाखर व धणे तांदुळांच्या धुणांत वांटून त्यांचें पाणी वस्त्रगाळ करून द्यावे. (१८.) **तृष्णारोगावर**—धणे पाण्यांत भिजत घालून नंतर कोळून त्या पाण्यांत मध व पिठीसाखर घालून ठेवावें व तें वारंवार द्यावें.

## ८६. कोबी. ( सं० पेली. )

**ही भाजी युरोपियन लोकांनीं तिकडून या देशांत आणली आहे. यापूर्वी इकडील लोकांस ही भाजी माहित नव्हती असें ह्मणतात. कोबींत तीन चार जाती आहेत. जिचा गड्डा जमतो ती उत्तम असते ही भाजी उत्तम पौष्टिक आहे.**

**कोबी**—जिला कंद होतो ती मधुर, रूक्ष, स्वच्छ, शीतळ, भेदक, ग्राहक रुचिकर, गुरु; व पित्त कफ, वायु, यांचा नाश करिते. हिच्या कंदाचेही तेच गुण आहेत **कोबी**, जिच्या पानांचा **गठा** होतो ती—मधुर, वृष्य, पाककाळीं तिखट, कडू ग्राहक, शीतळ, लघु, पाचक, अग्निदीपक, हृद्य, वातकर; व कफ, पित्त, ज्वर, प्रमेह, कुष्ठ, खोकला, रक्तदोष व पित्तजन्य भ्रम यांचा नाश करिते.

## ८७. कोरफड. ( सं. कुमारी. गु. कुवार. )
## ( हिं, धीडकुवारि. )

**हीस कुवारकांडें असेंही ह्मणतात. कोरफड ही हिंदुस्थानांत सर्वत्र होते. हिच्या पात्या एकेक मनगटापेक्षांही जाड असून त्यांत बुळबुळीत गीर असतो. तो फार कडू आहे. या पात्या भाजून याच्या गिराचा पातळ रस काढून, त्यांत थोडा गूळ घालून नूतन झालेल्या तान्ह्या बाळास प्रथम एक दोन दिवस पाजतात व मग त्यास आईच्या दुधाचा अभ्यास करितात. कोरफडीस कार्तिक-मार्गशीर्षा-**

च्या सुमारास मधून दांडा फुटून वर तुरे येतात. या दांड्यांस शेलारें असें ह्मणतात. हे सोलून यांची भाजी करितात, ती उत्कृष्ट होते. याचे तुरे तुपांत तळून खातात. ही भाजी फरमाशी असून महाग खपते. गुजराथी लोक कोरफडीचें लोणचें करितात. कोरफडीच्या वरील पात्या सुकल्या कीं आंतून नव्या पात्या फुटून, ही वनस्पति सर्वकाळ ताजीतवानी राहते; ह्मणून हीस " कुमारी " हें नांव अगदीं अन्वर्थ आहे. कोरफड आढ्यास टांगून ठेवली तरी न सुकतां जशी-चीतशीच ताजी राहते, हा या वनस्पतींत मोठा चमत्कार आहे. हिच्या बुडाशीं अंकुर फुटून हिची वृद्धि होते. कित्येक ठिकाणीं कोरफडीचीं मोठमोठीं रानें असतात. कोरफडीच्या रसापासून ' येळ्या-बाळ' ह्मणजे काळा बोळ तयार करितात. हा बोळ—सारक, रेचक व आर्तवशुद्धिकर आहे.

कोरफड—शीतल, कडू, मंदगंधि, रसायन, अग्निदीपक, भेदक, मधुर, पुष्टिकर, बलकर, वृष्य; विषदोष, कफपित्तज्वर, कफ, पित्त, दमा. खोकला, प्लीहा कुष्ठ गुल्मवात, यकृत्, ज्वर, ग्रंथि, त्वग्दोष, विस्फोट, रक्तविकार, अग्निदग्धव्रण, रक्तपित्त यांचा नाश करितें. हिचें फूल—गुरु; व वात, पित्त, कृमि यांचा नाश करितें. ( १. ) विषमज्वरावर—कोरफडीचा कांदा दहा मासेपर्यंत घेऊन तो कोमट पाण्याशीं द्यावा; ह्मणजे वांति होऊन कफाशयाचें शोधन होतें व विषमज्वर दूर होतो. ( २. ) पानथरीवर—अ ग्रवीवर—कोरफडीच्या रसांत हळद घालून द्यावी. ( ३. ) खोकल्यास—कोरफड फुंगाड्यांत भाजून त्याचा रस व अडुळशाचा रस अथवा मध यांत पिंपळी व लवंगाची पूड घालून ती द्यावी. ( ४. ) कफ व खोकल्यास—कोरफडीचा गीर मध अ० सैंधव हळद, मिळवून द्यावा. ( ५. ) डोळे येतात त्यास—कोरफडीचा काप पाण्यांत धुवून त्या पाण्यांत तुरटीची लाही व अफू मिसळून तें पाणी गाळून पोतडीनें डोळ्यांवर घालावें. अ० कोरफड व चित्रकाचीं पानें एकत्र वाटून लेप करावा. ( ६. ) स्तनरोगावर—कोरफडीचा कांदा उगाळून त्यांत हळदीची पूड घालून स्तनावर लेप द्यावा. ( ७. ) वाघचवड्यास—कोरफडीचें पान हळद घालून ऊन्ह करून बांधावें. ( ८. ) अंगांत गर्मी, प्रमेह, कडकी, हाडीज्वर व रजायनें यांवर—कोरफडीच्या पातींतिल बलक सुमारें चार मासेपासून एक तोळापर्यंत घेऊन त्यांत जिऱ्याची पूड चार गुंजा व मिरपूड २ गुंजापर्यंत घालून तें द्यावें. ( ९. ) अग्निदग्धव्रणावर—कोरफडीचा गीर लावावा; ह्मणजे त्वरित दाह शमन होतो अ० कोरफडीचा गीर कपड्यांत घालून गाळून घेऊन, त्या बलकांत लोण्याची विघड मिळवून तो पिसानें अंगास लावावा. ( १०. ) क्षतांतील कृमि मरण्यास—

कोरफडीचा कंद गोमूत्रांत उगाळून दिवसांतून दोन तीन वेळ लावावा. ( ११. ) **कोरफडीचा पाक**—कोरफडीचा गीर पाण्यांत भिजूं घालून नंतर धुऊन वस्त्रावर पुसावा. नंतर इतर पाकाप्रमाणें त्याचा पाक करून तो सेवन करावा; ह्मणजे अंगातील गर्मी, अम्लपित्त, कडकी हीं नाहींशीं होऊन धातुपुष्ट होते. ( १२. ) **कानांचा अतिशय दाह झाल्यास**—कोरफडीचा बलक वरील बाजूनें कानावर ठेवावा, व वस्त्रगाळ केलेलें थोडें बलकाचें पाणी कानांत घालावें. ( १३. ) **कामलारोगावर**—कोरफडीच्या कांद्याचा रस काढून त्यांत तूप घालून नस्य करावें; ह्मणजे काविळीनें डोळे पिंवळे झाले तरी तिचा नाश होतो. ( १४. ) **डब्यावर**—काळा बोळ व डिकेमाली एकत्र करून तें पाजावें.

## ८८. कोरला. ( सं. कोविदार. )

**कोरला हा एक रानवृक्ष असून तो कांचनाच्या जातीचा आहे. याचीं पानें कांचनाच्या पानासारखींच असतात. ज्येष्ठ–आषाढाच्या सुमारास या झाडास कोंवळे पल्लव फुटतात, ते काढून विकावयास आणतात. ही भाजी निर्मळ असून खावयास रुचिकर आहे.**

**कोरला**—दीपन, तुरट, व्रणरोपण, संग्राहक, सारक, स्वादु आहे व पालेभाज्यांमध्यें उत्तम आहे. आणि मूत्रकृच्छ्र, त्रिदोष, शोष, दाह कफ, वायु यांचा नाश करितो याच्या फुलाचे गुण रक्तकांचनासारखे आहेत.

## ८९. कोरांटी. ( सं. कुरंटक. गु. कांटा अशेरियो. हिं. कटशरैणा. )

**हें फुलझाड तीन चार हात उंच वाढतें. याच्या सर्वांगास कांटे असतात. हींत झाडाच्या सादृश्यावरून पांढरी, पिंवळी, पारवी व तांबडी असे भेद आहेत. याच्या फुलास वास नसतो.**

**पांढरी कोरांटी**—कडू केश्य, स्निग्ध, मधुर, तिखट, उष्ण, दंतांना हितावह; व वलीपलित, कुष्ठ, वात, रक्तदोष, कफ, कंडु, विष, व दारुणा यांचा नाश करिते. **तांबडी कोरांटी**—कडू, वर्णकारक, उष्ण, तिखट; व शोथ, ज्वर, वातरोग, कफ, रक्तविकार, पित्त, आध्मान, शूल, दमा, व खोकला यांचा नाश करिते. **पिंवळी कोरांटी**—उष्ण, कडू, तुरट, अग्निदीपक; व वायु, कफ, कंडु, सूज रक्तविकार, त्वग्दोष यांचा नाश करिते. **निळी कोरांटी**—कडू, तिखट; वात कफ, सूज, कंडू, शूल, कुष्ठ, व्रण आणि त्वग्दोष यांचा नाश करिते. ( १. ) **मुलांस पडसें खोकला आल्यास त्यावर**—कोरांटीच्या पानांचा रस काढून मधाशीं द्यावा. ( २. ) **वीर्यपतनावर**—पांढरे कोरांटीच्या पानांचा रस, जिरें

घालून द्यावा. दि ७. ( ३. ) **पित्तास**—कोरांटीचा, काळ्यातुळसीचा व माक्याचा हे पाले एकत्र वाटून गाईचे दुधांत कालवून द्यावे. ( ४. ) **दाढ दुखेल तर**—पिंवळे कोरांटीचा पाला व अक्कलकाला एकत्र कुटून दाढेखालीं धरावा. ( ५. ) **तोंड आलें तर** पिंवळे कोरांटीचा पाला, जांभळीची साल व आंवळकाठी यांचा काढा करून गुळण्या कराव्या. ( ६. ) **गर्भधारणास**—कोरांटीची मुळी गाईचे तुपांत उगाळून ऋतुकाळीं द्यावी. ( ७. ) **दांतांतून रक्त येत असल्यास**—कोरांटीचा रस व मध दांतांस लावावा. ( ८. ) **दंतकृमीवर**—कोरांटीचीं पानें चावावीं. व दाढेखालीं धरावीं. ( ९. ) **वातरोगावर**—पिंवळी कोरांटी, देवदार सुंठ, यांचा काढा एरंडेल मिश्र करून द्यावा; ह्मणजे शरीर वायूनें जखडलें असेल, तरी नीट होऊन, तो शीघ्र व मंद—जसा पाहिजे तसा चालेल. ( १०. ) **सुजेवर**—कोरांटीच्या पाल्याचा रस विषमबाजूकडील कानांत पिळावा ( १२. ) **बाळंतरोगावर**--कोरांटीचा काढा करून त्यांत पिंपळीचें चूर्ण घालून तो घ्यावा. अ०कोरांटीचें मूळ चावून खावें; किंवा कोरांटीचा काढा करून रात्रभर ठेवून तो सकाळीं घ्यावा.

## ९०. कोलिंजन. ( सं. कुलिंजन. )

**आंबेहळदीसारखींच रानांत कोलिंजनांचीं झाडें होतात. याचें झाड आंबेहळदीपेक्षां किंचित् मोठें होतें. याच्या पानांचा वास मधुर असून मुंडल्याचा रंग पांढरा व तिखट असतो. गोमांतक व मलबार प्रांतांत हीं झाडें पुष्कळ होतात. याचे गड्डे सुकवून ठेवतात, त्यांस कोलिंजन ह्मणतात. कोलिंजनाच्या गड्याचे कापटे करून ते लोणच्यांत घालतात. कोलिंजन कांहींसें तिखट लागतें, त्यास कोष्ठ कोलिंजन असेंही ह्मणतात.**

**कुलिंजन**—तिखट, कडू, उष्ण, अग्निदीपक, रुचिकर, स्वर्य, हृद्य; व मुखकंठ, यांची शुद्धि करणारें, मुखदोष, कफ, खोकला, वायु, कफ यांचा नाश करितें. मोठें याहून गुणांनीं कमी आहे. ( १. ) **डांग्या खोकल्यावर**—याच्या मुंडल्यांची कढी करून द्यावी. अथवा त्यांचा रस काढून पाजावा. ( २. ) **चढलेलें मास्तक उतरण्यास**—कोलिंजनाचें चूर्ण करून तें नाकांत ओढावें; ह्मणजे शिंक येऊन मस्तक उतरतें. ( ३. ) **वायूनें अंग धरल्यास**-- कोलिंजनाचें चूर्ण अंगास चोळावें. ( ४. ) **स्वरभेदावर**--कोलिंजन तोंडांत धरून पाणी गिळीत जावें. ( ५. ) **मोडशीवर**--कोलिंजन व सैंधव, अमसुलांचे तेलांत कालवून मंदोष्ण करून, अंगास चोळावें; ह्मणजे मोडशी, खल्लीशूल ( हात, पाय, पोटऱ्या मांड्या, यांत होणारा शूल ) यांचा नाश होतो. (६.) **ओकारीवर**--कोलिंजनाचा

एक तोळा रस काढून, त्यांत निंबाचा रस १ तोळा व आल्याचा रस एक तोळा घालून दीड तोळा खडीसाखर घालावी व तें शिजवून ठेवावें. हें प्रतिवेळीं अर्धातोळा प्रमाणें दुवक्त-तीन दिवस द्यावें. (७.) **बहुमूत्ररोगावर**--कोलिंजनाचा अष्टमांश काढा करून दुवक्त घ्यावा. (८.) **मुलांच्या अतिसारावर**—कोलिंजन ताकांत उगाळून थोडा हिंग लावून कढी करून द्यावी. (९.) **स्वरभंगावर**—कोलिंजन तोंडांत धरून रस गिळीत जावा. (१०.) **मुखदुर्गंधि दूर होण्यास**—कोलिंजनाचें चूर्ण मधांत कालवून दांतांस लावीतजावें. (११.) **दंतरोगावर**—कोलिंजनाचें चूर्ण मधांत कालवून त्यानें दांत घांसावे.

## ९१. कोशिंब. (सं. कोशाम्र.)

**कोशिंबाचीं झाडें मोठमोठीं होतात. याची उत्पत्ति डोंगराळ प्रदेशांत होते. कोंकणप्रांतीं हीं झाडें पुष्कळ होतात. याचें लांकूड चिवट असतें. याच्या लांकडाचा गाभा तांबूस रंगाचा असतो. याच्या बियाचें तेल काढतात. तें कडू, मधुर, बल्य, पथ्य, रुचिकर, पाचक, सारक व कृमि, कुष्ठ व्रण याचें नाशक आहे.**

**कोशिंब**—आंबट, गुरु, शोषकर, पित्तल, कफकर, कोष्ठशोधक; व वायु, कुष्ठ, अर्श, सूज, पित्तव्रण, रक्तपित्त, रक्तरोग यांचा नाश करितो. **यांचें पक्कफळ**—लघु, अग्निदीपक, रुचिकर, स्निग्ध, उष्ण, मधुर, बलकर हृद्य, वृष्य; व कफवातविनाशक आहे. (१.) **जुलाबास**—कोशिंबाचें तेल ऊन्ह पाण्यांतून द्यावें (२.) **खरूज, व्रण व कुष्ठावर**—कोशिंबाचें तेल लावावें. (३.) **कुसळ (कुसरडा) लागल्यास**—कोशिंबाच्या सालीचा रस काढून त्यांत समुद्रफळ उगाळून लेप करावा

## ९२ कोष्ठ. (सं. गु. कठ. हिं. कोष्ठ.)

**याची उत्पत्ति काश्मीर देशांत होते. पुष्करमूल म्हणून जी औषधि आहे ती याचाच एक प्रकार आहे.**

**कोष्ठ**—उष्ण, तिखट, कडू, गोड, वृष्य, शुक्ल, रसायन, कांतिकारक, लघु, वातकफनाशक; व कुष्ठ, विष विसर्प, कंडू, दद्रु, त्रिदोष, पामा, रक्तदोष खोकला, वांति तृषा यांचा नाश करितें. हें लेपानें वातव्याधिनाशक आहे. (१.) **मस्तकसंबंधीं पीडेवर**—कोष्ठ व एरंडमूळ कांजींत वाटून लेप करावा. (२.) **गुल्मावर**—कोष्ठ सजीखार, केतकीचा क्षार हीं तेलांत मिश्र करून द्यावीं. (३.) **खवड्यावर**—कोष्टाचें चूर्ण खापरांत भाजून तेलांत कालवून लेप करावा. (४.) **वातव्याधीवर**—कोष्ठ उगाळून अंगास लेप करावा.

## ९३. कोहोळा. ( सं. कूष्मांड. )

कोहोळ्याचा वेल गिराप्रमाणेंच असतो. याचें फळ लहान भोपळ्या एवढें असतें. कांहीं कोहाळे हात दीड हात लांब असतात. चांगली जमीन असल्यास एका वेला पासून पन्नास साठ देखील कोहाळे हो तात. कोहाळ्याचा पाक होतो; तो पौष्टिक आहे. याची भाजी व सां डगे करितात. कोहळा फार थंड आहे. जून वांगें आणि कोंवळा को- होळा हीं खाऊं नयेत; तीं विषासारखीं बाधक होतात याविषयीं वचन आहे.—" वृंताकं बहुबीजानां कूष्मांडं कोमलं विषम् " कोहळीं एक वर्षपर्यंत टिकतात.

कोहळा वृष्य, पुष्टिकर, धातुवर्धक, बस्तिशुद्धिकारक, बलकर, अतिगोड, शीतळ,गुरु, रूक्ष, सारक, हृद्य, कफकर व मूत्राघात, प्रमेह, मूत्रकृच्छ्र, अश्मरीन तृषा, अरुचि, वातपित्त, रक्तविकार, वायु व रेतोविकार यांचा नाश करितो. तो कोंवळा असतां—आतिशीत, दोषकर, पित्तहर आहे. तोच जून असतां—कफकारक आणि पिकला असतां—किंचित् शीतळ, दीपक, लघु, स्वादु, खारट; बस्तिशुद्धिकार क सर्व दोषनाशक व पथ्य आहे; आणि त्याचा गीर—मधुर, बस्तिशुद्धिकारक, वृष्य , पित्तनाशक आहे ( १. ) **स्थावर व जंगम सर्व विषावर**—कोहळ्याचा रस काढून पाजावा किंवा तुकडा खावयास द्यावा. ( २. ) **मद्यावर व कोद्रूचे** ( हरि काचे ) **विषावर उतार**—कोहळ्याचा रस गूळ घालून पाजावा.( ३. )**अपस्मा. रावर**—कोहळ्याच्या गिराच्या रसांत ज्येष्ठमध उगाळून प्यावें. ( ४. ) **उन्मा. दावर**—कोहळ्याच्या रसांत कोष्ठकोलिंजनाचें चूर्ण मध घालून द्यावें. ( ५. ) **मां- डपुळीस**—कोहळा किसून त्यांत मोठें मीठ बारीक करून मिसळावें व पुळीवर बांधावें. ( ६. ) **काविळीस**—कोहळीचा पाला वाटून त्यांत हळदीची पूड मिळवून तो दह्याबरोबर द्यावा. दि. ७. ( ७. ) **अम्लपित्तावर**—कोहळ्याचे रसांत साखर घालून द्यावी. ( ८, ) **रक्तशूलावर**—कोहळ्याच्या गिराच्या रसांत २ तोळे लाखेचें चूर्ण घालून द्यावें. ( ९. ) **श्वासकासावर**—कोहळ्याच्या मुळाचें चूर्ण कोमट पाण्याशीं प्राशन करावें.( १०. )**शूलावर**—कोहळा सोलून, फोडी उन्हांत वाळवून मडक्यांत घालून झांकूण ठेवून चुलीवर ठेवून खालीं जाळ लावून, राख न होतां निखारे होत तों पर्यंत जाळून, पाण्यानें विझवून थंड झाल्यावर चूर्ण करून दोन मासेप्रमाणें घेऊन, तितकेंच सुंठीचें चूर्ण मिश्र करून उन्ह पाण्याबरोबर नित्य भक्षावें; म्हणजे असाध्य शूलाचाही नाश होईल. ( ११. ) **अश्मरी व शर्करा** यांवर—कोहळ्या चा रस, हिंग व जवखार घालून द्यावा.

९४. कोळसुंदा (सं. कोकिलाक्ष. गु. एखरो. ( हिं. (तालीमखाना. )

कोकणांत व इतर ठिकाणीं कोळसुंदा, शेताच्या बाजूस व ओहोळाच्या कांठीं होतो; तेथें गुरें देखील हा खात नाहींत. हें झाड सुमारें दोन अडीच हात उंच वाढतें. याच्या कोंवळया पाल्याची भाजी करितात. याचीं पानें लांबट असून दरएक पानाखालीं एक एक कांटा असतो. या झाडास कोलिस्ता, विखारा, कोळसा, असेंही ह्मणतात बाल जें बीं येतें त्यास तालीमखाना ह्मणतात. हें बीं पाण्याचा स्पर्श झाला असतां बुळबुळीत होतें.

(१.) अतिसारावर—तालिमखाना दह्यांत वांटूनद्यावा (२.) क्षतकासावर—तालीमखान्याचें चूर्ण, मध व साजूक तूप यांत द्यावें. ( ३. ) धातुपुष्टतेस—तालीमखान्याचें चूर्ण, साखरेबरोबर खावें व वर धारोष्ण दूध प्यावें. अथवा तालीमखाना, मुसळी, गोखरू यांचें चूर्ण गाईचे दुधांत साखर टाकून त्यांतून द्यावें ( ४. ) प्रमेहावर—तालिमखाना दुधांत शिजवून द्यावा. ( ५. ) योनिसंकोच होण्यास—तालिमखान्याचे काढ्यांत त्याचेंच चूर्ण घालून आंतून लेप द्यावा. (६.) पुष्टिदायक पाक—तालिमखाना, गोखरू, कवचबीज, बळबीज, काळीमुसळी, शतावरी, सालंमिश्री, पंजाबीमिश्री, पांढऱ्या गुलबशीचा कांदा किंवा चोपचिनी यांची पूड करून, तूपांत साधारण तळून साखरेचा पाक खवा घालून तयार करून त्यांत घालावी व सारखी घोंटून एकत्र करून त्यांत बदाम चारोळी, पिस्तें, किसमिस घालून अक्रोड, वेलची, केशर, लवंग, जायफळ, पत्री, दालचिनी, गुळवेलीचें सत्व वगैरे घालून वड्या करून ठेवाव्या. हा नित्य २ तोळे खाऊन वर गाईचें निरसें दूध प्यावें

९५. खजूर ( सं. खर्जूर. गु. खजूरीओ. हिं. खजूरी. )

खजुराचें झाड शिंदीप्रमाणें उंच वाढतें. खजुराचीं झाडें या देशांत पुष्कळ आहेत; परंतु त्यांपासून खजूर उत्पन्न होत नाहीं. त्यांस खजुरासारखीं फळें येतात; पण लोकांस पिकवण्याची कृती माहित नसल्यामुळे किंवा इकडील हवा योग्य नसल्यामुळें तीं पिकत नाहींत. अरबस्थान व इराण येथें खजूर पुष्कळ पिकतो. जी फळें अर्धकचीं वाळवितात त्याच खारका होत. आरबलोक खजूर खाऊनच पुष्कळ दिवस काढतात. खजूर हा पाचक व पौष्टिक आहे. खजुराच्या बियांचें तेल काढतात, तें जाळण्याच्या व औषधांच्या उपयोगीं पडतें बियांची पेंड गुरांस घालतात. खजुराच्या झाडाच्या पातीच्या केरसुण्या, आथऱ्या इत्यादि होतात. लांकूड घरकामास उपयोगीं पडतें. उन्हां

ऱ्यांत खजुराचें सरबत करून पितात. पाणी त्यांत मिळाल्यानें तो समशीतोष्ण होतो. खारकेची बी, मुलास बाळघुटींत उगाळून देतात

**खजूर ( पेंडखजूर )**—वृष्य, स्वादु, शीत, गुरु; व अग्निमांद्य, रुचि, धातुवृद्धि तृप्ति, पुष्टि, यांना करणारा; हृद्य, बल्य, दुर्जर, स्निग्ध, पाककाळीं व रसकाळीं मधुर; व रक्तपित्त, पित्त, दाह, श्वास, कफ, श्रम, क्षतक्षय, विष, तृष्णा, शोष व आम्लपित्त, यांचा नाश करितो. **खिलेमानी खारीक**-भ्रांति, श्रम, मूर्च्छा, रक्त-पित्त, दाह यांचा नाश करिते. ( १. ) **रेच होण्यास**---खजूर रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं कुसकरून तें पाणी प्यावें; म्हणजे रेच होतात. ( २. ) **मूळव्याधीवर**----खारकेची बी बारिक करून धुरी द्यावी. ( ३. ) **आगपैणीवर**--खारकेची बी जाळून तिची राख कापूर व तूप हीं खलून त्याचा लेप करावा. ( ४. ) **कपाळ दुखत असल्यास**—खारकेची बी उगाळून डोक्यावर घालावी. ( ५. ) **घोड्यास सर्दी झाल्यास**--खारकेच्या बीचें चूर्ण करून तें पिठांत घालून द्यावें. ( ६. ) **आमवातावर**—पावशेर खजूर कोळून पाजावा. ( ७. ) **धातु पुष्टतेस व पित्त शमन होण्यास**—खारकेंतील बिया काढून साधारण कुटाव्या. त्यांत बदाम, बेदाणा, पिस्ते, चारोळ्या, खडीसाखरेची पूड वगैरे मसाला एकत्र करून हें मिश्रण भिजेल इतक्या बेतानें पातळ केलेल्या तुपांत भिजत घालावें. सतत आठ दिवस चांगलें मुरल्यावर नित्य सकाळीं २ तोळे सेवन करावें. ( ८. ) **हिंव तापावर**--खारकेची बी व आघाड्याची मुळी थंडपाण्यांत गंधाप्रमाणें उगाळून विड्याच्या पानास चार गुंज चुन्याप्रमाणें लावून, तीन विडे, सुपारी, लवंग, वेलची, कात वगैरेसह तयार करावे. ताप येण्यापूर्वी एकक घटकेच्या अवकाशानें एकेक विडा खावा. याप्रमाणें तीन दिवस करावें; म्हणजे पाळीनें येणारा ताप जातो ( ९. ) **जीर्णज्वरावर**—खारीक, सुंठ, द्राक्षें, साखर व तूप हीं दुधांत घालून तें दूध कढवून द्यावें. ( १०. ) **दाह होऊं लागल्यास**—अर्धापाव खजूर पाण्यांत कोळून पाजावा. ( ११. ) **चेतना प्राप्त होण्यास**----लोणी व खारका खात जाव्या. ( १२. ) **धनुर्वात व रक्तपितीवर**—खजुराचा बलक काढून त्यांत एरंडेल घालून द्यावें. ( १३. ) **मुलास शक्तिवर्धक भक्ष्य**—उत्तम खजूर ६ मासे पासून ३ तोळेपर्यंत मुलाचे शक्तीप्रमाणें घेऊन स्वच्छ पाण्यानें धुऊन पुसावा व त्यांतील आठ्या काढून थोडें दूध घेऊन त्यांत तो खजूर कांहीं वेळ भिजत घालावा. नंतर चांगला कुचलुन फडक्यांत गाळून तो रस दिवसांतून तीन वेळप्रमाणें पाजावा. हें भक्ष्य एक महिन्याहून अधिक वयाचे मुलास देण्यास योग्य आहे. मात्र प्रतिवेळा रस नूतन काढून घेत जावा. ( १४. ) **थंड हवा असेल किंवा मुलांस सर्दीचा विकार असेल तेव्हां मुलांस देण्याचें भक्ष्य**—चांगली खारीक घेऊन ओल्या फडक्यानें स्वच्छ पुसून नंतर त्यांतील बी काढून टाकावी, व ती गंधाप्रमाणें दुधांत

उगाळून मुलांस खाऊं घालावी. किंवा त्यांतच आणखी दूध घालून पातळ करून पाजावें. हें औषध लहान मुलांस देऊं नये, प्रौढांस मात्र द्यावें. लहान मुलांस दिल्यानें पोटांत जाळें बांधलें जातें व कोठ्यांत गरमी होते. ( १५. ) **मद्यावर उतार**--खजूर भिजूं घालून कोळून गाळून द्यावा ( १६. ) **प्रदरावर**—खारकेंतील बिया काढून कुटून तुपांत तळून त्यावर गोपीचंदनाची पूड घालून द्यावी. ( १७ ) **रक्तपित्तावर**—खजूर मधाशीं खावा.

## ९६. खटखटी.

**खटखटीचें झाड दोन तीन पुरुष उंच वाढतें. यांचीं पानें आकारानें धामणीच्या पानांसारखीं असून त्यांहून बारीक असतात. या झाडास चारपांच फुलांचा एक तुरा अशीं फुलें येतात. खटखटीची फळें खाण्यास गुळचट आहेत.**

( १. ) **पुष्टतेस**--खटखटीचें मूळ दुधांत वाटून द्यावें. ( २ ) **आंवरक्त पडतें त्यावर**--खटखटीचें मूळ दुधांत अगर पाण्यांत वाटून द्यावें. ( ३. ) **वातरक्तावर** रोग्यानें खटखटीचीं मुळें नेहमीं जवळ बाळगावीं; खटखटीची काठी हातांत द्यावी; सुजीवर व गांठीवर खटखटीचें मूळ उगाळून लावावें; आणि नित्य दोहीसांज गाईच्या पावशेर दुधांत खटखटीचें मूळ ३ मासे, पांढऱ्या गुलबाशीचा कंद दोन तोळे व गोयेटीचें मूळ ६ मासे, उगाळून पोटांत द्यावें. दि० ४२. यानें वातरक्त दूर होतें. ( ४. ) **अतिसारावर**—खटखटीचें मूळ ताकांत वाटून द्यावें.

## ९७. खरबूज. ( सं. मधुपाका, मधुफला. )

**कलिंगडाप्रमाणेंच याचा वेल वाढतो. खरबूज हें फळ वाटोळें असून त्याचा बाहेरील रंग तांबूस असतो. खरबूज खाण्यास चांगलें लागतें. याची भाजीही करितात. ज्या खरबुजाचा आंतील रंग हिरवा असतो, त्यास तरटी असें ह्मणतात. हें खाण्यास फार चांगलें असतें. खरबुजें जास्त खाण्यांत आलीं कीं, उन्हाळयाचा उपद्रव होतो.**

( १. ) **उन्हाची झळा लागली तर**--खरबुजाच्या बिया वाटून डोकीवर घालाव्या व त्यांचा रस अंगास चोळावा.

## ९८. खरशिंग. ( सं० मेषशृंगी. )

**खरशिंगाच्या झाडास "मेंढशिंग" असेंही ह्मणतात. हा वृक्ष मोठा होतो. कोंकणप्रांतीं हे वृक्ष पुष्कळ ठिकाणीं होतात. याचीं पानें कडूनिंबाच्या पानांसारखीं असून त्यांहून लांबट असतात. यास चापट एक बोट रुंदीच्या व सुमारें पाऊण हात; लांबीच्या शेंगा येतात. या शेंगा व या झाडाचें पंचाग हें कडू असतें. याचें लांकूड साधारण**

कामास उपयोगीं आहे. लांकडाचे मृदंग व तबले चांगले होतात. खरशिंग हा कडू, वातहारक; व कृमि, कुष्ठ, वायु यांचा नाशक आहे.

( १ ) नळ फुगल्यास व पोटशूळावर—याचा पाला अगर साल ठेंचून तिचा रस पाजावा. ( २. ) कृमींवर—याच्या पानांचा अगर सालीचा रस द्यावा. साल वाळली असल्यास काढा करून द्यावा. ( ३. ) खरूज व खवडे यांवर—खरशिंगाच्या लांकडांचें पाताळयंत्रानें तेल काढून लावावें.

## ९९. खरशिंगी. ( स खरशृंगिका. )

हें झाड बरेंच मोठें होतें. याचीं पानें आकारानें टेंटूच्या पानांसारखीं असतात. यास हात सवा हात लांब व आंगठ्याएवढ्या जाड शेंगा येतात. या शेंगास खरशेंगा असें ह्मणतात. यांस उग्रट वास येतो. यांचे तुकडे करून लोणच्यांत घालतात या शेंगांची भाजीही होते.

( १. ) खरजेस—खरशिंगीच्या झाडाच्य सालीचें पाताळयंत्रानें तेल काढून तें लावावें

## १००. खसखस. ( सं. खाखस )

खसखशीचें झाड तीन चार हात उंच वाढतें. हीस लाल रंगाचीं फुलें व बोंडें येतात. बोंडांत बीं असतें, त्यास खसखस ह्मणतात. खसखशीच्या बोंडांस शस्त्रानें चिरण्या पाडून त्यांतून जो चीक निघतो त्याची अफू ( अहिफेन ) होते. अफू ही मादक आहे. हिची गणना उपविषांत आहे. अफू फार खाण्यांत आली कीं प्राणनाश होतो. परंतु ही बेतानें दिली असतां चांगली उपयोगीं पडते; भेळ केलेली मात्र ती नसावी. खसखशीच्या झाडापासून अफू होते, परंतु खसखशीच्या अंगीं मादकपणा नसतो. खसखशीच्या फळावरील त्वचेस "पोस्त' असें ह्मणतात. खसखस ही पौष्टिक आहे. हिचा पक्वान्नांत व इतर पदार्थांकडे पुष्कळ उपयोग होतो. कोंवळेपणीं खसखशीच्या पाल्याची मोकळी अथवा आटींव भाजी चांगली होते.

खसखशीचें झाड—ग्राहक, बलकर, गुरु, वृष्य, कफप्रद, पाककाळीं मधुर वीर्यप्रद, कांतिकारक, बलकर; व वात, पित्त, यांचा नाश करणारें आहे. याचें फळ रूक्ष, ग्राहक, रक्तशोषक आहे. फळाची साल शीतळ, लघु, कडू, ग्राहक, तुरट वातकारक, रुच्य, सप्तधातु-शोषक, पुंस्त्वनाशक, रूक्ष मदकर, अग्निवर्धक, व मोहक आहे. खसखस—कफकारक, बल्य, वृष्य, गुरु, मधुर, ग्राहक, व वातनाशक आहे. अफू— जारण, मारण, धारण व सारण अशी चार प्रकारची आहे. ती वृष्य बलकर, ग्राहिणी, सात धातूंचा शोष करणारी, वातपित्तकर, आनंदकारक, मादक वीर्यस्तंभकर, कडू, मधुर आहे; व सन्निपात, कृमि, कफ, पांडु, क्षय, मेह, दमा,

खोकला, प्लीहा, धातुक्षय, यांचा नाश करिते. जी श्वेतवर्ण असून अन्नाला जिरविते तिला जारण ह्मणतात; व काळी असते ती मृत्युकारक ह्मणून मारण ह्मणतात. जी पिंवळी ती जरानाश करणारी तिला धारण ह्मणतात; व चित्रवर्ण ती मळाचें सारण करिते ह्मणून तिला सारण ह्मणतात. ( १. ) **आमातिसारावर**—खसखस दह्यांत वाटून द्यावी. ( २. ) **मुलांस आंव पडते त्यास**—खसखशीची धुली करून द्यावी. ( ३. ) **सांधा लचकलो त्यास**—खसखशीच्या बोंडांच्या काढ्यानें तास दोन तास शेकावें. ( ४. ) **सूज व पोटफुगी व अंगांत वारा मारीत असल्यास त्यावर**—खसखशीचीं फुलें व बोंडें पाण्यांत उकळून त्या पाण्याचा शेक द्यावा. ( ५. ) **पुष्टि व बळ** येण्यास—खसखस, बदामगर व चारोळ्या समभाग घेऊन बारीक वाटून गाईचे दुधांत कालवून आटींव क्षीर करावी. तींत उतरतेवेळीं २ तोळे साजूक तूप व तितकीच खडीसाखर घालून निवत आली ह्मणजे २ मासेपर्यंत गुळवेलीचें सत्व घालून सेवन करावी. याप्रमाणें सतत कांहीं दिवस केल्यानें बळ व पुष्टि उत्तम प्रकारानें प्राप्त होते. हें औषध शक्तिहीन मुलांसही देण्यास फार उत्तम आहे. ( ६. ) **दारुण** ( केंसांतील जमीन कठीण होऊन बारीक पुरळ उठतो ) **रोगावर**—खसखस दुधांत वाटून मस्तकावर लेप करावा. ( ७ ) **मुलांस शक्तिवर्धक भक्ष्य**—खसखस गाईचे दुधांत बारीक वाटून त्यांत आणखी दूध व थोडा गूळ किंवा खडीसाखर घालून शिजवून राबडी तयार करावी व चांगली निवून थंड झाल्यावर खाऊं घालावी. हें भक्ष्य दोन महिन्यांहून अधिक वयाचे मुलांस देण्यास योग्य आहे; व ज्या मुलास हगवणीचा उपद्रव असेल त्यास तर फारच हितकारक आहे. ( ८. ) **अर्धांगवायूवर**—खसखशीचें तेल खोबऱ्याच्या तेलाबरोबर अंगास चोळावें.

## अफूचे उपयोग.

**( १. ) आतिसार व मोडशी** यांवर—**अफू व केशर समभाग घेऊन खलून अर्ध गुंजप्रमाणें गोळी मधाशी द्यावी; ह्मणजे मोडशी व सर्व प्रकारचे अतिसार दूर होतात. तसेंच गुंजभर अफू शेळीच्या दुधांत दिली असतां, त्यानेंही आतिसार दूर होतात.**

( २. ) **मोडशीवर**—खोबऱ्याच्या तुकड्यावर छिद्र करून त्यांत २ गुंजा अफू घालून तो तुकडा निखाऱ्यावर भाजावा व खावयास द्यावा; ह्मणजे मनुष्य सहसा दगावणार नाहीं. ( ३. ) **पडशावर**—कागदास थोडी अफू लावून त्याची विडी करून ओढावी. ( ४. ) **डोकें दुखत असल्यास**—मस्तकावर अफूचा लेप करावा. ( ५. ) **अंगास कंडू सुटली असतां**—तेल, मेण व अफू एकत्र करून

लावावी. ( ६. ) **डोळे येतात त्यावर**—अफू व दांतवण यांचा लोखंडी पात्रांत निंबाच्या रसांत खल करून त्याचा लेप करावा. ( ७. ) **अतिशय घाम येत असल्यास**—त्यावर किंचित् अफू खावयास द्यावी. ( ८. ) **अफू**—ही स्तंभक आहे. स्तंभनार्थ—ही जायफळांत घालून, ती उंबराच्या, वडाच्या किंवा बाभळीच्या झाडास भोंक पाडून त्यांत ठेवतात व तें भोंक बंद करून कांहीं दिवसांनी ती बाहेर काढून तिच्या गोळ्या करून शक्ति पाहून देतात. साखरेबरोबरही अफू घेतात व वर दूध प्राशन करितात. तसेंच खशखशीचीं बोंडें व सुंठ यांचा षोडशांश काढा करून त्यांत गुळ घालून घेतात. ( ९. ) **पक्कातिसारावर**—खापरांत मंदाग्नीवर अफू भाजून खाल्ली असतां कसाही पक्कातिसार असला तरी शमविते. ( १०. ) **लहान मुलांस पडसें व सर्दी फार झाली तर**—डोक्यावर व नाकावर अफूचा लेप करावा. पोटावरही पोटांतील विकृतीस लेप करावा. ( ११. ) **अतिसारावर**—कांद्याच्या रसांत अफू मिळवून द्यावी. ( १२. ) **बदावर**—आधीं जळवा लावून रक्त काढावें व कडूनिंबाचा पाला बांधावा. नंतर दुसरे दिवसपासून अफूच्या बोंडांचा काढा करून त्यांत वस्त्र भिजवून तीन चार दिवस शेकावें; ह्मणजे दु:ख जलद नाहींसें होते. ( १३. ) **नारूवर**—सर्पाची मेंग व अफू यांची वडी करून बांधावी. ( १४. ) **नासुरास**—मनुष्यांचीं नखें जाळून त्या राखेंत अफू एक वाल मिळवून तें मिश्रण नासुरांत भरावें. ( १५. ) **आमातिसार व रक्तातिसार यांवर**—अफू निंबूचे रसांत कालवून ती दुधांत टाकून प्यावी. दि० ३

## अफूवर उतार.

( १. ) **मोहरीचें पीठ**—वगैरे वमन होणारीं औषधें द्यावींत. ( २. ) **रिठ्यांचें पाणी**—करून प्यावयास द्यावें. अफूच्या पावशेर गोळ्यांवर रिठ्याचे पाण्याचे ५।७ थेंब पिळले असतां ती अगदीं निस्सत्व होते. (३.) **तीन किंवा चार मासे हिंग**—ताकांत अगर पाण्यांत वाटून द्यावा. किंवा नुसता हिंग खावयास द्यावा. अफूच्या डबींत हिंगाचा खडा ठेविला कीं अफू निस्सत्व होते. ( ४. **तुपांत टांकणखार व मोरचूद**—अ० नुसता टांकणखार घालून पाजावा; ह्मणजे उलटी होऊन अफू पडेल. ( ५. ) **तुरटीचें चूर्ण**—व कापशीच्या बियांचें चूर्ण एकत्र करून भक्षण केल्यानें अफू उतरते. ( ६. ) **कांगोणीच्या** वेलीच्या पानांचा रस पाजावा. ( ७. ) **डोरलीचा** रस दुधांत घालून द्यावा. ( ८. ) **वेखंड** व सैंधव एकत्र करून द्यावें. ( ९. ) पिंपळी व गेळफळ द्यावें. ( १०. ) **झेंडूच्या** पाल्याचा रस काढून पाजावा. ( ११. ) थोडा **मोरचूद** भाजून निंबुटींत घालून चोखावा. ( १२. ) **तांदुळज्याच्या** मुळ्या पाण्यांत वाटून तें पाणी द्यावें. ( १३.) **उटकटारीची मुळी** पाण्यांत वाटून द्यावी. ( १४, ) **गुळवेलीच्या** काड्यांचा रस

काढून पाजावा. ( १५. ) **किंजळीच्या** झाडाच्या पानांचा रस काढून द्यावा. ( १६. ) **देवकापशीच्या** पाल्याचा रस द्यावा. (१७.) **कडूनिंबाचे** पाल्याचा अर्क द्यावा. ( १८. ) **आंबाडीच्या** पानांचा रस द्यावा. ( १९. ) **चिंचेच्या** पाल्याचा रस द्यावा. ( २०. ) **शिताफळीच्या** बियांतील मगज पाण्यांत वाटून पाजावा. ( २१. ) **लहान मुलास** अफू चढल्यास त्यावरः—कांदा फोडून त्याचा वास द्यावा. किंवा कोरा देशी कागद पाण्यांत कोळून पाजावा. गर्भिणीनें अफू किंवा अफूमिश्रित औषध सेवन करूं नये.

### १०१. खाजकोलती. ( सं. धूम्रपुष्पा. )

**खाजकोलतीचीं झाडें लहानसर असतात. हीं पर्जन्यकाळीं उगवतात. खाजकोलतीचें पान मोठें असून हें पान अंगास लागलें तर अतिशय आग होते. या पानावर बारीक कुसें असतात. हीं पानें काळसर रंगाचीं असतात.**

( १. ) **कोल्ह्याचे बिषावर**—खाजकोलतीचें मूळ ऊन्ह पाण्यांत उगाळून द्यावें. ( २. ) **नारूवर**—खाजकोलतीचें मूळ ऊन्ह पाण्यांत उगाळून नारूवर लेप करावा. नारू बाहेर येऊं लागला ह्मणजे तो वातीस गुंडाळावा. नंतर दुसरे दिवशीं जो तंतु बाहेर येईल त्यावर खाजकोलतीचें मूळ ४।५ वेळ लावावें. मग तंतूवर विंचवाची नांगी मारवावी; ह्मणजे त्वरित सर्व नारू बाहेर येईल. ( ३. ) **नायट्यावर**—खाजकोलतीची मुळी तुळसीच्या रसांत उगाळून लावावी.

### १०२. खिरणी. ( सं. क्षीरिका. गु. रायणी. )

**खिरणीस रांजणी असें ह्मणतात. खिरणीचीं झाडें गुजराथ प्रांतांत फार होतात. हीं झाडें मोठीं होतात. खिरणीचीं पानें बकुळीच्या पानाएवढीं असतात व फळें कडूनिंबाच्या निंबोळ्यांप्रमाणें असतात या फळांत चीक असतो. हें फळ खाण्यास मधुर आहे; परंतु फारच उष्ण आहे. खिरणीचें लांकूड कठीण व चिवट असतें; ह्मणून रंगारी लोक, रंगविलेलें कापड बडविण्याकरितां त्याचे सोटे करितात.**

**खिरणी**—मधुर, गुरु, तर्पण, वृष्य, स्थूलताकारक, हृद्य, शीतल, ग्राहक, स्वादु, तुरट, पाककाळीं आंबट, धातुवर्धक, मलस्तंभक, रुचिकर, पौष्टिक; व त्रिदोष कृमि, मूर्च्छा, मोह, मद, तृषा, मेह, क्षतक्षय, रक्तपित्त, दाह, पित्त, यांचा नाश करिते. हिचें फळ-तुरट, स्निग्ध, हृद्य, गुरु, स्वादु, बलकर, शीत; व तृषा, मूर्च्छा, मद, भ्रांति, क्षय, त्रिदोष व रक्तदोष यांचा नाश करितें. ( १. ) **अपस्मारावर**—खिरणीच्या झाडावरील बांदें, फोपाव्यांत भाजून त्याचा रस काढून त्यांत मध व पिंपळीचें चूर्ण घालून द्यावें. ( २. ) **वातपित्तप्रदर व रक्तपित्तावर**—खिरणी

व कवठ यांचा पाला तुपांत भाजून त्याचा कल्क द्यावा. ( ३. ) ऋतुप्राप्तीस— खिरणीचे बियांतील मगज काढून त्याची पोटळी धारण करावी.

### १०३. खिळखिळा.

हें झाड सुमारें पुरुषभर उंच होतें. याचीं पानें कढिनिंबाच्या पानांसारखीं असतात. पानांचा रंग गर्द हिरवा असतो. खिळखिळ्याचीं झाडें विशेषेंकरून डोंगराळ प्रदेशांत उत्पन्न होतात. कोंकणांत याची उत्पत्ति विशेष होते.

( १. ) महारोग व भूतबाधा यांवर – खिळखिळीच्या पाल्याची अंगास धुरी द्यावी.

### १०४. खुरासनी ओंवा. ( सं. खुरासाना. गु. खुरासानी यवान. हिं. खुरासानी अजवाईन )

खुरासनी ओंवा हा खुरासन व यमान या पर्शियादेशांतील प्रांतांत पिकतो; त्यावरून हें नांव यास प्राप्त झालें आहे. हें बीज चपटें व बारीक असतें. हें ओंव्याइतकें तिखट नसतें. यास किंचित् तिखटपणा असतो. हें पर्शियांतून या देशांत येतें. याचा वैद्यकांत बराच उपयोग सांगितला आहे.

खुरासनी ओंवा—तिखट, रुक्ष, पाचक, ग्राहक, उष्ण, मादक, गुरु, वातकर व कफनाशक आहे. बाकीचे गुण ओंव्याप्रमाणें आहेत. ( १. ) विषमज्वरावर— तीन मासे खुरासनी ओंवा व ९ मासे ज्येष्ठमध यांचा काढा करून तो ताप येण्यापूर्वी द्यावा.

### १०५. खुळखुळा. ( सं. शणपुष्पिका. )

जशीं तागाचीं झाडें असतात तशींच खुळखुळ्याचीं झाडें असतात. यांत लहान व मोठी अशा दोन जाती आहेत. खुळखुळ्याचें झाड पुरुषभर उंच वाढतें. यास तागाच्या फळाप्रमाणें फळें येतात, व तीं वाळल्यावर खुळखुळ वाजतात; म्हणून यास खुळखुळा हें अन्वर्थ नांव मिळालें आहे. खुळखुळा हा कडू, वांतिकारक आणि रसबंधक आहे; व अपस्मार, भूतबाधा, कंठरोग, हिक्का, श्वास, यांचा नाश करितो. यास रानटी लोक "घांटसर्प" असें म्हणतात. क्वचित् काळा खुळखुळाही असतो.

( १. ) अपस्मारावर—खुळखुळ्याच्या फळांचा काढा अथवा धुरी द्यावी. ( २. ) घांटसर्पावर—खुळखुळ्याचीं फळें चिलमींत घालून ओढावीं; म्हणजे ताबडतोब घशांत भरलेला कफ मोकळा होऊन गुण येतो. ओढण्याची शक्ति नस-

त्यास दुसऱ्यानें ओढून त्याच्या नाकांत व तोंडांत धूर सोडावा. ( ३. ) **भूतबाधा झाल्यास**—खुळखुळ्याच्या फळांची धुरी द्यावी. ( ४. ) **नाकांत पीनस अथवा व्रण झाल्यास**—खुळखुळ्याच्या पानाचा रस नाकांत पिळावा.

### १०६. खैर. ( सं खदिर. गु. खेर. हिं. खदिर. )

हा अरण्यवृक्ष आहे. सह्याद्रीच्या खालच्या प्रदेशांत याचीं रानें पुष्कळ आहेत. यास बारीक व कठीण कांटे असतात. याचीं पानें शमीच्या पनासारखीं असतात. खैराचें लांकुड इमारतीचे कामास टिकाऊ असते. यापासून काथ उत्पन्न होतो. याचें लांकूड रेतींत कितीही वर्षें असलें तरी तें कुजत नाहीं. सोटे, तंबूच्या मेखा वगैरे या लांकडाच्या करितात. खैराच्या लांकडाचा गाभा फार कठीण असतो, ह्मणून सुतार व लोहार, हत्यारांस त्याचा दांडा घालतात. उसांचा रस काढावयास मजबूद चरक हवे असल्यास याचेच होतात. खैरापासून काथ करण्याची कृति अशी आहे कीं, जून झालेला चांगला खैर पाडून तो तोडतात. नंतर यावरील साल तासून काढतात. व मधील गाभ्याचे बारीक तुकडे करून ते एका डेऱ्यांत भरितात, मग भट्टी लावून त्यांचा रांधा करून काथाच्या वड्या करितात. इमारती वगैरे बांधतात तेव्हां काथाचें पाणी करून तें पाणी अथवा खैराचें ओलें लांकूड सालासह बारीक फोडून शिजवून अर्क काढून तो अर्क, चुना करितात त्यांत घातला असतां चुन्यास इतकी मजबुती येते, कीं तोफेचा गोळा देखील त्याजवर एकाएकीं लागू होत नाहीं.

**खैर**—पाचक, शीत, रसकाळीं कडू, तुरट, रक्तशुद्धिकारक, दंतांला हितावह; व कफ, पित्त, कृमि, व्रण, कुष्ठ, कंडू, ज्वर, शोथ, खोकला, मेद, प्रमेह, आम, अरोचक, पांडु व रक्तदोष, यांचा नाश करितो. **खैराचा डींक**—मधुर, बलकर व धातुवर्धक आहे. **खैराचा सार**— ( नार, साड.) व्रण्य, विशद; व रक्तदोष कफ व मुखरोग यांचा नाश करितो. ( १. ) **उपदंश** ( गर्मी ) **रोगावर**—खैर व अंसांणा यांचा काढा त्रिफलाचूर्ण घालून प्राशनार्थ द्यावा; ह्मणजे सर्व प्रकारचे उपदंश दूर होतात. ( २. ) **कुष्टरोगावर**—खैराचे पंचांगांचा ( मूळ, पान, फूल, साल, फळ. ) काढा करून ठेवावा. त्यानें स्नान, पान, भोजन, उद्वर्तन, लेप करावा, ह्मणजे सर्व कुष्ठें दूर होतात. तसेंच कुष्ठावर खैराचा काथ उगाळून लावावा. ( ३. ) **भगंदरावर**—खैरसाल व त्रिफळा यांचा काढा करून त्यांत ह्मशीचें तूप व वावडिंगांचें चूर्ण घालून प्यावें. ( ४. ) **सोमलाचे विषावर**—गाईचे दुधांत काथ उगाळून द्यावा. ( ५. ) **मुलांस मुबारकी** रोग होतो त्यावर.—या रोगाचीं

लक्षणें अशीं आहेत कीं, अजीर्ण होऊन पोटांत दूषितमलाची गांठ होऊन बरगड्या उडूं लागतात. गालावर सुजेची छाया दिसते, पोट फुगीर दिसतें, मूत्र पिंवळें होतें, व शक्ति क्षीण होत जाते; यांवर खैराची अंतरसाल सुमारें ३ मासेपर्यंत गाईचे दुधांत उगाळून त्यांत अर्ध्या उडदाइतकें गोरोचन उगाळून प्रत्यहीं प्रातःकाळीं एक एक वेळप्रमाणें ३ दि. द्यावें. ( ६. ) **तिडक्या प्रमेहावर**—खैर, बाभळ व शमी या तिन्ही झाडांच्या कोंवळ्या तुऱ्या ( अंकुर ) एक तोळापर्यंत समभाग मिश्र करून गाईचे निरशा दुधांत वाटून सुमारें ५ तोळेपर्यंत रस काढून त्यांत जिऱ्याची पूड चार गुंजा व खडीसाखरेची पूड अर्धतोळा घालून प्रत्यहीं दुवक्तप्रमाणें ७ दिवस घ्यावें. ( ७. ) **खडतर घोडा वठणीस येण्यास**—रोज त्यास ५ तोळे काथ द्यावा. (८) **मनुष्यांस शणि झाला असतां त्यावर**—खैराच्या सालीच्या रसांत हिंग घालून द्यावा. (९.) **प्रमेहावर व उन्हाळ्यावर**—खैराचे अंकुर ४ पैसेभार, जिरें १ पैसाभार घेऊन वाटून गाईच्या दुधांत कालवून वस्त्रगाळ करून त्यांत खडीसाखर घालून तें द्यावें. हें औषध दुवक्त घ्यावें. ( १०. ) **खोकल्यास**—खैराची अंतरसाल ४ भाग, बेहेडेदळ २ भाग, लवंग १ भाग यांचें चूर्ण करून तें मधाशीं द्यावें. ( ११. ) **कान फुटतो त्यास**—पांढऱ्या काथाची वस्त्रगाळ पूड करून ऊन्ह पाण्यांत कालवावी; त्याची पिचकारीप्रमाणें कानांत चूळ सोडावी नंतर कान स्वच्छ धुवावा. ( १२. ) **पित्तविकारावर**—खैराच्या कोंवळ्या तुऱ्या १ तोळा घेऊन त्यांत तीन मासे सुंठ घालून बारीक वाटून ती गोळी गाईच्या निरशा दुधांत कालवून प्रतिदिवशीं प्रातःकाळीं याप्रमाणें ३ दि. द्यावी. ( १३. ) **कुष्ठावर**—खैराची साल, आंवळकठी यांचा काढा, बावंच्यांचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे श्वेत कुष्ठ दूर होतें.

## १०७. खोकली.

**हें झाड बरेंच मोठें होतें. सह्याद्रिपर्वतावर याची उत्पत्ति विशेष होते. या झाडाचीं पानें हिरड्यच्या पानाएवढीं मोठीं असतात. याची साल तेजबळाच्या सालीसारखी जाड असून पिंवळ्या रंगाची असते. या झाडावर हरभऱ्याएवढीं फळें येतात. या झाडाची साल व फळें हीं फार तिखट आहेत. खोकलीच्या झाडास सांवरीप्रमाणें कांटे असतात.**

( १. ) **खोकल्यावर**—खोकलीचें अर्धें फळ अथवा थोडी साल वाटून मधांत कालवून खावी, अगर सालीचा काढा करून द्यावा, ह्मणजे थोडक्याच दिवसांत खोकला, दमा व वायुविकार हे दूर होतात.

## १०८. खोरेती. ( सं. फल्गु. )

**या वृक्षास "खरवत" असेंही ह्मणतात हीं [illegible]**

काणीं असतात. याच्या पानावर करवतासारखे खरखरीत कांटे असतात. कोंकणांत सुतारलोक हीं पानें लांकडीकाम साफ करावयास घेतात, तेणेंकरून लांकूड गुळगुळीत होतें. बोखेज्याच्या पानासारखीं व फळासारखींच याचीं पानें व फळे असतात.

( १. ) **नळगुदास**—खोरेतीच्या सालीचा रस ४ पैसेभार गाईचे दुधांतून द्यावा. दि. ३. अ० साल गोमूत्रांत उगाळून द्यावी. ( २. ) **कवल्लूवर**—खोरेतीचें पाळ गोमूत्रांत उगाळून द्यावें. ढाळ झाल्यास उतार तूपभात. अ० खोरेतीचीं फळें याची भुकी नारळाच्या अंगरसांत द्यावी. ( ३. ) **मुलांचे पोटातील डबा वगैरेवर**—खोरेतीची साल, चित्रकाची मुळी व अघाड्याची मुळी हीं गोमूत्रांत एकत्र उगाळून द्यावी. रेच झाला तर उतार दहींभात. ( ४. ) **डब्यावर व पाणथरीवर**—खोरेतीची साल, पाणीशोक व नारळाची करवंटी हीं समभाग गोमूत्रांत उगाळून प्रत्यहीं दोनवेळ प्रमाणें २१ दि० द्यावी. ( ५. ) **मानेवरील भागास व्रण** झाला असल्यास त्यावर—खोरेतीच्या सालीचे रसांत फडकें भिजवून ताळवेवर चौघडी घालावी व वरून एक फडकें सर्व मस्तकासभोंवतीं गुंडाळून त्याजवर वारंवार रस घालीत राहावें, याप्रमाणें दि. ७ ही घडी सतत ठेवावी व पथ्य करावें. ( ६. ) **डब्याचा उपद्रव न होण्यास**—महिन्यांतून दोन वेळां खोरेतीची साल गोमूत्रांत उगाळून देत जावी. ( ७. ) **गुल्मरोगावर**—खोरेतीचीं सुकलेलीं फळें अ० साल व नारळाची करवंटी हीं पांच तोळे गोमूत्रांत अर्ध तोळा प्रमाणें उगाळून तें प्राशन करावें. ( ८. ) **दांत हलतात त्यास व दंतशूलावर**—खोरेतीच्या काष्ठानें दांत घांसावे ह्मणजे ३ दिवसांत दांत मजबुत होतात व दुखत असल्यास राहतात. ( ९. ) **विटाळ येण्यास**—खोरेतीच्या फळांचें चूर्ण नारळाच्या अंगरसांत द्यावें. दि० ३ । ७.

## १०९. गंगावती. ( सं. )

हीस कोंकणांत "भांबुरडी" "भांबरूड" असेंही ह्मणतात. हींत लहान व मोठी अशा दोन जाति आहेत. मोठी सुमारें हात दोन हात उंच वाढते. हिचीं पानें मोठीं असून त्यावर बारीक कुसें असतात. ही मळेजमिनींत होते. ही गांवांतही ओलसर जाग्यांत होते. धाकटी जात विहिरीवर किंवा पाटाच्या कडेस होते. हीं झाडें बहुतेक प्रांतांत होतात. या झाडास पिंवळट रंगाचीं बारीक फुलें येतात. हिच्या पानांस दर्पट वास येतो. गंगावती ही उष्ण आहे. हीस "वनबावरी"

**गंगावती**— तिखट, उष्ण, वातनाशक, व्रणरोपणी अशी आहे. ( १. ) **आगंतुक जखम** लागल्यास त्यावर—गंगावतीचा पाला हातावर चोळून तो जखमेवर बसवावा; ह्मणजे तावडतोब रक्त बंद होऊन जखम लवकर भरून येते. ( २. ) **पिस्वा** जाण्यास—जेथें पिस्वा झाल्या असतील तेथें गंगावतीचीं ओलीं झाडें आणून त्या जमिनीवर पसरून ठेवावीं; ह्मणजे ह्या दर्पानें पिस्वा नाहींशा होतात. ( ३. ) **मुळव्याधीवर**—गंगावतीचा रस तोळा व तूप तोळा एकत्र करून द्यावें. ( ४. ) **अर्धशिशीवर**—गंगावतीचा रस मस्तकास चोळावा व उन्हांत बसावें. असें एक दोन वेळ केलें असतां अर्धशिशी तावडतोब शांत होते.

## ११०. गवती चहा. ( सं. सुगंधि. )

**गवतीचहाचीं बेटें दर्भाच्या बेटांसारखीं मोठमोठीं वाढतात. यास "पातीचा चहा" असेंही ह्मणतात. बागाइतांत पाटाच्या कडेनेंही लावतात. याची उंची सुमारें हात दीड हात असते. याचें तेल काढतात तेही औषधी आहे. या चहाचीं पानें कढींतही घालतात.**

( १. ) **ज्वरांत घाम** निघावयास—याचा चहा करून द्यावा, ह्मणजे घाम निघून ताप कमी होतो. ( २. ) **पोटदुखीवर**—याचें तेल द्यावें. **पटकीवरही** हें गुणावह आहे. ( ३. ) **सर्दी, पडसें, शैत्यज्वर, आगंतुकज्वर** व **जडत्व** यांवर गवतीचहा, सुंठ व खडीसाखर यांचा अष्टमांश काढा करून गरम प्यावा व पांघरूण घेऊन निजावें, या योगानें घाम येऊन शरीरांतील सर्दी निघून जाऊन हुशारी वाटते. हा काढा उष्ण आहे, समधात होण्याकरितां यांतच दूध घालून कोणी कोणी घेतात. ( ४. ) **घाम येण्याकरितां वाफारा**—एका मोठ्या भांड्यांत गवती चहाची जुडी टाकून त्यावर झांकण ठेऊन आधण येईपर्यंत तें पाणी कढवावें; नंतर रोग्यास बाजेवर निजवून या पाण्याचा वाफारा द्यावा, ह्मणजे घाम सुटतो. ( ५. ) **पडशावर**-गवतीचहा, पुदिना किंवा दालचिनी व आलें यांचा काढा करून त्यांत गूळ घालून, रात्रीं निजावयाचे वेळीं प्यावा व उबदार वस्त्र पांघरून निजावें. या प्रमाणें तीन दिवस घ्यावें.

## १११. गरवेल.

**या झाडाची उंची सुमारें दोन हात असते. हें झाड सबजाच्या झाडासारखें असतें. याचीं पानें व मुळें फार कडू असतात. हीं झाडें माहुली किल्ल्यावर पुष्कळ होतात.**

**पटकीवर**—गरवेलीचीं मुळें ३ मासे व मोडसकांदा तीन मासे हीं पाण्यांत वाटून तें द्यावें, ह्मणजे तावडतोब पटकीचा आजार दूर होतो.

## ११२. गहुला. ( सं. अद्वयः )

गहुल्याचें झाड फार मोठें होत नाहीं. याची उत्पत्ति उत्तर हिंदुस्थानांत होते.

**गहुला**—तुरट, कडु, वृष्य, शीतल, केशांला हितावह; वांति, भ्रांति, दाह, पित्त, रक्तरोग, ज्वर, मोह, घर्म, कुष्ठ, मुखजाड्य, तृषा, वातगुल्म, विष, मेद; मेह-रक्तपित्त, यांचा नाश करितो. याचें **बीज**—तुरट, मधुर, शीतल, रूक्ष, ग्राहक, मलस्तंभकर, बल्य, पित्तनाशक, कफनाशक, आध्मानवायुकारक असें आहे. **सुगंध गहुला**—शीतल, सुगंधि; व कुष्ट, दाह, ज्वर, रक्तविकार यांचा नाश करितो. **( १. ) गर्भिणीच्या रक्तस्रावावर**—गहुला, कमलकंद, कोंवळीं उंबरें हीं दुधांत शिजवून तें दूध प्यावें; मग साखर तोंडी लावून तांबड्या साळीचा भात खावा. **( २.) आम्लपित्तावर**—गहुल्याचें चूर्ण साखरेशीं द्यावें.

## ११३. गहूं. ( सं. गोधूम. )

सर्व धान्यांमध्यें गहूं श्रेष्ठ आहे; ह्मणून त्यास धान्यराज असें ह्मटलें आहे. गहूं हिंदुस्थानांत सर्वत्र पिकतो. इतर सर्व खंडांतही गहूं होतो. गव्हांचा रोंपा २ हात उंच वाढतो. अव्वल काळ्या जमिनींत याचें पीक चांगलें होतें. उत्तरहिंदुस्थानांत गहूं पुष्कळ पिकतो ह्मणून तिकडील लोकांचें खाणें गहूंच आहे. जो गहू शेतांत पाणी शिंपल्या-वांचून होतो त्यास शेतगहूं व जो पाणी शिंपून होतो यास मळेगहूं असें ह्मणतात. गव्हांचें धान्य नीट ठेविलें असतां चार पांच वर्षें टि-कतें. गहूं हें धान्य उंचप्रतीचें असून, याचे पदार्थ मनुष्याच्या प्रकृतीस चांगलें मानतात. सर्व धान्यांपेक्षां गव्हांत पौष्टिकपणा जास्त आहे. गव्हांत पुष्कळ जाति आहेत. काटे, हांसे, बन्सी किंवा बक्षी, पोटे-खपले, दाऊदखानी अशा यांत पुष्कळ जाति आहेत. त्यांत बक्षी हे उत्कृष्ट प्रतीचे आणि खपले हे कनिष्ठ प्रतीचे आहे. गव्हांच्या कोव ळ्या ओंब्याचा हुरडा भाजून खातात. गव्हांचे जितके पदार्थ होतात तितके कोणत्याच धान्याचे होत नाहींत. गव्हांपासून घिवर, मांडे, जिलब्या, फेंण्या, पोळ्या, लाडू अशीं अनेक पक्वान्नें होतात. या पक्वा-न्नांस तूप साखर अवश्य पाहिजे. पांच सहा दिवस सगळे गहूं भिजूं घालून त्यांच्या सत्वाचा एक पदार्थ करितात; त्यास बदामी हलवा ह्मणतात. तो पौष्टिक आहे. गव्हांच्या सत्वाची खीर करितात. ती पौष्टिक असते; ही अशक्तास शक्ति येण्याकरितां देतात. गव्हांचा कोंडा

गुरांस खावयास घालतात. कागद चिकटविण्यास याच्या पिठाची खळ फार चांगली होते.

**गहूं** ( थोर ) स्निग्ध; मधुर, शीत, गुरु, धातुवर्धक, बलकर, कफकर, सारक, वर्ण्य, रुच्य, जीवन, भग्नसंधानकारक, व्रणाला हितकर. स्थिरताकारक, आमाल करणारे; व वायु, पित्त, यांचे नाशक असे आहेत. हे जुने कफ नाशक आहेत. **गहू बारीक**-स्निग्ध, वृष्य, कफकारक, गुरु, आमदोषकारक, बलकर, मधुर, धातुवर्धक पौष्टिक आहेत; वरकड गुण मोठ्या गव्हांसारखेच आहेत. ( १. ) **बदावर**-गव्हांच्या कणकीचें पोटीस ७।८ वेळ बांधावें ह्मणजे बद पक्क होऊन फुटेल. नंतर व्रणोक्त चिकित्सा करावी. कोणतेंही गळूं पिकण्यास हेंच पोटीस बांधलें असतां तें पिकून फुटतें. (२. ) **कामिणीवर**-गहूं घेऊन त्यावर पळी विस्तवांत लाल करून दाबावी व तीस जो गव्हांचा घाम लागेल तो डोळ्यांत घालावा. ( ३. ) **शीघ्रप्रसूतीस**-गव्हांच्या शेवया आधणांत शिजवून ते पाणी वस्त्रगाळ करून सुमारें अच्छेरपर्यंत घेऊन त्यांत साजुक तूप नवटाकपर्यंत घालून द्यावें. हें औषध प्रसूतिसमयींचें जें पोट दुखणे तें सुरू होतांच देववेल तर द्यावें. नंतर देऊं नये. ( ४ ) **अस्थिभंगावर**-किंचित् भाजलेल्या गव्हांचें चूर्ण मधाशीं द्यावें. हें कंबर व सांधे मोडले असतां त्यावर उत्तम आहे ( ५. ) **नारूवर**-गहूं व तागाच्या बियांचें चूर्ण तुपांत भाजून गुळांत गोळी करून द्यावी, वचुना आणि बिडलोण दाण्यांत वाटून लेप करावा. ( ६. ) **नाकांतून रक्त वाहतें त्यास**-साखर व दूध घालून गव्हांचें पीठ द्यावें. (७. ) **प्रमेहावर**-अदपाव गहूं रात्रीं पाण्यांत भिजूं घालून सकाळीं वाटून वस्त्रगाळ करून त्यांत खडीसाखर ९ तोळा घालून तें ७ दिवस द्यावें.

## ११४. गाजर. ( सं. गर्जर. )

गाजर, कंदासारखें जमिनींत होतें. हें लांबट असून याचा रंग तांबूस असतो. गाजराचें झाड हात सवाहात वाढतें. दिल्लीकडेस जीं गाजरें होतात तीं सर्वोत्कृष्ट आहेत. गाजरें हिरवीं, भाकरीबरोबर खातात, व त्यांची भाजी होते. तीं उकडूनही खातात. दुष्काळांत गरीब लोक गाजरांवरच दिवस काढतात. गाई, ह्मशी वगैरे गुरांस गाजरें खाऊं घातलीं असतां तीं पुष्ट होऊन दूध पुष्कळ देतात. गाजरांचें बीं गर्भपातकर आहे.

**गाजर**-मधुर, रुच्य, ग्राहक, कडू तिखट, रक्तपित्तकारक, उष्ण, हृद्य, अग्निदीपन, नेत्रांला विकार करणारें, विदाही, रूक्ष, पित्तकर, हृद्य; व आध्मान, शूल, मुळव्याध, कृमि, संग्रहणी, वात, पित्त, कफ, तृषा, शुक्र, यांचा नाश करितें. याचें बीज उष्ण, वृष्य, गर्भपातकर असें आहे. ( १. ) **इसबरोगावर**-गाजरें किसून त्यांत

थोडें मीठ घालावें. व पाणी न घालतां त्यांस वाफ देऊन तो कीस डसवावर बांधावा. यानें त्वरित गुण येतो. (२.) ऋतु येण्यास-गाजराचें बीं पाण्यांत वाटून द्यावें. दिवस ५.

## ११५. गांजा. [ भांग ] ( सं. विजया. )

### ( गांजा. गु. हिं. )

**गांजाचें झाड सुमारें ३ हात पर्यंत उंच वाढतें. याचीं पानें अंबाडीच्यापानांसारखीं असतात. झाडावर तुरे येतात, त्यांस गांजा असें ह्मणतात. ते तुरे काढून सुकवितात. गांजाचा जो, चुरा त्यास भांग ह्मणतात. ही भांग वाटून पितात. त्यास घोटा असें ह्मणतात. गांजा ओढल्यापासून व भांगेचा घोटा प्याल्यापासून मनुष्यास निशा येते, त्याचें काळीज करपून जातें, शक्ति क्षीण होते. आणि त्या मनुष्यास एक प्रकारची तार येऊन त्या तारेंत तो मनुष्य अगदीं धुंद होऊन जातो; पाहिजे तें बहकतो, असें हें एक दुर्व्यसन आहे. हें व्यसन ज्या मनुष्यास जडलें असतें त्यास गांजेकस असें ह्मणतात.**

**भांग**—पित्तल, तीक्ष्ण, कडू, उष्ण, ग्राहक, लघु, कर्षणकारक, अग्निदीपक रुचिकर, मादक, वाणीची वर्धक, मोहकारक; व कफ, वायु, यांची नाशक आहे. (१.) **उन्हाळे लागतात त्यास**—भांगेचा घोटा शक्त्यनुरूप द्यावा. (२.) **मुळव्याधीस धुरी**—भांग व गुरांच्या शिंगाचे मोड यांची धुरी द्यावी. (३.) **बैल किंवा रेडे रक्त मुततात त्यावर**—भांग, बडीशेप व वेलची एकत्र करून वाटून शक्तीप्रमाणें पाजावें अथवा भांग वाटून पाजावी. (४.) **अतिसारावर**—गांजाचें चूर्ण गुळांत अथवा साखरेंत द्यावें. (५) **श्वासावर**—गांजाची राख मधांत द्यावी. (६) **निद्रानाश, अतिसार, ग्रहणी व अग्निमांद्य यांवर**—रात्रीं भांग भाजून तिचें चूर्ण मधाशीं द्यावें. (७.) **चातुर्थिक ज्वरावर**—गुळांत भांग मिळवून बोराएवढ्या गोळ्या कराव्या व ताप येण्यापूर्वीं चार घटका एक गोळी द्यावी. (८.) **भूतज्वरावर**—भांगेचे झाडाला सायंकाळीं आंवतून प्रातःकाळीं तिची मुळी काढून मस्तकीं बांधावी.

## ११६ गिंधान.

**ही वनस्पति वर्षायु आहे. हीस "गंधाटी" "किडामार" अशींहीं नावें आहेत हिची वेल असते. दक्षिण हिंदुस्थानांतही नदीच्या किनाऱ्यांनीं काळ्या जमिनींत श्रावणमासीं उगवते. हिच्या पानांचा रस फार कडू व उग्र आहे.**

( १. ) जनावरांच्या क्षतांत किडे पडतात त्यास—गिंधानीचा रस अगर पाला वाटून क्षतावर लावला म्हणजे किडे मरतात. ( २. ) **गजकर्णावर**—गिंधानीच्या पानांचा रस एरंडेलांत मिसळून लावावा. ( ३. ) **पोटदुखीवर**—हिचीं दोन पानें पाण्यांत कोळून द्यावीं. ( ४. ) **लहान मुलांस मल साफ होण्यास**—हिचीं पानें बेंबीस बांधावीं. ( ५. ) **शीतज्वर व संततज्वरावर**—हिच्या पाल्याचा रस अंगास चोळावा म्हणजे ज्वर तत्काल जातो. ( ६. ) **कृमींवर**—गिंधानीचा रस काढून द्यावा, अगर बियांचे चूर्णाची फकी द्यावी. ( ७. ) **सुजीवर**—गिंधान, समुद्रफळ, माळकांगणी व मिरीं हीं वाटून लेप द्यावा.

## ११७. गुग्गुळ. ( सं. गुग्गुल. गु. गुगळ. हिं. गुग्गुल. )

**यांचीं झाडें मारवाड व सिंध या देशांत होतात. हीं झाडें सिंगापूर बेटांत फार आहेत. ग्रीष्मऋतूमध्यें उन्हानें हीं झाडें तापून स्रवतात व त्यांतून जो चीक निघतो त्यास गुग्गुळ असें म्हणतात. याचा धूपाकडे पुष्कळ उपयोग होतो. याचा धूप केल्यानें हवा शुद्ध होऊन हवेंतील रोगकारक द्रव्यें नाश पावतात, हा याच्यापासून अतिशय मोठा उपयोग आहे. देवास नित्य धूप दाखविण्याचें मूळकारण तरी हेंच असलें पाहिजे.**

**गुग्गुळ.**—हा महिषाक्ष, महानील, कुमुद, पद्म, हिरण्य, या भेदेंकरून पांच प्रकारचा आहे. तो कडू, तिखट, उष्ण, रसायन, विशद, पित्तल, सारक, तुरट लघु, पाचक, वृष्य, मोडलेल्या हाडांचें संधान करणारा, सूक्ष्म, स्वर्य, अग्निदीपक, बुळबुळीत, मधुर, बल्य, तीक्ष्ण, स्निग्ध, सुगंधि, पौष्टिक, कांतिकर, भेदक असा आहे; व कफ, वायु, कास, कृमि, वातोदर, श्लेष्म, सूज, अर्श, प्रमेह, मेदोरोग, वातरक्त, रक्तदोष, ग्रंथिरोग, गंडमाळा, व्रण, अपची, पिटिका, आंव, कडू, कुष्ठ, छर्दि, आमवायु, अश्मरी, यांचा नाश करितो. हा **नवा** असतां धातुवर्धक व वृष्य आहे; व **जुना** असतां अति लेखन आहे. **महिषाक्ष** ( म्हशा गुग्गुळ, ) व **महानील**, हे हत्तीचे उपयोगीं; व **कुमुद** आणि **पद्म** हे अश्वाचे उपयोगीं; व **हिरण्य** हा मनुष्याचे उपयोगीं आहे. कदाचित् महिषाक्षही मनुष्याचे उपयोगीं आहे असें जाणावें. **गुग्गुळ** हा मधुर आहे म्हणून वातशमन, व तुरट आहे म्हणून पित्तनाशक, व कडू आहे म्हणून कफनाशक, याप्रकारें सर्वदोषनाशक, आहे असें जाणावें. **कणगुग्गुळ**—हा तिखट, उष्ण, सुरभि, रसायन, व वायु, शूल, गुल्म, उदर, आध्मानवायु, कफ यांचा नाशक आहे. **भूमिजगुग्गुळ**—हा तिखट, कडू, उष्ण असा आहे; व कफ, वात, पिशाचबाधा यांना दूर करितो. **गुग्गुळाची शुद्धि.**—त्रिफळ्याचा काढा करण्यास एक कल्हईचें पातेलें घेऊन त्रिफळा व

त्याच्या बेतानें पाणी पातेल्यांत घालावें व त्यावर एक फडकें बांधून मग त्यावर-गुग्गुळाचें चूर्ण घालून वर झांकण ठेवून तो गुग्गुळ शिजवावा ह्मणजे शुद्ध होतो. ( १. ) **कपाळ दुखतें** त्यावर—गुग्गुळ पाण्यांत उगाळून त्याचा कपाळावर लेप द्यावा ह्मणजे कपाळ राहतें. ( २. ) **काखमांजरीवर**—गुग्गुळ व चिंचोका पाण्यांत उगाळून लेप करावा. ( ३. ) **दाढ दुखते त्यास**—गुग्गुळ व रक्तबोळ उगाळून दाढेस लावावा. ( ४ ) **थंडीनें अंग ठणकत असल्यास**—गुग्गुळ व सुंठ एक ठिकाणीं उगाळून लेप करावा व शेकावें. ( ५ ) **गोम चावल्यास**—गुग्गुळाचा धूर द्यावा. **योगराजगुग्गुळ**:—वावडिंग, धणे, हिंग, गजपिंपळी, पहाडमूळ, जिरें, अतिविष, पिंपळी, पिंपळमूळ, चविक, चित्रकमूळ, सुंठ, अजमोदा, मोरवेल, वेखंड, रेणुकबीज, कपिला, भारंगमूळ, इंद्रजव, पांढरे शिरस, कुटकी या सर्व औषधांचे दुप्पट त्रिफळा आणि शुद्ध गुग्गुळ तिप्पट घालून गोळ्या कराव्या. त्या मधाशीं द्याव्या ह्मणजे ग्रहणी, वायु, वृद्धत्व, शुक्रार्तवदोष, पांडुरोग, अग्निमांद्य, हृद्रोग; त्वग्रोग, शूळ, प्रमेह, व्रण, मुळव्याध, अरुचि, वातरक्त, खोकला, अपस्मार, आणि राजयक्ष्मा, यांचा नाश करितात, हा मुख्यत्वेंकरून रास्न्याच्या काढ्यांत देण्याचा संप्रदाय आहे, याप्रमाणें योजिला असतां आमवाताला फार गुणकारी होतो, हा गुग्गुळ बोपदेवशतकांत सांगितला आहे. **दुसरी योगराजगुटी**:—सुंठ, पिंपळीमूळ, चवक, मिरीं, चित्रक, भाजलेला हिंग, अजमोदा, शिरस, जिरें, शहाजिर, रेणुकबीज, इंद्रजव, पहाडमूळ, वावडिंग, गजपिंपळी, कुटकी, अतिविष, भारंगमूळ, वेखंड, मोरवेल, तमालपत्र, देवदार, पिंपळी, कोष्ट, रास्ना, नागरमोथा, सैंधव, एलची, गोखरू, हरीतकी, धणे, बेहडा, आंवळकाठी, दालचिनी, वाळा, यवक्षार, तीळ, या प्रत्येकाचीं समभाग चूर्णें आणि सर्व चूर्णांसमान शुद्ध गुग्गुळ घालून तुपाशीं मर्दन करावा. सर्व एकवट झाल्यावर गोळी करून तुपाच्या भांड्यांत भरून ठेवावा त्यांतून अर्धतोळा मात्रा भक्षण करावा. हा योगराजगुग्गुळ मुख्यत्वानें जरा व व्याधि यांचा नाश करितो हा घेतला असतां मैथुन, भोजन व पान यांचा काहीं नियम नको. हा संपूर्ण वातरोग, आमवात, अपस्मार, वातरक्त, कुष्ट, दुष्टव्रण, अर्शरोग, प्लीहा, गुल्म, उदर, आनाह, अग्निमांद्य, श्वास, कास, अरुचि, प्रमेह, नाभिशूळ, कृमि, क्षय, हृद्रोग, शुक्रदोष, उदावर्त आणि भगंदर, यांचा नाश करितो. हा तीन माशांपासून सात सात दिवसांनीं तोळ्यापर्यंत वाढवावा. हा सर्व वातरोगांवर रास्न्याच्या काढ्याशीं, मेहावर दारुहळदीच्या काढ्याशीं, वातरक्तावर गुळवेलीच्या काढ्याशीं, पांडुरोगावर गोमूत्राशीं, मेदवृद्धीवर मधाशीं, कोडावर निंबाच्या काढ्याशीं, शूळावर मुळ्याच्या काढ्याशीं, उंदराच्या विषावर पाडळमूळाच्या काढ्याशीं, उष्णनेत्ररोगावर त्रिफळ्याच्या का-

क्वाशीं आणि संपूर्ण उदरांवर पुनर्नवादि काढ्याशीं द्यावा. **कैशोरक गुग्गुळः**-गुळवेल २ शेर, गुग्गुळ १ शेर, त्रिफळा १ शेर घेऊन १६ शेर पाणी घालून काढा करावा, आणि ८ शेर उरला ह्मणजे गाळून पुनः उकळावा. तो घट्ट होत चालला ह्मणजे त्यांत हीं पुढील औषधें घालावीं. मिरें, पिंपळी, वावडिंग, सुंठ त्रिफळा हीं दोन दोन तोळे चूर्ण करून घालावीं. निशोत्तर आणि दंतीमूळ हीं एक तोळा घालावीं. गुळवेल ४ तोळे बारीक करून घालावी. तें सर्व घट्ट झालें ह्मणजे गोळया तीन तीन माशांच्या कराव्या. हा कैशोरक गुग्गुळ सूज, व्रण, गुल्म, कुष्ट, उदर, वातरक्त, खोकला, अग्निमांद्य, पांडु आणि प्रमेह यांस दूर करितो. **द्वात्रिंशक गुग्गुलः**-त्रिकटु, त्रिफला, नागरमोथा, वावडिंग, चवकै, चित्रक, दालचिनी वेलदोडे, पिंपळमूळ, शेरणि, देवदार, चित्रक, पुष्करमूळ, कोलिंजन, अतिविष-दारुहळद, हळद, बाफळी, जिरें, बडीशेप, धमासा, पादेलोण, वावडिंग, जवखार, टांकणखार, गजपिंपळी व सैंधव हीं एक एक भाग, या सर्वांच्या बरोबर गुग्गुळ घेऊन रीतिप्रमाणें सिद्ध करून बोराप्रमाणें गोळी करून मधाबरोबर किंवा तुपाब-रोबर प्रातःकाळीं भक्षण करावी; ह्मणजे आम, उदावर्त, अंत्रवृद्धि, गुदकृमि यां-चा नाश करील, व महाज्वरानें पीडित, भूतबाधा झालेला, आनाह, उन्माद, कुष्ट पार्श्वशूल, हृद्रोग, गृध्रसी, हनुस्तंभ, पक्षाघात, अपतानक, शोफ, प्लीहा, कामला व अपची हे रोग झालेल्या मनुष्यांस हितकारक आहे. हा मोठा धन्वंतरीकृत योग सर्व रोगांचा नाश करणारा आहे. **विश्वाद्यगुग्गुलः**-शतावरी, एरंडमूळ, सुंठ, दारुहळद, कोष्ट, सैंधव, रास्ना, गुळवेल आणि या सर्व चूर्णाच्या दुप्पट शुद्ध गुग्गुळ असे एकत्र करून त्याची एकेक गोळी द्यावी, आणि पथ्य करावें; ह्मणजे भ्रमवात नाश पावतो. **दुसरा प्रकारः**-सुंठ पिंपळमूळ, वावडिंग, देवदार, सैंधव, रास्ना, चित्रक, ओंवा, मिरीं, कोष्ट आणि हरीतकी हीं समभाग, व दुप्पट गुग्गुळ असे एकत्र करून तुपाशीं द्यवा; ह्मणजे वायु, मोडशी, गुल्म, शूल, कंप, व गृध्रसी यांचा नाश करितो. **रास्नादि गुग्गुलः**-रास्ना, गुळवेलीचें सत्व, एरंडमूळ, देवदार, सुंठ हीं एकेक भाग, आणि या सर्वांबरोबर गुग्गळ घेऊन एकत्र खलून खावा; ह्मणजे वायु, शिरोरोग, नाडीव्रण, भगंदर यांचा नाश होतो. **कांचनार गुग्गुलः**-कांचन वृक्षाची साल १० पलें (४० तोळे) प्रमाण, व हिरडा, बेहडा, आंवळकाठी हीं तीन औषधें दोन दोन पल प्रमाण, एकूण ६ पलें, सुंठ, मिरें, पिंपळी हीं तीन औषधें पलप्रमाण, व वायवर्णा एक पल, व विलायची, दालचिनी, तमालपत्र, हीं एकेक कर्ष (तोळा) प्रमाण घ्यावीं; मग सारीं औषधें कुटून चूर्ण करून त्याच्या समभाग गुग्गुळ शोधून वाटून त्यांत हें चूर्ण मेळवून एक गोळा करून मग त्याच्या गोळया शाण (४ मासे) प्रमाण बांधून,

प्रातःकाळीं सुंठीच्या काढ्यांत अथवा खैराच्या अंतरसालीच्या काढ्यांत, अथवा हरीतकीचे काढ्यांत, अथवा ऊन पाण्यांत एकेक गोळी घेत जावी: तेणेंकरून मोठ्या दुर्धर अशा गंडमाळा, व गंडमाळांचा भेद अपची रोग, अर्बुद, फुटकळया, व्रण, गुल्म, भगंदर हे रोग दूर होतात. **त्रिफळा गुग्गुळः**–हिरडा, बेहडा, आंवळकाठी, पिंपळी हीं चार औषधें एकेक पल ( ४ तोळे ) प्रमाण घेऊन चूर्ण करावें. मग शुद्ध केलेला गुग्गुळ ५ पलप्रमाण घेऊन चांगला वाटून त्यांत तें चूर्ण मेळवून कुटून गोळया करून रोग्याचे जठराग्नीचें बलतारतम्य पाहून द्याव्या. तेणेंकरून विद्रधि, नाडीव्रण, गंडमाळा, भगंदर, सूज, गुल्म, मुळव्याध हेरोग दूर होतात. **गोक्षुरादि-गुग्गुलः**–२८ पलें गोखरूं आणून थोडे कुटून त्यांत पाणी ६ गुण घालून अर्धे पाणी राही तोंपावेतों काढा कढवावा. मग शुद्ध केलेला गुग्गुळ ७ पल प्रमाण घेऊन चांगला कुटून अगर वाटून त्या काढ्यांत घालून फिरून गुळाचे पाकासारखा घण होईतोंपर्यंत पाक करावा. त्यांत चूर्ण टाकावयाचीं औषधें येणेंप्रमाणें:–सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, नागरमोथा हीं सात औषधें पलपलप्रमाण घेऊन चूर्ण करून त्या पाकांत मिळवुन एक पिंड करून मग त्याच्या गोळया बांधून द्याव्या. तेणेकरून परमा, मूत्रकृच्छ्र, प्रदर, मूत्राघात, वातरक्त, वातरोग, धातूचा विकार, मुतखडा, हे रोग दूर होतात. **लाक्षादिगुग्गुलः**–लाख, हाडसंधी, अर्जुन-सादडा, अश्वगंध, नागबला व गुग्गुळ यांचें चूर्ण अस्थिभंग व मुक्तास्थि यांचा नाश करितें, व अंगें वज्रासारखीं घट्ट होताता. **आभादि गुगुग्लः**–बाभळीचें बीं, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, हे सर्व समभाग, आणि सर्वांच्या समान गुग्गुळ घालून तो भग्नास्थीला सांधण्याविषयीं योजावा. हा तूप व मध यांशीं द्यावा. **गुल्म व शूल** यांवर–शुद्ध गुग्गुळ गोमूत्राशीं द्यावा. **विडंगाद्यगुग्गुलः**–वावडिंग, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, सुंठ, मिरीं, पिंपळी, यांचे चूर्णाबरोबर शुद्ध गुग्गुळ घेऊन सर्व तुपांत खलून गोळी करून खावी; पथ्य करावें; ह्मणजे दुष्टव्रण, नाडीव्रण अपची, मेह, कुष्ठ यांचा नाश होतो. **गुग्गुळादिलेपः**-गुग्गुळ, त्रिफळा, सुंठ, मिरें पिंपळी, हे समभाग वाटून यांचा लेप करावा, तो दुष्ट अशा नाडीव्रणाचा व भगंदराचा नाश करितो. **अमृतादिगुग्गुळः**-गुळवेल, कडू पडवळाचें मूळ, सुंठ, मिरीं, पिंपळी त्रिफळा, वावडिंग, यांचे समभाग चूर्णाबरोबर गुग्गुळ घालून एक तोळयाची गोळी करावी; ती दररोज एक खावी; ती व्रण, वातरक्त, गुल्म, उदर, पांडु व सूज यांचा नाश करिते. **पथ्यागुग्गुल**–हिरडे १०७, बेहडे २००, आंवळे ४००, व गुग्गुळ ६४ तोळे हे १०२४ तोळे पाण्यांत रात्रीस भिजत घालून प्रातः काळीं कढवून अर्ध-शेष उरले ह्मणजे गाळून घेऊन पुन: लोखंडाचे पात्रांत कढवावें; आणि उतरल्यावर त्यांत वावडिंग, दंतीमूळ, त्रिफळा, गुळवेल, पिंपळी, निशोत्तर, सुंठ, मिरें या प्रत्येकाचें

चूर्ण २ दोन तोळे प्रमाणें टाकावें; ह्मणजे हा गुग्गुळ तयार होतो. हा यथेष्ट आचरण व यथेष्ट भोजन करणाऱ्या मनुष्यानेंही सेवन केला असतां रोगनाश करील. हा गृध्रसी, नूतन खंजता, प्लीहा, उग्र जठर, पंगुता, पांडुत्व, कंडू, कृमि व वातरक्त यांचा नाश करणारा आहे. हा अप्रतिम सामर्थ्यवान् आणि बळें करून हत्तीसारखें व वेगेंकरून घोड्यासारखें मनुष्यास करितो; व आयुष्य, चक्षुर्बल व पुष्टि यांतें करितो; व विषनाशक, क्षत बरें करणारा असा हा सर्व रोगांच्याठायीं वैद्यांनीं योजिला आहे. **गुग्गुळास अपथ्य:**-आंबट, तिखट फार खाणें, मैथुन, श्रम, ऊन्ह, मद्य, क्रोध.

## ११८. गुंज ( सं गुंजा. गु चणोठी. हिं. गुंजा. )

**गुंजेचे वेल असतात. या वेलांचीं पानें बारीक लांबोडीं असतात. गुंजेंत तांबडी व पांढरी. अशा दोन जाती आहेत. दोहोंचेही वेल सारखेच असतात. गुंजा सोने वजन करावयास उपयोगीं पडतात. या १ तोळ्यांत ९६ भरतात. गुंजांची उपविषांत गणना आहे.**

**गुंजा**—स्वादु, कडु, बलकर, उष्ण, तुरट. त्वचेला हितावह, केश्य, रुच्य, शीत, वृष्य; व नेत्ररोग, विष, पित्त, इंद्रलुप्त, व्रण, कृमि, राक्षस, व ग्रहपीडा, कंडू कुष्ठ-कफ, ज्वर, मुखरोग, शीर्षरोग, वायु, श्रम, दमा, तृषा, मोह, मद, यांचा नाश करिते. हिचें बीज—वांतिकारक, शूलनाशक आहे. हिचीं पानें विषनाशक आहेत. श्वेतगुंजा विशेषेंकरून वशीकरणाकडे घेतात. वरकड गुण गुंजेसारखेच आहेत. ( १ ) **अर्धशिशीवर**—गुंजेचें मूळ पाण्यांत उगाळून नस्य द्यावें ह्मणजे अर्धशिशी तत्काल दूर होते. ( २. ) **देवीनें डोळ्यांत फुलें पडलीं तर**—मोगली एरंडाच्या चिकांत पांढरी गुंज उगाळून अंजन करावें. ( ३. ) **वीर्यवृद्धीवर** व **धातु पडत असल्यास** त्यावर-- गुंजेचें मूळ दुधांत शिजवून साखरेशीं द्यावें. ( ४. ) **डोक्यांस चाई लागते त्यास**--गुंजेचें मूळ अ० फळ बिब्याच्या रसांत उगाळून त्याचा लेप करावा; अ० गुंजा मधांत अगर तुपांत खलून लावाव्या. ( ५. ) **आवाज साफ होण्यास.**—पांढऱ्या गुंजेचा पाला चावून तोंडांत धरून त्यापासून येणारा द्रव वारंवार गिळावा. ( ६. ) **उष्णतेनें तोंडांत फोड वगैरे** झाल्यास—पांढऱ्या गुंजेचा पाला, कंकोळ व खडीसाखर हीं तोंडांत धरून द्रव गिळावा. अ० मूळ चावावें. ( ७. ) **लालामेहावर**—पांढऱ्या गुंजेचा पाला व मेंदीचा पाला सम भाग घेऊन त्यांचा रस काढावा. त्यांत दुदुरलीचें मूळ उगाळून जिरें व खडीसाखर घालून द्यावें. हें औषध सात रोज प्रत्यहीं दोन वेळप्रमाणें द्यावें, ( ८. ) **धांवऱ्यावर**—पांढऱ्या गुंजेच्या पाल्याचा लेप करावा. ( ९. ) **परम्यावर**—गुंजेच्या पाल्याचा रस काढून तो पावशेर गाईच्या दुधांतून द्यावा. ( १०. ) **पैणीस**—पांढऱ्या गुंजेच्या पाल्याच्या रसांत जिऱ्याची पूड घालून पोटांत द्यावें. ( ११. )

उन्हाळ्यांस--पांढरे गुंजेच्या पाल्याचा रस साखर व जिरें घालून द्यावा. ( १२. ) उष्णानें कपाळ दुखत असल्यास—पांढरे गुंजेचें पाळ स्वच्छ धुवून उगाळावें व फडक्यांत घालून नाकांत पिळावें दि. ७. ( १३. ) उपदंशावर— तांबडे गुंजेच्या पाल्याच्या रसांत जिऱ्याची पूड व खडीसाखर घालून तो रस द्यावा. दि. ७. ( १४. ) शेंदुराचे विषावर—गुंजेचा पाला खावा. दि. ७. ( १५. ) शिरोरोगावर--गुंजेचें मूळ उगाळून ( नस्य ) द्यावी; ह्मणजे डोळयांपुढें चक्रें येतात तीं, रातांधळें, नेत्रास पटलें येतात तीं; अर्धशिशी व मस्तकशूल हीं दूर होतात. ( १६. ) वायुरोगावर लेप.— ज्या अंगांत वायूचा कोप होत असेल त्या जाग्यावरील केश वस्तऱ्यानें काढून. त्यावर गुंजा पाण्यांत वाटून लेप करावा, तेणेंकरून अपबाहुक, विश्वाची, गृध्रसी हे वायु व दुसऱ्या वायुसंबंधीं पीडा दूर होतात. ( १७. ) ग्रंथी ह्म० गांठीवर— तांबड्या गुंजेच्या डाळी, चिंचुका व सोनकाव, थंड पाण्यांत उगाळून त्याचा लेप लावावा आणि तो सुकल्यावर पुनः दुसरा लावावा. ( १८. ) उपदंशावर ( गर्मीवर )—पांढऱ्या गुंजेचें मूळ व पांढऱ्या जास्वंदीचें मूळ उगाळून पोटांत द्यावें व गर्मीच्या चट्टयासही हेंच लावावें. ( १९. ) खोकल्यावर--पांढऱ्या गुंजेचें मूळ उगाळून द्यावें. ( २० ) पापण्यांस होणाऱ्या पूयअभिष्यंद रोगास— गुंजा पाण्यांत शिजवून तें पाणी पापण्यास लावावें; ह्मणजे पू वाहून जाऊन पापण्यांचा दाह व सूज नाहींशीं होते. ( २१. ) गंडमालेवर—गुंजेचें मूळ व फळें यांच्या दुप्पट काढ्यांत एकपट तेल घालून पचन करावें; व त्याचा अभ्यंग केला असतां, दारुण गंडमालेचा नाश होतो. ( २२. ) तिमिररोगावर—गुंजेचें मूळ बोकडाचे मुतांत उगाळून अंजन करावें. ( २३. ) सर्पदंशावर—पांढऱ्या गुंजेचें मूळ उगाळून प्यावें. ( २४. ) मस्तकास टकल पडतें त्यास—गुंजा, हस्तिदंताची राख, रसांजन यांचा लेप करावा; ह्मणजे त्या जाग्यावर त्वरित केश येतात.

### ११९. गुरमळ्या ( उमळ्या. )

गुरमळीच्या वेलाचें बुंध दोन आडीच विती रुंद असून तो शेंपन्नास हात उंच जातो, हे वेल दक्षिण कोंकणांतील रानांत फार होतात; हा वेल पंचवीस तीस वर्षेंपर्यंत वांचतो, याच्या फळाची आकृति जांभळासारखी असून किंचित् लांबट आहे, हीं फळें गरीब लोक भाजून किंवा उकडून खातात, हीं फार खाण्यांत आल्यास त्यापासून उपद्रव होतो.

### १२०. गुलछबू. ( सं. मरंजिका, नलिका. )

गुलछबूचें झाड लहान असतें, याचे कंद असतात, त्यापासून

याची उत्पत्ति होते. या झाडास कांद्यासारख्या पात्या येतात, त्यांतून एक दांडा दोन अडीच हात लांबीचा उत्पन्न होऊन त्यास तुरा येतो व त्या तुऱ्यांतून फुलें येतात, हीं फुलें जाड कळीचीं व लांबट असतात. यांस वास फारच मधुर व सुवासिक असतो.

गुलछबू—तुरट, स्निग्ध, लघु व कुष्ठ गलगंड यांचा नाश करितो. ( १ ) लहान मुलास बारा दिवसांचे आंतच तांबड्या पुटकुळ्या येतात त्यांस—गुलछबूचें मूळ व हळद पाण्यांत उगाळून त्यांत थोडें लोणी घालून तें अंगास चोळावे; म्हणजे पुटकुळ्या लवकर मावळतात. ( २. ) वळावर—गुलछबूची मुळी दुर्वांचे रसांत गंधाप्रमाणें उगाळून लेप द्यावा.

### १२१, गुलतुरा. ( सं. शंखोदरी. गु. गलतुरो. )

याचीं लहान झाडें असतात. याचीं पानें रानतरवडाच्या पानासारखीं असतात. यास जीं फुलें येतात त्यांस शंकराचीं फुलें असेंही कोणी म्हणतात. पुष्कळ काळ्यांत याचीं मुळें उपयोगीं पडतात. याचें लांकूड फार बळकट असतें, याचे खुंटे चांगले होतात. मोठें झाड बुंधापाशीं तोडलें तर त्याची पुनः फूट होऊन त्यास पुष्कळ खोडें फुटतात. यांत दोन जाति आहेत. एक पिंवळ्या फुलाची व दुसरी तांबड्या फुलाची. या झाडाचा विस्तार सर्व बाजूंनीं सारखा पसरून फांद्या जरा खालीं वांकतात. यांची छाया गर्द होऊन जाते. यास बोटाएवढ्या जाड, चपट्या व चार पांच अंगुलें लांबीच्या शेंगा येतात. त्यांत सात आठ दाणे असतात. हे दाणे मुलें आवडीनें खातात. हे बरेच रुचकर लागतात. या झाडास कांटे असतात. याचीं बियांपासून व कलमें लावून झाडें होतात. याच्या फुलांस वास नसतो. फुलांचे झुबकेच्या झुबके येतात. याच्या फुलांचा हंगाम आषाढ, श्रावण, भाद्रपद या महिन्यांत असतो. एरवींही यास बारा महिने फुलें येतात. हीं झाडें शोभेसाठीं बागेंत लावतात. या झाडास शंकासुरी, शंकेश्वर, रासतुरा कुंकुमकेशर असेंही म्हणतात. हा उष्ण, व कफ, वायु, शूल, आमवायु यांचा नाश करितो.

( १. ) नाकांतून रक्त पडतें त्यास—आंब्याची कोय दूर्वांच्या रसांत उगाळून नाकांत घालावी व पोटांत गुलतुऱ्याच्या पाल्याचा रस, अलिता व मध घालून द्यावा.

### १२२. गुलबाशी. ( सं. नक्ता. )

हीस सायंकाळी असेंही म्हणतात. इचें झाड लहान असतें. पानें

लहान असून लांबट व मृदु असतात. गुलबाशीत पांढरी, गुलाबी, पिवळी, तांबडी, केशरी वगैरे कृतीनें अनेक रंग झाले आहेत. औषधास पांढरी गुलबाशी जास्त गुणावह आहे. गुलबाशी-वातल, शीत, व गलगंड यांचो नाशक व अपक्व अर्शाला शमविणारी आहे.

( १. ) धांबरें व गळवावर--गुलबाशीचीं पानें तूप लावून शेकून गळवावर बांधलीं असतां आंतील, नासकें रक्त निघून जातें व गळूं बरें होतें; किंवा गुलबाशीचा कंद पाण्यांत उगाळून त्याचा वारंवार लेप करावा. ( २. ) पुष्टतेवर-- पांढऱ्या गुलबाशीचे कंद आणून किसावेत आणि सावलींत वाळवून चूर्ण करावें; तें तुपांत किंचित परतून, त्यांत बदाम, पिस्ते, चारोळ्या आदिकरून मसाला घालून साखरेच्या पाकांत मिश्र करून वड्या कराव्या. हा पाक नित्य तोळा दोन तोळे खाऊन वर गाईचें निरसें दूध प्यावें; ह्मणजे धातुस्थानची कडकी जाऊन धातुवृद्धि होते व शरीर पुष्ट होतें ( ३. ) धातु पडते त्यास--पांढरें गुलबाशीचा कांदा गाईचे दुधांत उगाळून द्यावा. दि० ७ ( ४. ) अंगांतील गर्मी झडून जाण्यास व रक्तशुद्धी होण्यास—पांढऱ्या गुलबाशीचा कंद गाईचे निरसे दुधांत १ तोळापर्यंत उगाळून त्यांत खडीसाखर १ तोळा व जिऱ्याची पुड ६ गुंजा घालून दोन्ही वेळ द्यावें व पथ्य करावें; ह्मणजे त्वरित गुण येतो. ( ५. ) निर्लोमकरण— गुलबाशीचा कांदा पाण्यांत वाटून त्याचा लेप करावा ह्मणजे केस गळून पडतात.

## १२३. गुलाब.

गुलाबाचें झाड सर्वत्र प्रसिद्ध आहे. हें लहान असतें. यास कांटे असतात. यांत गुलाबी, पिवळट, पांढरा, तांबडा, वगैरे जाति आहेत. उत्तम गुलाबाचीं झाडें अरबस्थान व तुर्कस्तान येथें होतात. गुलाबाच्या फुलांचें अत्तर व गुलाबपाणी होतें. गुलाबाचे फुलांचा वास फार सुवासिक येतो. गुलाबाच्या कळ्या सारक आहेत. गुलाबपाणी हें थंड आहे फुलांच्या पाकळ्यांचा गुलकंद करितात.

( १. ) रेच होण्यास—थोड्याशा वाळलेल्या गुलाबाच्या कळ्या साखरेबरोबर खाऊन वर थोडें पाणी प्यावें ह्मणजे रेच होतात. अथवा कळ्या रात्रीं पाण्यांत भिजूं घालून सकाळीं तें पाणी गाळून द्यावें. दुसरा प्रकार--सुकलेल्या गुलाबकळ्या भातांत शिजवून तो भात तूप साखर घालून खावा, ह्मणजे लवकर रेच होऊं लागतात. यानें ग्लानि वगैरे कांहीं न येतां रेचही साफ होतात. ( २. ) गुलकंद करण्याची कृति--उंच्या गुलाबाचीं फुलें घेऊन पाकळ्या काढाव्या. त्याच्या दुप्पट खडीसाखर घेऊन बरणींत किंवा लाखलोट्यांत पाकळ्यांचे व साखरेचें थरावर थर द्यावे, व त्याचें तोंड बांधून ८ दिवस उन्हांत टांगुन ठेवावें; ह्मणजे गुलकंद तयार

होतो. हा गुलकंद-दाहशामक, पित्तशामक व मलशुद्धि करणारा असा आहे. (३.) **गुलाबी अत्तर काढण्याची कृति**--पुष्कळ फुलें एका भांड्यांत घालून उकळावीं आणि त्यास कढ आला ह्मणजे तें भांडें खालीं उतरून ठेवावें. मग तें थंड झाल्यावर अत्तराचा तवंग पाण्यावर येतो तो काढून कुपींत भरावा. एक मण फुलांपासून १ तोळाभर देखील अत्तर निघत नाहीं; ह्मणून हें महाग विकतें तवंगाखालीं जें पाणी राहतें त्यास गुलाबपाणी ह्मणतात. (४.) **गुलाबी सरबत**--गुलाबपाण्यांत खडीसाखर घालून सरबतीपाक केला असतां सुवासिक सरबत होतें. हें सरबत उष्णतेचा नाश करणारें, थंड, उन्हाळे दिवसांत सेवन करण्यास योग्य असें होतें. (५) **डोळ्यांची आग होते किंवा तेज कमी झालें तर त्यावर**-गुलाबपाणी डोळ्यांत घालीत जावें. (६.) **आंकडीस**—गुलाबपाणी टाळूशिवाय करून नाक, कपाळ, डोळे, यांस कापसाच्या बोळ्यानें लावावें. (७.) **प्रदर, धातुविकार, रक्तमुळव्याध, पित्तविकार** इत्यादिकांवर--सकाळीं व त्याचप्रमाणें सायंकाळीं गुलाबाचीं ताजीं फुलें दरवेळीं पांच घेऊन तीं तीन मासे खडीसाखरेबरोबर खावीं व वर गाईचें दूध थोडें घ्यावें. दि. १४. ह्मणजे वरील सर्व विकार दूर होतात. शौचास साफ होतें. मूत्रस्थानाचा दाह. ठणका, मूत्राची आरक्तता, पिंवळेपणा, इ. विकारांवर हें अप्रतिम औषध आहे. (८.) **खरूज, गजकर्ण** वगैरे त्वग्दोषावर-- गुलाबकळीचें रेचक घ्यावें, ह्मणजे चांगला फायदा होतो. (९.) **त्वग्दोषावर**—गुलकंद खावा ह्मणजे रक्तशुद्धि होऊन अंगांतील गर्मी निघून जाते. (१०.) **डोळ्यांची गरमी** निघून जाण्यास--सुरम्यास गुलाबपाण्याच्या २१ भावना देऊन तो सुरमा डोळ्यांत घालीत जावा. (११.) **त्वग्दोषावर**—कापुर, टांकणखार, गंधक व विशेष धूप यांचा गुलाबपाण्यांत खलकरून वड्या कराव्या व ती वडी पाण्यांत उगाळून लेप करावा.

### १२४. गुळवेल. (सं. गुडूची, अमृता. गु. गळो. हिं. गुलंच).

**गुळवेलीची वेल झाडाच्या आश्रयानें असते. कोठें कोठें खडकाच्या आश्रयानेंही असते. तीस खडकी गुळवेल ह्मणतात गुळवेलीची आंतील त्वचा हिरव्या रंगाची असते. हीस बारीक फळाचे घोंस येतात, पुष्कळ दिवसांची गुळवेल असल्यास तिची जाडी पांढरीएवढी देखील असते. गुळवेल ही अनेक रोगनाशक आहे. ही कडवट आहे; परंतु इच्या गुणावरून ईस गुळवेल असें ह्मणतात. गुळवेलीचें सत्व काढतात; तेंही अनेक रोगांवर चालतें. हें सत्व मोठें शक्तिवर्धक असें आहे. औषधास गुळवेल, शेर वगैरे विषारी झाडावरील घेऊं नये, तिच्यावरची पांढरी साल व आंतील हिरवी त्वचा**

असते ती काढून टाकून उपयोगांत आणली असतां चांगली, गुणदायक होते.

**गुळवेल**—तुरट, कडू, वीर्यानें उष्ण, तिखट, ग्राहक, रसायन, बलकर, मधुर-अग्निदीपक, लघु, हृद्य, आयु:प्रद; व ज्वर, दाह, तृषा, रक्तदोष, वमि, वात, भ्रम-पांडुरोग, प्रमेह, त्रिदोष, कावीळ, आम, खोकला, कुष्ट, कृमि, रक्तार्श, वातरक्त, कंडु, भेद विसर्प, पित्त व कफ यांचा नाश करिते. ही तुपाशीं वायूचा, गुळाशीं मलबंधाचा, साखरेशीं पित्ताचा, मधाशीं कफाचा, एरंडेलाशीं वायूचा, व सुंठीशी आमवायूचा, नाश करिते. **गुळवेलीच्या पाल्याची भाजी**—तुरट, उष्ण, लघु तिखट, कडू, पाककाळीं मधुर, रसायन, अग्निदीपक, बलकर, ग्राहक, व त्रिदोष, वातरक्त, तृषा, दाह, मेह, कुष्ट, कामला व पांडु, यांचा नाश करिते. **कंदगुळवेल**—उष्ण, तिखट; व ज्वर, सन्निपात, विष, वलीपलित, व पिशाचबाधा यांचा नाश करिते. **गुळवेलीचें सत्व**—स्वादु, पथ्य, लघु, दीपन, चक्षुष्य, धातुवर्धक, मेध्य, वय:स्थापक; व वातरक्त, त्रिदोष, पांडु, तीव्रज्वर, वमि, जीर्णज्वर, पित्त, कावलि, प्रमेह, अरुचि, दमा, खोकला, उचकी, अर्श, क्षय, दाह, मूत्रकृच्छ्र, प्रदर व सोम, रोग, यांचा नाश करितें. ( १. ) **विषमज्वर** वगैरे सर्व रोगांवर—गुळवेलीचें व, त्रगाळ चूर्ण १०० भाग, गुळ व मध सोळा सोळा भाग, तूप वीस भाग घेऊन एकत्र करावीं आणि अग्निबल पाहून भक्षावीं व हितकारक आणि परिमित असें अन्न भक्षावें; ह्मणजे कोणतीही व्याधि होत नाहीं; इतकेंच नसून केंसांस पांढरेपणा, ह्मातारपण, ज्वर, विषमज्वर, प्रमेह, वातरक्त- नेत्ररोग हे होत नाहींत. हें उत्कृष्ट रसायन, जरा दूर करणारें, बुद्धि देणारें, त्रिदोषनाशक असें असून याच्या सेवनानें पुरुष १०० वर्षें वांचतो व दैत्यासारखा बलवान होतो. यास कोणी अमृतरस असें ह्मणतात. याच्या पुढें अन्यवस्तु मिश्रित रसायनें तुच्छ आहेत. ( २. ) **सर्पदंशावर**—खडक्या गुळवेलीचा कंद आणून दुधांत शिजवून ठेवावा. सर्पाच्या विषावर थंड पाण्यांत उगाळून त्यांत रिठा उगाळून द्यावा. ( ३. ) **सर्व प्रमेहांवर**—गुळवेलीचा अंगरस काढून तो पाषाणभेदाचें चूर्ण व मध अ० नुसता मध घालून द्यावा. ( ४. ) **कार्माण रोगावर**—गुळवेलीच्या रसांत अ० काढ्यांत मध घालून द्यावा; अ० पानांचा कल्क ताकाशीं प्यावा. ( ५. ) **तिमिरादिक नेत्ररोगांवर**-गुळवेलीचा अंगरस १० मासे वजन घेऊन त्यांत मध व सैंधव एकेक मासा घालून चांगलें मर्दन करून थोडथोडें अंजन करावें, ह्मणजें तिमिर, काचबिंदु, कंडू, लिंगनाश व बुबुळावरील रोग दूर होतात. ( ६. ) **आमवातावर**—गुळवेल व सुंठ यांचा काढा द्यावा; किंवा गुळवेलीच्या काढ्यांत एरंडेल घालून द्यावें. ( ७. ) **पित्तरोगावर**—गुळवेलीचा रस व खडीसाखर हीं एकत्र करून भक्षावीं, ह्मणजे तत्काल पित्त

दूर होतें. ( ८. ) **कफरोगावर**—गुळवेलीच्या काढ्यांत मध घालून तो द्यावा. ( ९. ) **अमृतादि काढा**—गुळवेल, एरंडमूळ, अडुळसा, यांचा काढा करून त्यांत एरंडेल घालून प्यालें असतां, सर्व अंगांत संचार करणाऱ्या वातरक्ताला जिंकतो. **प्रकार २ रा:**—गुळवेल व त्रिफळा यांचा काढा मध पिंपळी घालून नित्य घेतला असतां सर्व नेत्ररोगांस जिंकितो. **प्रकार ३ रा**—गुळवेल, सुंठ, आंवळकांठी, अश्वगंध, गोखरू यांचा काढा द्यावा. तेणेंकरून शूलयुक्त वातिक मूत्रकृच्छ्र दूर होतें. **प्रकार ४ था**—गुळवेल, अडुळसा, कडूपडवळ, नागरमोथा, सातवीण, खैर, काळावेत, कडू निंबाचीं पानें, हळद, दारू-हळद यांचा काढा करून घेतला असतां अनेक प्रकारचीं विषें, विसर्प, कुष्ठ, विस्फोट, कंडू, मसूरिका, ज्वर, शीतपित्त वगैरे विकार दूर होतात. **प्रकार ५ वा**--गुळवेल, सुंठ, नागरमोथा, हळद, धमासा, यांचा काढा, पिंपळीचें चूर्ण घालून वातज्वरावर द्यावा. **प्रकार ६ वा**—गुळवेल व दशमुळें यांचा काढा; ह्मणजे तेरा प्रकारच्या सन्निपातांचा नाश होतो. **प्रकार ७ वा:**—गुळवेल, सुंठ, भारंगमूळ, व्याघ्रपर्णी यांचा काढा. पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा. हा कास, श्वास यांना जिंकितो. **प्रकार ८ वा:**—गुळवेल, सुंठ, कोरांटी, चिकणा, उटकटारी, पंचमुळें, नागरमोथा, यांचा काढा करून, तो थंड झाल्यावर मध घालून द्यावा, ह्मणजे तत्काळ सूतिकारोगाचा नाश करितो. ( ९. ) **मूत्रकृच्छावर**—गुळवेलीच्या रसांत मध घालून द्यावा. ( १०. ) **मधुरज्वरावर**—गुळवेलीचा काढा मध घालून द्यावा. ( ११. ) **स्तनांत दूध येण्यास**—गुळवेलीचा काढा करून तो दूध घालून द्यावा. ( १२. ) **जंतांवर**—गुळवेल व कैशोरगुग्गुल हीं एरंडाच्या पानांच्या रसांत उगाळून पोटावर लेप द्यावा. ( १३. ) **जीर्णज्वरावर**—गुळवेलीचे काढ्यांत चतुर्थांश मध किंवा पिंपळीचें ३ मासे चूर्ण घालून द्यावें. अ० गुळवेलीचा हिम द्यावा. ( १४. ) **वातरक्तावर**-- गुळवेल सरांटे व आंवळकाटी यांच्या काढ्यांत एरंडेल अथवा मध १ तोळा घालून तो द्यावा. अ० गुळवेलीचे काढ्यांत एरंडमूळ घालून द्यावें; किंवा नुस्ताच काढा द्यावा. ( १५. ) **पित्तप्रदरावर**—गुळवेलीचा रस मध घालून द्यावा. ( १६. ) **सर्पाचे विषावर**—निंबावरील गुळवेल आणून पावशेर पाण्यांत वाटून प्यावयास द्यावी; उलटी होऊन विष उतरेल. ( १७. ) **अमृतादि काढा सर्व ज्वरांवर**--गुळवेल, धणे, कडू निंबाची साल, पद्मकाष्ट, रक्तचंदन यांचा काढा द्यावा; ह्मणजे तो जठराग्नीचें दीपन करून सर्व ज्वर दूर करितो व दाह, लाळ पडते ती तृषा, ओकारी, अरोचक हीं दूर होतात. ( १८. ) **त्रिदोषजनिक वांतिवर**—गुळवेलीचा काढा मध घालून द्यावा. ( १९. ) **सीतपित्तावर**—गुळवेलीचा काढा द्यावा. ( २०. ) **हृदयशूल व वातशूलावर**—गुळवेल व मिरें यांचें चूर्ण उष्णोदकाशीं द्यावें. ( २१. ) **अम्ल**

**तादि काढा सर्व वातरोगांवर.**—गुळवेल, एरंडमूळ, सुंठ, देवदार, रास्ना हरितकी, यांचा काढा प्रातःकाळीं द्यावा. (२२.) **चातुर्थिकज्वरावर**—गुळवेल, आंवळकाटी व नागरमोथा यांचा काढा द्यावा. (२३.) **जीर्णज्वर, कफ, प्लीहा, कास व अरुचि** यांवर—गुळवेलीचे रसांत पिंपळी व मध घालून द्यावा. (२४) **सर्पदंशावर**—ज्येष्ठमासांत गुळवेलीचा कंद स्वल्प आयासानें मिळतो. तो आणून, त्याचे काप करून दुधांत शिजवून ठेवावे हे उगाळून पोटांत द्यावे. शुद्धि नष्ट झाल्यास टाळवेवर फांसण्या घालून तेथें तो चोळावा. गुरांस देणें तो जिभेवर चोळावा ह्मणजे विष उतरतें. **गुळवेलीचें सत्व काढण्याची कृतिः**—गुळवेल आंब्यावरील अथवा निंबावरील चांगली जाड पाहून आणून तिचे चार अंगुळें लांबीचे तुकडे करून ते पाण्यानें धुवावे. नंतर पाट्यावर ठेंचून कल्हईच्या भांड्यांत चार प्रहर भिजत घालावे. मग ते हातानें चांगले कुसकरून अगर रवीनें घुसळून त्यांतील कुच्या सर्व पिळून घेऊन तें पाणी गाळून निवळत ठेवावें. कांहीं वेळानें त्यांतील सत्व तळास बसलें ह्मणजे वरील निवळ पाणी सर्व ओतून टाकावें. नंतर त्यांत पांच सात वेळ पाणी घालून त्याची निवळ टाकीत जावी; ह्मणजे तें सत्व शुद्ध व पांढरें सफेत होतें आणि त्याचा कडवटपणा सर्व जातो. मग तें सावलींत सुकवून बाटलींत भरून ठेवावें. हें घेण्याचें प्रमाण अर्ध माशापासून दोन मासेपर्यंत आहे. बहुतेक रोगांवर चालतें. याचीं अनुमानें पुढें लिहिल्याप्रमाणें जाणावीं (१.) **प्रमेहास**—गाईच्या पावशेर दुधांत २ मासे द्यावें. अथवा त्रिफळा व साखरेंत द्यावें. (२.) **जीर्णज्वरास**—तूपसाखरेबरोबर किंवा मध-पिंपळीबरोबर अथवा गुळ व शहाजिऱ्याचे चूर्णाबरोबर. (३.) **पांडुरोगास**—तूप व मधांत अथवा दुधांत. (४.) **दाहरोगास**—जिरें व खडीसाखरेबरोबर. (५.) **वायूस**—तुपांत. (६.) **पित्तज्वर व पित्तास**—साखरेंत. (७.) **कफास**—मधांत. (८.) **रक्तपित्तास**—एरंडेलांत. (९.) **आमवायूस व उदरास**—सुंठींत. (१०.) **ज्वरास**—मधांत. (११.) **शक्ति येण्यास**—गाईच्या धारोष्ण दुधांत खडीसाखर तोळाभर घालून त्यांतून मासा दोन मासे टाकून द्यावे. (१२.) **ओकारीस**—साळीचे लाह्यांत. (१३.) **अरुचीस**—डाळिंबांत. (१४.) **मुळव्याधिस**—लोण्यांत. (१५.) **काविळीस**—द्राक्षांत. (१६.) **श्वास व कास यांस**-सुंठ, मिरें, पिंपळी, मधांत. (१७.) **उचकीस**—मधांत. (१८.) **क्षयास**—तूप, खडीसाखर व मधांत. (१९.) **मुत्रकृच्छ्रास**—दुधांत. (२०.) **प्रदरास** (धुपणीस)—लोध्रांत. (२१.) **सर्व मर्मस्थानचे रोगांस**—ताकांत. (२२.) **सर्व व्याधींस**—थंड पाण्यांत. (२३.) **कुष्ठास**—रानतुळशीचे पाल्याचे रसांत. (२४.) **गुल्मास**—सुंठींत. (२५.) **सर्व नेत्ररोगांस**—म्हशीचे साजूक तुपांत.

( २६. ) **काळे केश होण्यास**--माक्याचे रसांत. ( २७. ) **अग्निमांद्यास**--गोरखमुंडीबरोबर. ( २८. ) **वलीपालित**--( अंगास वळकट्या पडून केश पांढरे होणें ( रोगास--गुळवेलीचें चूर्ण नित्य २ तोळे द्यावें. ( २९. ) **धातुस्तंभनास** गुळवेलीचें पंचांग १ तोळा चूर्ण करून मधांत द्यावें.

## भाग दुसरा समाप्त.



श्री

# वैदिकधर्म.

## धार्मिक, सामाजिक व शास्त्रीय विषयांचें मासिक पुस्तक.

एकंदर आयुष्यक्रमांत आह्मांला "धर्मा"नें वागलें पाहिजे. तो धर्म—वर्ण, आश्रम, प्रसंग व पारत्रिक इत्यादि विषयानुरोधानें—कसकसा आहे तें कळणें प्रत्येक व्यक्तीस आवश्यक असून, त्याची व्याप्तिही विशेष व्यापक व आकर्षक आहे.

बोध, कर्मणूक, व्यवहारोपयोग इत्यादि सहज प्राप्त होऊन, सुलभ रीतीनें ज्ञानवृद्धि व्हावी, अशी या मासिक पुस्तकाची व्यवस्था करण्यांत आली आहे.

त्यामुळें आबालवृद्धांनां व विद्वान्—अविद्वानांनां सारखें उपयोगीं पडण्याजोगें हें आहे. सनातन भारतधर्म—महापरिषदेच्या उदात्त तत्वानुसार हें चालू रहावें अशी योजना केली आहे.

त्याप्रमाणें—नव्या जुन्या धार्मिक विद्वानांच्या निरनिराळ्या अंगिकृत विषयांचा सर्वांस आस्वाद घेण्यास सांपडावा अशीही व्यवस्था मुद्दाम केली असून, त्याकरितां याचें संपादकत्व, वे. स. शंकर दाजी शास्त्री पदे यांजकडे दिलें आहे. त्यांच्या विचारानें, यांत कोणकोणाचे कोणकोणत्या विषयांवरील लेख प्रसिद्ध होतील हें येथें विस्तारानें सांगण्याची जरूर दिसत नाहीं. तें पुस्तकावरून कळेल.

दरमहा अंकाचीं पृष्ठें, डेमी ८ पृष्ठ साचाचीं २४ असून, कव्हराचीं पृष्ठें निराळीं असतात.

इतकें असून वर्षाची वर्गणी फक्त १ रुपया. टपालखर्च ३ आणे. उज्जेन व इंदूर या ठिकाणच्या लोकांस टपालखर्च नाहीं.

पुस्तकांतील लेख वगैरेसंबंधानें संपादकाशीं पत्रव्यवहार करणें तो "वे. सं. शंकर दाजी शास्त्री पदे, मुंबई, नवा नागपाडा" या पत्त्यावर आणि वर्गणी भरणें, नवीन वर्गणीदार होणें किंवा हरएक व्यवस्थेसंबंधाचा पत्रव्यवहार खालील पत्त्यावर करावा:—

मुख्य कार्यालयः— }
उज्जेन, प्रांत माळवा. } विनायक गणेश डोंगरे, व्यवस्थापक.

आर्यभिषक् पुस्तकावलि, अंक ५.

श्रीशंकर.

# वनौषधी-गुणादर्श.

## भाग ३ रा.

### सार्थ औषधीकल्पलतेसहित.

औषधीनां परां प्राप्तिं कश्चिद्वेदितुमर्हति ।
योगज्ञस्तस्य रूपज्ञस्तासां तत्वविदुच्यते ॥
चरकसंहितायां महर्षिरग्निवेशः ।

संपादक,

**आयुर्वेदमहोपाध्याय शंकर दाजी शास्त्री पदे.**

आवृत्ति दुसरी.

"नेटिव ओपिनियन" छापखान्यांत छापविला.



सन १९०२—शाके १८२४.

किंमत सव्वा रुपया.

## सूचना.

या भागांत या दुसऱ्या आवृत्तीचे वेळीं 'सार्थ औषधीकल्पलता' ही घातली आहे. त्याच्या शेवटीं केलल्या उपसंहाराकडे लक्ष्य द्यावें.

## अर्पणपत्रिका.

श्रीमन्महाराज सरकार सयाजीराव

गायकवाड,

सेनाखासखेलसमशेरबहादर, राज्य बडोदें.

महाराजांची देशहितैक बुद्धि,

उदार व रसिक अंतःकरण,

देशसुधारणेचे उत्कट यत्न,

विद्याप्रसाराविषयीं अत्यंत आस्थापूर्वक वर्तन, इ॰ इ॰ इ॰

अनेक सद्गुणांनां लुब्ध होउन, हें पुस्तक,

महाराजांचे सेवेशीं

अत्यंत पूज्य व सप्रेम बुद्धीनें, आज्ञानुसार

सादर करीत आहें.

# या भागांत आलेल्या वनस्पतींची वर्णवारीनें अनुक्रमणिका.



**टीप.**—पहिल्या भागांत एकंदर वस्पतींचीं वर्णनें ६६; दुसऱ्या भागांत १५४ व या तिसऱ्या भागांत ८७ आहेत.

# वनौषधीगुणादर्श भाग १ रा, विस्तृत अनुक्रमणिका.

श्रीशंकर.

# वनौषधी-गुणादर्श.

## भाग ३ रा.

### १. गेळ. (सं. मदन. मं. गेळ. हिं. गेळ.)

हें झाड फार मोठें होत नाहीं. यास दोन अंगुळेंपर्यंत लांबीचे ल्हान व मोठे कांटे असतात याचीं पानें वडाच्या पानाप्रमाणें असतात. यास सुपारीएवढीं फळें येतात, तीं पिकून पिवळीं होतात, या फळास मेणफळ असेंही नांव आहे. हीं झाडें डोंगराळ प्रदेशांत फार असतात. याच्या फळांची भुकणी करून कोळी लोक नदींत टाकतात; तेणेंकरून मासे तिला लुब्ध होऊन तेथचे तेथेंच राहतात. पावसाळ्या करितां जें धान्य संग्रह करून ठेवावयाचें, त्यांत ओलीं गेळफळें घालून ठेवावीं; ह्मणजे त्या धान्यास कीड वगैरे लागत नाहीं. चाळलेल्या राखेंत पारा मिश्र करून ती राख धान्यांत घालितात, त्याहीपेक्षां हा योग उत्तम आहे. गेळ-तिखट, कडू, मधुर, उष्ण, लेखन, लघु, रुक्ष, वांतिकारक, बस्तिकर्माविषयीं उत्तम, हितकारक; व कफ, वायु, व्रग, शोथ, आनाह, विद्रधि, गुल्म, कुष्ठ, पडसें, विष, अर्श व ज्वर यांचा नाश करितो (१.) आगंतुक पोटशूळावर-गेळफळ कांजींत उगाळून त्याचा दिवसांतून दहा पांच वेळ नाभीवर लेप करावा. (२.) पित्त पाडण्यास-गेळफळाचा रस दोन तीन पैसेभार काढून त्यांत मध घालून द्यावा. सुकें फळ असेल तर चूर्ण मधाबरोबर द्यावें, ह्मणजे वमन होऊन पित्त पडेल. (३.) सुखप्रसूतीस-गेळफळाची जननेंद्रियास धुरी द्यावी व कळलावीचे मुळास तंतू बांधून ते हातापायास बांधावे. (४.) कफवातावर-गेळफळाचें चूर्ण दुधांत घालून द्यावें; ह्मणजे वमन होऊन कफवायूची पीडा दूर होते.

(५.) अर्धशिशीवर–सूर्योदयापूर्वी गेळफळ व खडीसाखर गाईच्या दुधांत उगाळून त्याचें नस्य द्यावें. (६) गाजगुंड व धांवऱ्यावर–गेळफळ निंबाचे रसांत उगाळून लावावें. (७.) उवा मारण्यास–गेळफळांचा रस काढून डोक्यास लावावा ह्मणजे चार घटकांत उवा मरतात. (८.) स्तनरोगावर–गेळफळ थंड पाण्यांत उगाळून लेप द्यावा (९.) ओकारी होऊन कफ पडावयास–गेळफळ १ तोळा, सैंधव ।। तोळा व पिंपळी दीड मासा यांचें चूर्ण करून तें ४ मासे ऊन्ह पाण्याशीं द्यावें.

२. गोकर्णी (सं.) (गु. गरणी. हिं. अपराजिता.)

गोकर्णीचा वेल प्रसिद्ध आहे. गोकर्णीत पांढरी व काळी अशा दोन जाति आहेत. गोकर्णीस लांबट शेंगा येतात. हिचीं फुलें आकारानें गोकर्णासारखीं असतात. फुलांचा पूजेकडे उपयोग होतो. पांढरी गोकर्णी जास्त आहे. गोकर्णीस "सुपली" "काजळी" असेंहि ह्मणतात. पांढरी गोकर्णी–तिखट, शीत, कडू, बुद्धिप्रद, चक्षुष्य, तुरट, सारक, विषनाशक; व त्रिदोष, मस्तकशूळ, दाह, कुष्ठ, शूळ, आम, पित्तोपद्रव, सूज, कृमि, व्रण, कफ, ग्रहपीडा, शीर्षरोग, व सर्पविष यांचा नाश करिते. काळी गोकर्णी–कडू, स्निग्ध, त्रिदोषनाशक, शीतवीर्य; व वायु, पित्त, कफ, ज्वर, दाह, श्रम, पिशाचबाधा, रक्तातिसार, उन्माद, मद, अतिकास, दमा, कफ, कष्ठ, जंतु, क्षय यांचा नाश करिते. वरकड गुण श्वेतगोकर्णीसारखे आहेत. (१.) कुष्ठावर–पांढऱ्या गोकर्णीचें मूळ पाण्यांत उगाळून लेप करावा; ह्मणजे पांढरें कोड एका महिन्यांत जातें. गोकर्णीच्या बिया तुपांत तळून त्यांचें चूर्ण उष्णोदकांतून द्यावें. (३.) मस्तकशूळास व अर्धशिशीस–पांढऱ्या गोकर्णीचें मूळ पाण्यांत उगाळून नाकांत घालावें (४.) तिडीक पडण्यास–पांढऱ्या गोकर्णीची मुळी थंड पाण्यांत उगाळून द्यावी. रोज ७. (५.) हरताळाचे विषावर–पांढऱ्या गोकर्णीचे पाल्याचा रस द्यावा. (६.) अर्धशिशीवर–पांढऱ्या गोकर्णीच्या बिया आणि मूळ एकत्र वाटून

त्याचा लेप करावा किंवा पांढऱ्या गोकर्णीचें मूळ कानास बांधावें. (७.) कफविकारावर-पांढऱ्या गोकर्णीच्या मुळीचा रस शक्तिप्रमाणें दोन तोळेपर्यंत गाईच्या निरसे दुधांतून द्यावा. (८.) नाळगुदास-पांढऱ्या गोकर्णीची वेल कंबरेस बांधावी. (९.) एकाहिकविषमज्वर-गोकर्णीच्या रसाचें नस्य द्यावें. (१०) गर्भपातावर-पांढऱ्या गोकर्णीचें मूळ दुधांत उगाळून द्यावें ह्मणजे पडणाऱ्या गर्भाचें स्तंभन होतें. (११.) नारूवर-पांढऱ्या गोकर्णीचें मूळ वाटून लेप द्यावा. (१२) यकृत, प्लीहा व जलोदरावर-गोकर्णीच्या बियांचें चूर्ण ३ मासे उन्ह पाण्याशीं द्यावें.

### ३. गोरखचिंच. (सं. गोरक्षी. गु. गोरख आमली.)

हीं झाडें मोठमोठीं होतात. गोरखचिंचेच्या झाडाचीं पानें कांहींशीं सांवरीच्या पानासारखीं असतात. या झाडावर वीतभर लांबीचीं दुध्याभोपळ्याप्रमाणें फळें येतात. या फळांची बाहेरची साल कठीण असते. या फळांत पिठाचे गोळे असतात. हें पीठ फार आंबट आहे. याचा चिंचेऐवजीं उपयोग करितात. हें पीठ पित्तशामक, रुचिकर, पथ्यकारक आहे. हीस "चोरचिंच" असेंही ह्मणतात. गोरखचिंच—मधुर, कडू, शीत असून, दाह, ज्वर, पित्त, विस्फोट, वमि, अतिसार यांचा नाश करिते. (१.) दम्यावर—गोरखचिंचेचें पीठ ३ मासे घेऊन, तें ओल्या अथवा सुकलेल्या अंजिरांत घालून सेवन करावें. अम्लपित्तावर—गोरखचिंचेच्या गिराचा अष्टमांश काढा करून द्यावा; अ. गोरखचिंचेच्या गिराचें सरबत करून त्यांत जिऱ्याची व साखरेची पूड घालून द्यावें (३.) अतिसारावर व धुपणीवर—गोरखचिंचेच्या गिराचें सरबत करून साखर टाकून प्यावें. (४) गुरास मुसळ्या रोग होतो त्यास--गोरखचिंचेचा मगज पाण्यांत कालवून पाजावा. (५.) गर्मीचे चट्टे, खांडूक व सर्व प्रकारच्या जखमेवर—गोरखचिंचेच्या बियांची काळी राख करून ती तेलांत कालवून तें मलम लावावें.

### ४. गोरखमुंडी. ( सं गोरक्षमुंडी गु. गोरखमुंडो ) ( हिं. मुंडी. )

हीस 'बोंडथरा' असेंही ह्मणतात. हांत दोन प्रकार आहेत; लहान व मोठी. लहान झाडें सुमारें वीतभर उंच वाढतात. मोठीं हातभर उंच होतात. या झाडावर लहान सुपारीएवढीं अफूच्या बोंडासारखीं गुलाबी रंगाचीं बोंडें येतात. या झाडाचीं पानें बारीक असून तीं लांबट असतात या झाडास वास फार उग्रट येतो. हीं झाडें ओलसर जमिनींत होतात. गोरखमुंडी—तुरट, उष्ण, पाककाळीं तीक्ष्ण, कडू, मधुर, भेदक, मेधाकारक, बलकर, रसायन; व गलगंड, गंडमाला, अपची, कफ, वायु, प्लीहा, मेद अपस्मार, श्लीपद, पांडूरोग, पित्त, आमरोग, कृमि, दमा, कुष्ठ, विषदोष, अतिसार, वांति यांचा नाश करिते. महामुंडी—मधुर, कडू, उष्ण, रसायन, रुच्य, स्वर्य; व प्रमेह, वायु यांचा नाश करिते. बाकीचे गुण गोरखमुंडी सारखेच आहेत. (१) गंडमाला व कावीळ यांवर गोरखमुंडीचा अंगरस काढून पाजावा; व गंडमालेवर गोरखमुंडीचें मूळ तिच्याच रसांत उगाळून लेप करावा (२.) सर्व प्रकारच्या वायूवर—गोरखमुंडीचा रस लावावा ह्मणजे वाय तेव्हाच बरा होतो. (४.) बारीक पिस्वा होतात त्या जाण्यास—गोरखमुंडीचीं झाडें आणून घरांत बांधावीं; ह्मणजे त्यांच्या उग्र वासानें पिस्वा पळून जातात. (५.) संधिवातावर—गोरखमुंडीचीं बोंडें बारीक वटून त्याचा लेप करावा. (६.) विषगुल्मावर.—गोरखमुंडीचें मूळ पाण्यांत वाटून ताक घालून तें तोळाभर प्यावें. (७.) वैपादिक कुष्ठ-ह्मणजे ज्याच्या योगानें हातपाय फुटून चिरा पडतात त्यावर—गोरखमुंडीच्या रसांत घृत सिद्ध करून लावावें. (८.) मुळव्याधीस—गोरखमुंडीच्या पंचांगांची भुकी खावी.

### ५. गोखरूं ( सं. गोक्षुरक. गु. गोखरू हिं. गोक्षुर. )

गोखरूंचीं झाडें लहान असतात. यांचीं पानें तिळाच्या पानांसा-

रखीं असतात. हीं झाडें पावसाळ्यांत उत्पन्न होतात. या झाडांवर लहान बोरांएवढीं फळें येतात; त्यांस गोखरूं ह्मणतात. या फळावर चार बाजूस चार कांटे असतात. गोखरूंची दुसरी एक लहान जात आहे; तीस "सराटे" असें ह्मणतात. तिचें वर्णन निराळें केलें आहे. गोखरूंच्या अभावीं सराटे घेतात. दशमूळांत गोखरूमूळ येतें. गोखरूं हें पौष्टिक आहे. **गोखरू**—शीतळ, बलकारक, मधुर, बृंहण, बस्तिशुद्धिकारक, वृष्य, पौष्टिक, रसायन, अग्निदीपक, स्वादु; व मूत्रकृच्छ्र, अश्मरी, दाह, मेह, दमा, खोकला, हृद्रोग, अर्श, बस्तिवात, त्रिदोष, कुष्ठ, शूळ व वायु यांचा नाश करितें. औषधांत यांचें पंचांग व फळेंही घेतात. (१) **पांडुरोगावर**—गोखरूंचा काढा मध व साखर घालून द्यावा. (२.) **प्रमेहावर**—गोखरूचें चूर्ण साखरेशीं द्यावें. (३) **मूत्रकृच्छ्र व उष्णवायूवर**—गोखरूंच्या झाडाचा अ० गोखरूंचा काढा करून, आंत मध व खडीसाखरेची पूड घालून द्यावा. (४.) **पुष्टतेस**—गोखरूंची पूड करून नित्य—दूध पावशेर, तूप ४ तोळे, खडीसाखर १ तोळा, यांतून नित्य ३ मासेप्रमाणें घ्यावें. यानें अंगात भिनलेले उपदंशविकार नाश पावतात. (५.) **उष्णप्रमेहावर, तिडक्या प्रमेहावर व मूत्राघातावर**—गोखरूंचीं ओलीं झाडें आणून एका परातींत थोडें पाणी घेऊन त्या पाण्यावर दहा पाच वेळ जोरानें मारून वर उचलीत रहावें, व दहा पांच वेळ त्या पाण्यांत फिरवावीं; ह्मणजे सर्व पाणी बोळासारखें थलथलीत जाड होईल. त्यात खडीसाखरेची पूड व जिऱ्याची पूड घालून द्यावें दि० ७. पथ्य गव्हांची रोटी, तूप, साखर, तुरीचें अळणी वरण. (६) **आमवातावर**—गोखरूं व सुंठ यांचा काढा नित्य सेवन केला असतां, तो आमवात व कटिशूळ याचा नाशक व पाचक आहे. (७.) **प्रमेहावर**—गोखरूचे पाल्याचा रस पावशेर, त्यांत सबजाचें बीं १ तोळा वाटून एकत्र करून घ्यावें. (८.) **इंद्रलुप्त-ह्म० चाईवर**—गोखरूं, तिळाचीं फुलें, मध, तूप हे समान घेऊन मस्तकाला

लेप करावा. (९.) गर्भशूळ म्हणजे गर्भपातानंतर कांहीं दिवस शूळ उत्पन्न होतो त्यावर-गोखरूं, ज्येष्ठमध व द्राक्षें दुधांत वाटून त्यांत साखर घालून तें द्यावें. (१०.) मुतखड्यावर-गोखरूंचें चूर्ण व मध हीं मेंढीचे दुधांत द्यावीं. (११.) मूत्रकृच्छ्र व उन्हाळी यावर—गोखरूंचें चूर्ण करून दुधांत खडीसाखर टाकून त्यांतून द्यावं. (१२) गोक्षुरादिघृत-घणे, गोखरूं यांचा काढा किंवा कल्क यामध्यें घृत सिद्ध करावें; तें मूत्राघात, मूत्रकृच्छ्र, दारुण शुक्रदोष यांवर हितकारक आहे. (१३) गोक्षुरादिअवलेह-गोखरूचें पंचांग १०० तोळे घेऊन, तें ४०० तोळे पाण्यांत उकळवून १०० तोळे पाणी उरवावें. मग त्यांत ५० तोळे साखर घालून चांचणी करावी आणि त्यांत सुंठ, पिंपळी, मिरीं, दालचिनी, एलची, नागकेशर, तमालपत्र, जायफळ, अर्जुनसादड्याची साल, कांकडीचें बीज हा प्रत्येक दोन दोन तोळे व वंशलोचन ४ तोळे घालून अवलेह तयार करावा. हा मूत्रसंबंधीं रोगांवर फार उत्तम आहे. लघ्वींत रक्त पडतें त्यास, मूत्राघात, मूत्रकृच्छ्र वगैरे रोगांस यापासून चांगला फायदा होतो.

६. गोंधणी. ( सं. लघुशेलु. )

हा वृक्ष देशावर प्रसिद्ध आहे. भोंकरीच्या जातीपैकींच हा वृक्ष आहे. हा वृक्ष बराच उंच वाढतो. यास लालरंगाची फळें येतात, तीं भोंकरापेक्षा गोड लागतात. हीं फळें लोक मोठ्या आवडीनें खातात. हीं फळें पौष्टिक आहेत. या फळांतील चीक गोंदासारखा उपयोगी पडतो. याचें लांकूड चिवट असून सुतारकामासही उपयोगी पडतें. गोंधणी—वातकारक, मधुर, किंचित् शीतल, कृमिनाशक व स्तंभकारक आहे. (१) दांत दुखतात त्यांस—गोंधणीच्या सालीचा काढा करून त्याच्या गळण्या कराव्या (२.) पौष्टिक लाडू—याचीं फळें वाळवून त्यांचें चूर्ण करून साखरेच्या पाकांत लाडू बांधावे. हे पौष्टिक असून याच्या योगानें कंबरेस बळकटी येते.

## ७. गोमेटी. ( सं. वनतुंडी. )

वईवर व कुंपणांवर गमेटीचे वेल आपोआप होतात. कोंकणांत हे वेल पुष्कळ होतात. याचीं पानें किंचित् लांबट व थोडीं जाड अशीं असतात. त्यास रानपडवळासारखें बोटभर लांब व सोनेळ्या केळ्याएवढें जाड असून देठाकडील बाजूस किंचित् जाड असें फळ येतें. ही भाजी कोंकणांत प्रसिद्ध आहे. गोमेटें हें फळ गुळमट आहे. हीं फळें कुळंबी वगैरे लोक खातात. गोमेटी—मधुर, शीतल, लघु; व दंतपीडानाशक आहे. ( १. ) आगंतुक गर्भावर—गोमेटीची मुळी, गाईचें तूप सुमारें तीन तोळेपर्यंत घेऊन त्यांत एक तोळापर्यंत उगाळावी आणि थोडी खडीसाखर घालून, प्रत्यहीं दोनवेळप्रमाणें सतत सात दि० द्यावें. ( २. ) धातु पडत असल्यास—गोमेटीचें मूळ ठेचून रस काढावा. त्यात गाइचें निरसें दूध, खडीसाखर व जिऱ्याची पूड घालून द्यावें. हें औषध दोंहो सांज द्यावें ह्मणजे तीन दिवसांत गुण येतो. ( ३. ) विंचा उतल्यास त्यावर—गोमेटीच्या पानांचा रस लावावा ह्मणजे त्वरित गुण येतो. ( ४ पष्टेवर—भाजलेला पाढरा कांदा, गोमेटीचें मूळ, जिरें व खडीसाखर एकत्र बारिक वाटून त्यात तूप घालून द्यावें. हें औषध मुलांनाही देण्यास योग्य आहे दुसरा प्रकार—गोमेटीचें मूळ गाईच्या दुधात उगाळून त्यांत तूप व खडीसाखर घालून द्यावें ( ५. ) पित्तावर—गोमेटीच्या फुलांचें चूर्ण तूपसाखरेशीं द्यावें.

## ८. गोंडाळ. ( सं गुंडाला. )

गोंडाळ हें तळ्यांत किंवा इतर जलाशयांत पाण्यावर होतें. यांत लहान मोठें अशा दोन जाति आहेत. गोंडळांस चार पांच पाकळ्या असतात. गोंडळ्याची वाढ फार जलद होते. विहिरींत एकाद दुसरें गोंडाळ टाकलें कीं थोडक्याच दिवसांत हें सर्व विहीरभर होतें. विहिरींतील पाणी स्वच्छ राहण्यासाठीं बहुधा हें विहिरींत टाकतात; परंतु याची उत्पत्ति फार झाल्यास पाणी बिघडतें. याकरितां यास फार वाढूं

देऊं नये; वरचेवर वाढ कमी करीत गेल्यास पाणी स्वच्छ राहतें. (१) मूत्राघात (मूत्र बंद होणें) यावर—गोंडाळ आणून वाटून त्याचा नाभीवर लेप द्यावा. (२.) मुलाच्या खोकल्यावर—गोंडाळ विड्यांत चावून त्याचा रस पाजावा.

## ९. गोराडूं.

गोराडूंच्या वेलाचीं पानें नागवेलीच्या पानासारखीं लांबट व टोंकदार असतात. या वेलाचे कंद रताळ्यासारखे लांबट व तांबूस रंगाचे असतात. यांची उत्पत्ति गुजराथ व खानदेशांत विशेष होते. याच्या मुंडल्या लावलेल्या असतात; त्यांपासून एक वर्षानें माठाल्या रताळ्याएवढाले हे कंद होतात. यास कोंकणांत "कोनफळ व नागरचिनें" असें ह्मणतात. गोराडूची भाजी उत्तम होते; ही बटाट्याच्या भाजीप्रमाणें करावी. ही पौष्टिक आहे. हे कंद सोलून पातळ काप करून सुकवून नंतर त्याचें पीठ करून ठेवावें. मुळास तवकिरीप्रमाणें याचाही उपयोग करितां येतो. (१.) नाळगुदावर—गोराडूचा कंद ठेंचून फडक्यांत घालून पिळावा व जो चलक निघेल त्यांत पांढऱ्या गोकर्णीचें मूळ उगाळून त्याचा सर्वांगास लेप द्यावा, ह्मणजे ओढा बसून सूज उतरते.

## १०. गोंवारी. (सं. गौराणी.)

गोंवारीचें झाड दोन तीन हात उंच वाढतें. गोंवारीच्या शेंगांची कोंवळेपणीं भाजी चांगली होते. जून गोंवाऱ्या सुकवून त्यांतील बिया काढून गुरांस घालतात. गोंवारीच्या शेंगा भाजीसाठीं वाळवूनही ठेवतात. गरोदर स्त्रियांनीं किंवा ज्या स्त्रियांचीं मुलें स्तनपान करण्यासारखीं असतात त्यांनां गोंवारीची भाजी खाऊं नये; कारण त्यांच्या मुलांस आंकडीचा रोग उद्भवण्याची भीति असते. गोंवारीच्या शेंगा—रुक्ष, वातकर, मधुर, गुरु, सारक, कफकर, अग्निदीपक व पित्तनाशक आहेत. (१.) गजकर्णावर—गोंवारीच्या पाल्याचा रस व लसुणाचा रस यांचा

लेप करावा. (२.)नाडीव्रणावर–गोंवारीचे पाल्याचे रसांत कांकड भिजवून युक्तीनें व्रणांत घालीत जावा.

## ११. गोळ.

हे वृक्ष गोमांतक प्रांतांत आहेत. हे छायावृक्ष आहेत. यांचा विस्तार मोठा असतो; यांस वडासारख्या पारंब्या फुटून हे वाढत असतात. यांचीं पानें कांहींशीं जांभळीच्या पानांसारखीं असतात. हे वृक्ष सुमारें पांच सहाशें वर्षेंपर्यंत वांचतात.

## १२. गौरीच्या फण्या.

या लहान लहान वेली पाण्याच्या आश्रयास, भिंतीवर अगर विहिरीवर पायऱ्यांकडेस उगवतात. या वेलीचीं पानें तळहाताच्या आकृतीसारखीं असतात. यांची दांडी काळी असते. (१.) घांवऱ्यावर–या वेलीचा पाला वाटून लेप करावा, ह्मणजे तत्काळ घांवरें बरें होतें. (२.) आगपैणीवर–या वेली सुकवून त्यांची काळसर रंगाची [ कर्च्या ] राख करावी. ही राख तिळांचे तेलांत खलून लावावी ह्मणजे दाहशमन होऊन आगपैण चार दिवसांत बरी होते. (३) हिंगरूड (ज्यांतांत पांढरे अंकुर येतात ते) झाल्यास–या वेलीची राख, कळीचा चुना व चित्रकमूळ उगाळून हिंगरूड खुंटून टाकून त्वरित हें औषध वर लावावें (४) प्रदर ह्म० धुपणीवर–या वेलीच्या पाल्याचा रस गाईच्या दुधांतून घ्यावा.

## १३. गौळण.

हीं झाडें गवताप्रमाणें जमिनीवर पसरतात. हिचीं पानें बारीक असून हिच्या फांद्या सात आठ अंगुळें लांबीच्या असतात. (१.) घांटसर्पास गौळणीचें फळ बियासुद्धां अर्धवट कुटून चिलमींत घालून ओढावें, अ. नुसतें गवळणीचें बीज पाण्यांत उगाळून पाजावें.

## १४. घणसरी.

हीं झाडें मोठमोठीं होतात. यांस "गानसुरी" असेंही ह्मणतात. घणसरीचीं पानें बिब्याच्या पानासारखीं असतात. या पानास दर्पट वास

येतो, (१.) घोणसाचे व फुरशाचे विषास-घणसरीचें पाळ उगाळून त्यात थोडी सुंठ उगाळावी व पोटात द्यावें. रेच होतील व वमनही होईल. विषानें अंगावर गांठी असल्यास तेंच पाळ उगाळून अंगावर लावावें. (२.) रेचक—घणसरीचें पाळ उगाळून द्यावें. उतार तूपभात. (३.) पुळी, नखरूड वगैरेवर-घणसरीचें पाळ व वाकेरीचें भात पाण्यांत उगाळून लेप करावा. (४.) पाल, कांळी इत्यादिकांचे विषावर—घणसरीचे पाल्याचा गोमूत्र घालून रस काढून, त्यांत घणसरीचें पाळ उगाळून अंगास मर्दन करावें (५) गुरांस कुसड्या घणसाचा विषार लागल्यास—घणसरीचे पाल्याचा पाणी घालून एक शेरपर्यंत रस काढावा व त्यांत घणसरीचीच मुळी एक तोळापर्यंत उगाळून तो पाजावा. याप्रमाणें ३ दिवस द्यावें; आणि रिठ्याचे पाण्यांत घणसरीचें मूळ उगाळून कुजलेल्या जागीं वारंवार लेप करावा.

## १५. घायपात.

अननस अथवा केतक या झाडासारखींच घायपातीचीं झाडें असतात. हीस " घायाळ " असेंही ह्मणतात. हिच्या पात्या अननसाच्या पात्यांहून रुंद असून, त्यांच्या शवटास वांकडे व करवताप्रमाण कांटे असतात. घायपातीच्या पात्या भिजत घालून ठेंचून त्यांचें सून काढून मग दोर वळतात. हे दोर मजबूत होतात. (१.) मुसळ्या रोगावर (गुरांस व माणसांस मोडशी सारखा रोग होतो.)—घायपातीच्या कांद्याचा रस पाजावा. (२.) जखमेवर—घायपातीची पती वाटून लावावी.

## १६. घायमारी. (सं. अस्थिभक्षा)

घायमारीचीं झाडें ओलसर जमिनींत होतात. या झाडाची उंची सुमारें दोन हात असते हिच्या पानांचा आकार पर्णबीजाच्या पानासारखा असतो घायमारीस तुरा येऊन त्यास फळें येतात. या फळांचा आकार लांबट असतो. फळाचा रंग प्रथम हिरवा असून नंतर तांबडा होत जातो. (१.) घाय भरण्यास—घायमारीचे पाल्याचा रस का-

ळून तो जखमेवर घालावा ह्मणजे जखम लवकर भरून येते. ( २ ) मुलांच्या रक्तातिसारावर—घायमारीच पाल्याचा रस काढून त्यांत गाईचें तूप मिश्र करून तो रस पाजावा. हें औषध मोठ्यां मनुष्यासही द्यावें.

## १७. घासपित्तपापडा. ( सं. पर्पटक. )

यास देशावर " खडकरोपू " व " धुई " असें ह्मणतात. हीं झाडें जमिनीवर पसरतात. यांचीं पानें बारीक असतात. हीं झाडें बहुधा माळजमिनीवर होतात. या झाडावर बारिक बोंडामारखे तुरे येतात. हीं झाडें प्रसिद्ध आहेत. पित्तपापड्यापेक्षां हीं झाडें जास्त गुणकारी आहेत. घासपित्तपापड्याची भाजी चांगली होते. पित्तपापडा—शीतळ, कडू, ग्राहक, वातकारक, लघु, पाककाळीं तिखट; व पित्त, कफ, ज्वर, रक्तदोष, अरुचि, दाह, ग्लानि, भ्रम, मद, प्रमेह, ओकारी, तृषा, रक्तपित्त यांचा नाश करितो. याची भाजी—संग्राही, शीतल, वातकारक, लघु, कडू, व रक्तविकार, पित्तज्वर, तहान, कफ, भ्रम दाह, यांचा नाश करिते ( १. ) पित्तानें घेऱ्या येतात यास—घासपित्तपापड्याची वस्त्रगाळ पूड करून खोबऱ्याचे तेलात कालवून मस्तकावर जाड लेप द्यावा. ( २ ) पित्तज्वरावर—घासपित्तपापड्याचा काढा द्यावा. ( ३. ) साधारण ज्वरावर—घासपित्तपापड्याचा काढा करून, त्यांत गारगोटी विस्तवांत लाल करून विझवावी व तो द्यावा ( ४. ) तृष्णा, अरुचि व ग्लानि यांवर—घासपित्तपापडा, किराईत, गुळवेल, धणे, रक्तचंदन, वाळा, व पद्मकाष्ठ याचा काढा द्यावा. ( ५. ) ओकारीवर—घासपित्तपापड्याचा काढा मध घालून द्यावा.

## १८. घेवडा ( सं निष्पावी. )

घेवड्याचा वेल बराच मोठा वाढतो हे चार पांच वर्षेंही टिकतात. घेवड्यास त्रिदल पानें येतात. घेवड्यांच्या शेंगांची भाजी चांगली होते. आंतील दाण्यांची उसळ करितात. घेवड्यां चवधारी घेवडा, ओटघेवडा, गर्वा, पांढरा व काळा अशा अनेक जाति आहेत. घेवडा—वातकर,

कृच्य, तुरट, मधुर, मुखाला प्रिय, कंठशुद्धिकारक, ग्राहक,) अग्निदीपक; व कफ, पित्त यांचा नाश करितो. **थोर घेवडा**-रुचिकर, वातल, अग्निदीपक व मुखाला प्रिय असा आहे. **काळा घेवडा**-कंठ्य, मेध्य, अग्निदीपक, तुरट, रसकाळीं मधुर, रुचिकर, व ग्राहक असा आहे **पांढरा घेवडा**-वात, कफ यांना करणारा, विषनाशक, असा आहे. बाकड गुण काळ्या घेवड्यासारखेच आहेत. पिवळा घेवडा याहून गुणांनीं अधिक आहे. (१.) **विंचवाचे दंश वर**—घेवड्याच्या पाल्याचा रस लावावा. (२.) **कळ्‌ळीस**—सातवर्षी घेवडीच्या पाळाचें भातें (भूमींतील गांठ) गाईच्या निरशा दुधांत उगाळून पोटांत द्यावें व त्याचाच लेप करावा. (३.) **पाय किंवा गुडघा मुरगळला** असल्यास—घेवड्याचा पाला व बिबे एकत्र वाटून ऊन करून वर बांधावें. (४.) **विषमज्वरावर**-सातवर्षी घेवडीचे मूळ काढून कानांत बांधावें ह्मणजे विषमज्वर दूर होतो.

## १९. घोंटी (सं. गुलघंटिका.)

घोंटीस "घोट" "घोटबोर" "रानबोर" असेंही ह्मणतात. घोंटीचें झाड बोरीच्या झाडाप्रमाणें असतें. हीस बोरीप्रमाणेंच बारीक फळें येतात. वैदूलोक "बत्तिशी" ह्मणून जें औषध देतात त्यांत हीं फळें असतात. घोंटी ही मधुर, तिखट, उष्ण, अग्निदीपक, पाचक; व कावीळ, रक्तदोष, सूज, कफ, वायु, पित्त, व्रण, कुष्ठ, कंडू यांचा नाश करिते.

## २०. घोंटीवेल.

घोंटीचे वेल पर्जन्यकाळीं उत्पन्न होऊन वृक्षावर पसरतात. यांचा पुष्कळ विस्तार होतो. घोंटीवेलाचीं पानें मोठीं असून त्यांवर जाड शिरा असतात. या वेलीस पेरें असून बारीक कांटे असतात. या वेलास हरभऱ्याएवढ्या फळांचे घोंस येतात. (१.) **रेडवास मुरळ्यारोगाचे रेच होत असल्यास त्यावर**—घोंटवेलीचीं ओलीं अगर वाळलेलीं फळें व मेथ्या बारीक वाटून दह्यांत कालवून, त्यांत थोडी हिंगाची पूड घालून तें पाजावें; ह्मणजे रेच त्वरित बंद होतात.

## २१. घोणसकांडें ( सं. गोनसी. )

घोणसकांड्याची वेल असते. या वेलीची जाडी पायाच्या आंगठ्याए-वढी असून ही आकारानें घोणससर्पासारखी दिसते. हिचा रंग हिरवा असतो. हिचीं पानें आकृतीनें पिंपळाच्या पानासारखीं असून तीं त्यापेक्षां चौपट मोठीं असतात. या पानांस एकेक बोट रुंदीचे खाचे असतात. घोणसकांडें-शीतल, गुरु; व शूल, उचकी, जीर्णविष, सर्पविष, उन्माद यांचा नाश करितें. (१) गुरांस आग्या घोणसाचा व कुसड्या घोणसाचा विषार लागल्यास-घोणसकाड्यांचा रस शेरभर द्यावा. कुसड्या घोणसाच्या विषास सात दिवस औषध द्यावें. (२.) मनुष्यास घोणसाच्या विषारावर-घोणसकांड्याचे रसांत घणसरांचें पाळ, रिठा व कडू कारळे वाटून गोमूत्र घालून दंशावर लेप द्यावा.

## २२. घोंसाळी. (सं. घोषका )

घोंसाळीचा वेल बराच वाढतो. हिच्या फळास घोंसाळें ह्मणतात. हींत दोन जाति आहेत; माठ व सातपुती. माठघोंसाळीच्या देंटास फक्त एकच फूल व फळ येतें. सातपुतीस अधिक येतात व तुरा येतो माठघोंसाळें चवीस अधिक चांगलें आहे. घोंसाळी ही एक शिराळ्याचीच जात आहे. घोंसाळ्याची भाजी व भजीं फार उत्तम होतात. हीं शिराळ्यापेक्षां फार चवदार आहेत. बहुतेक भाज्यांपेक्षां हीं फार मिष्ट लागतात. घोंसाळ्यास "पारोसें" असेंही ह्मणतात. मोठी घोंसाळी-शीतल, मधुर, वातल, अग्निदीपक, कफकर, पित्तल; व दमा खोकला, ज्वर व कृमि यांचा नाश करिते. सातपुती-शीतल, हृद्य, पाककाळीं तिखट, कडू; व पित्त, विष, खोकला, ज्वर व वायु याचा नाश करिते. (१.) मुलांचे छातींत दुखत असल्यास त्यावर-घोंसाळें भाजून त्याचा रस १ मासाभर पाजावा. (२.) सुजेवर-घोंसाळीचे पानांचा रस गोमूत्रांत घालून उष्ण करून लावावा. (३) नळगुदावर-घोंसाळीच्या पानाचा रस २ तोळे प्यावा व पाला सुजेवर वाटून लावावा. (४.) व्रण, व्रग,

गर्मीचे चट्टे वगैरे बरे होण्यास अनुभविक मलम-घोसाळीच्या वेलाची ओली पानें कुटून त्यांचा अंगरस एक शेर काढावा. त्या रसांत गाईचें किंवा शेळीचें जितकें जुनें मिळेल तितकें जुनें तूप पक्का अच्छेर घालावें, कल्हईचे भांड्यांत अग्नीवर शिजत ठेवून त्यांतील सर्व रस आटवावा. नंतर जें तूप अवशेष राहील त्यांत शुद्ध मेण ९ तोळे टाकावें. तें मेण वितळून तुपाशीं एकत्र झाल्यावर अग्नीवरून उतरून एका परातींत पाणी भरून घेऊन त्या पाण्यांत तें औषध गाळून ओतावें. नंतर प्रहरानें परातींतील पाण्यावर भाकरीसारखें जमून राहिलेलें औषध मिळेल. तें घेऊन, पातळ चौघडी कपड्यावर ठेवून त्याजवर झांकण, तसाच पातळ चौघडी कपडा ठेवून, हलक्या हातानें दाबावें या योगानें त्यांत असलेल्या पाण्याचा द्रव निघून जाईल. नंतर हें मलम एका डब्यांत भरून ठेवावें व जखमेवर लावावें ह्मणजे जखम त्वरित भरून येते.

## २३. घोळ. ( सं घोलिका )

घोळीचें झाड मोठें होत नाहीं. हिचें पान कांहींसें वाटोळें असून जरा तांबूस रंगाचें असतें. घोळीस फार लहान बोंड येऊन त्यांत काळ्या रंगाचें बारीक बीं असतें. घोळींत दोन जाति आहेत. एकीस लहान अथवा रानघोळ आणि दुसरीस मोठी अथवा राजघोळ असें ह्मणतात. रानघोळीचीं पानें रंगानें फार तांबूस व राजघोळीपेक्षां लहान परंतु चरबट अशीं असतात. या झाडांचें बेटचेंबेट माजतें राजघोळीचीं पानें व झाडें जरा मोठीं असून कांहीं कोमल असतात. घोळीची पातळ भाजी करितात हिचा गरीब लोकांतच खप होतो. ही भाजी थंड असून फार खाण्यांत आली तर हगवण—आमांशादि उपद्रव होतात. घोळ—रुचिकर, खारट, पित्तळ, आंबट, सारक, कफकर, उष्ण; व वायु, त्वग्दोष, गुल्म, व्रण, श्वास, कास, नेत्ररोग, मेह व सूज यांचा नाश करिते, मोठी घोळ-रुक्ष, आंबट, खारट, रुचिकर, तिखट, गुरु, अग्निदीपक, कफनाशक; व वायु, अर्श, अग्निमांद्य, विष व शुक्र यांचा नाश करिते. क्षुद्रघोळ—पित्तळ, सारक,

कफकर, तिखट; व जीर्णज्वर, श्वास, कास, गुल्म, मेह, शोथ, यांचा नाश करणारी; रसायन, वातनाशक, उष्ण, ओवरं; व नेत्ररोग, चर्मदोष व व्रण यांची नाशक आहे. (१.) लघवीची फार आग होत असल्यास व उन्हाळ्यास-बोळीच्या भाजीचा रस काढून त्यांत खडीसाखर टाकून तो सकाळ संध्याकाळ द्यावा. तीन दिवसांत आग शांत होते.

## २४. चंदनबटवा (सं. चांडिल.)

चंदनबटव्याचें झाड दोन पावणे दोन हात वाढतें. याचें पान नाजूक असून, खालच्या बाजूनें कांहींसें तबूस अथवा गुलाबी रंगाचें असतें. ही भाजी लवकर सुकते. गुजराथ, उत्तरहिंदुस्थान व देशावर याचें उत्पन्न फार होतें. चंदनबटव्याची भाजी करितात. या भाजीचा गरीब लोकांत फार खप होतो. चंदनबटवा—खारट, पाककाळीं स्वादु, बलप्रद व विशेषें करून त्रिदोषनाशक आहे. (१.) गुरांत वाऱ्याप्रमाणें रोग होतो त्यावर—चंदनबटव्याच्या लाकडाचा कोळसा तुपांत वाटून घोड्यानें पाजावा. दि० ३.

## २५ चंद्रुस.

चंद्रुसाचे वृक्ष दक्षिण हिंदुस्थानांत होतात. हा धूपाच्या जातीचा वृक्ष आहे. चंद्रुसाचे वृक्ष आफ्रिकाखंडांत फार आहेत. या वृक्षाचा जो चीक निघतो त्यास चंद्रुस असें ह्मणतात. याचा रंग किंचित् हिरवट अथवा पिवळा असतो. चंद्रुसानें 'वार्निश' करितात; तसेंच याचा मलम तयार करण्याकडेही उपयोग होतो. दक्षिणहिंदुस्थानांत यास "सफेद डामर" असें ह्मणतात. चंद्रुस—तिखट, स्वादु, स्निग्ध, उष्ण, शुक्रल, लघु, वृष्य, कांतिकारक; व कंडु, घाय, ज्वर, ग्रहपीडा, कुष्ठ, दाह यांचा नाश करितो.

## २६. चमेली. (सं. सुरप्रिया.)

चमेलीचा वेल असतो. हिचीं फुलें जुईसारखीं पांढरीं व लहान

असतात. या फुलांस वास मधुर येतो. हीं फुलें श्रावण महिन्यांत फार होतात. यांचें तेल काढतात.

## २७. चवळी. ( सं. राजमाष. )

चवळीचे वेल असतात. या वेलास वीतभर लांबीच्या शेंगा येतात. चवळीच्या वेलाच्या देंठाची, कोंवळ्या शेंगांची व जून शेंगांतील दाण्यांची भाजी करितात. ही भाजी चांगली होते. चवळी हें धान्य वातुळ आहे. अळसुंदा ( दारचवळ्या ) ह्मणून एक चवळ्यांची जात आहे, याचीं झाडें उडदाच्या झाडाप्रमाणें होतात. चवळ्यासारखेंच हें धान्य आहे. **चवळ्या**—स्वादु, रुक्ष, तुरट, तर्पण, गुरु, ग्राहक; व वायु, कफ, दुग्ध व वर्चस् यांना करणाऱ्या, शीतल, पित्तकारक, वृष्य, सारक, आध्मानकारक व श्रमहारक आहेत. या श्वेत, रक्त व कृष्ण अशा तीन प्रकारच्या आहेत. त्यांत मोठ्या शेंगाच्या चवळ्या गुणांनीं अधिक आहेत. **दारचवळ्या**—स्वादु, रुचिकर, तुरट, मधुर, तर्पण, स्तनांत दुग्ध वाढविणाऱ्या आहेत. या तुरट आहेत ह्मणून मूत्र, कफ व मल यांना वाढवीत नाहींत.

## २८ चंदन ( सं. ) ( गु. सुखड. हिं. चंदन. )

चंदनाचा वृक्ष मोठा होतो. चंदनाचीं झाडें मलबारप्रांतांत फार होतात. याचीं पानें कडू लिंबाच्या पानांसारखीं असून लहान व मृदु असतात. चंदनास बारीक व काळसर रंगाचीं फळें येतात. हा वृक्ष जून झाला ह्मणजे तो काढून त्याचीं खोडें करून तीं जमिनींत पुरून ठेवतात. नंतर तीं कांहीं दिवसांनीं बाहेर काढून तासून नीटनेटकीं करितात. चंदनखोड उपयोगी आहे. त्याच्या पेट्या, करंडे, पंखे वगैरे अनेक वस्तु करितात. चंदन उगाळून, त्याची अंगास सुगंध येण्यासाठीं उटी लावतात. चंदनाचें जें तेल काढतात त्यास चंदनीअत्तर ह्मणतात. हें सुवासिक असतें. **पांढरा चंदन**—तिखट, कडू, वृष्य, शीतल, तुरट, कांतिकारक, कामजनक, हृद्य, सुरभि, आनंदकारक, लघु, रुक्ष; व पित्त

श्रम, ज्वर, वांति, तृषा, कृमि, संताप, दाह, श्रम, मुखरोग, रक्तदोष यांचा नाश करितो. जो चंदन गांठाळ, छिद्रें पडलेला, जड, उखर, श्वेतवर्ण व साल काढल्यावर रक्तवर्ण, उगाळिला असतां पिंवळा, स्वादानें कडू, शीतळ, अति सुगंध, तो उत्तम; व जो या कांहीं लक्षणांनीं युक्त तो मध्यम, आणि हीं लक्षणें ज्यांत मुळींच नाहींत तो अधम जाणावा. **पीतचंदन-मलयागर**-शीतळ, कडू, कांतिकारक; व विचर्चिका, कुष्ठ, कंडू, कफ, दद्रु, विष, रक्तपित्त, कृमि, व्यंग, पित्त, तृषा, ज्वर व दाह यांचा नाश करितो. **कुंकुमागरु**-हरिचंदन ( पीतरक्तवर्ण )—शीतळ, कडू; व पित्त, श्रम, शोष, दमा, यांचा नाश करितो. हा देवांना भोग्य आहे. मनुष्यांना दुर्लभ आहे. ( १. ) **दाह शमन होण्यास**-चंदन व कापूर अथवा वाळा उगाळून त्याची सर्वांगास उटी लावावी. ( २. ) **खरजेस**-चंदनीअत्तर नुसतें किंवा लिंबाच्या रसांतून लावावें. ( ३. ) **उन्हाळ्यावर**-तांदुळांच्या धुणांत चंदन उगाळून त्यांत मध व खडीसाखर घालून द्यावें. ( ४. ) **रक्तातिसारावर**-तांदुळांचे धुणांत उत्तम चंदन उगाळून त्यांत मध व साखर घालून द्यावें; ह्मणजे रक्तातिसार, तृषा, दाह व मोह यांचा नाश होतो. ( ५. ) **मुलांस घामोळें येतें त्यास**-चंदन, धणे, वाळा यांचा गुलाबपाण्यांत लेप करावा अ० चंदनाचा लेप करावा. ( ६. ) **पूपरम्यावर**-चंदनाचा कल्क करून तो प्यावयास द्यावा. ( ७. ) **प्रमेह व धुपणी यांवर वस्ताद उपचार**-वंशलोचन एक तोळा व वेलदोड्यांतील दाणे एक तोळा घेऊन दोन्ही औषधें बारीक कुटून वस्त्रगाळ पूड करावी. नंतर ती पूड भिजेइतकें उत्तम चंदनी तेल घेऊन त्यांत ती पूड भिजवून लहान सुपारीएवढ्या गोळ्या कराव्या. नंतर नित्य सकाळीं ४ तोळेपर्यंत थंड पाणी घेऊन त्यांत एक गोळी कालवावी व त्यांत अर्धा तोळा खडीसाखर घालून तें प्राशन करावें. याचप्रमाणें सायंकाळींही घ्यावें. हें औषध घेतल्यापासून प्रमेहाची आग सहा प्रहरांत अगदीं बंद होऊन

७ दिवसांत प्रमेह व धुपणी यांचा नाश होतो. पथ्य—गव्हांची पोळी, तुरीचें वरण, तूप व साखर. ( ८. ) **आगंतुक गर्मी ( ओलांडा )** वर—तांदुळांचे धुणांत पांढरा चंदन उगाळून पिठीसाखर घालून द्यावा. ( ९. ) **उचकीवर**—स्त्रीच्या दुधांत चंदन उगाळून नस्य करावें.

## २९. चांपा पांढरा. ( सं. श्वेतचंपक. गु. धोळो चांपो, हिं. चंपा. )

यास खुरचांपा असेंही ह्मणतात. हीं झाडें बहुतेक प्रांतांत आहेत. या झाडांचीं पानें लांब असून फुलें पांढरीं असतात. हा वृक्ष बराच मोठा होतो. हा वृक्ष फारच ठिसूळ आहे. ह्या चाप्यांचा रस इतका उष्ण आहे कीं, तो अंगास लागला असतां अंग उफणतें. जुनाट झाडास कोठें कोठें शेंगाही येतात. चांप्याच्या फुलांची भाजीही करितात. **चांपा**—सारक. कडू, तिखट, तुरट, उष्ण; व कुष्ठ, कंडू, व्रण, शूल, कफ, वायु, उदर, आध्मान यांचा नाश करितो. ( १ ) वायूच्या योगानें अंग बधिर झाल्यास त्यावर चांप्याचा चीक लावावा अथवा पानांचा शेक द्यावा. ( २. ) **गळवें वगैरे गांठी बसावयास**—चांप्याच्या चिकाचा लेप द्यावा. ( ३. ) **सर्पदंशावर**—चांप्याची शेंग उगाळून पोटांत द्यावी. वाळली शेंगही चालते; मात्र ती दुधांत उकळून ठेवलेली असावी. ( ४ ) **रेचक**—चांप्याची साल खोबऱ्याबरोबर खावी. उतार, तूपभात. अथवा चांप्याच्या सालीचा रस व आल्याचा रस एकत्र करून द्यावा. ( ५. ) **हिंवतापावर**—चांप्याच्या कळ्या देंठासुद्धां घालून तीन विडे करावे. ताप येण्यापूर्वी एकेक घटकेच्या अंतरानें एकेक विडा द्यावा. ( ६. ) **सर्पदंशावर**—चांप्याची साल व बेलाची साल एकत्र कुटून त्यांचा रस द्यावा. अन्य औषधांच्या सहाय्यानें सर्व विषारांवरही याचा चांगला उपयोग होतो. ( ७. ) **खरजेवर**—चांप्याचा चीक, चंदनी तेल ज० खोबऱ्याचें तेल व कापूर एकत्र खलून लावावें. ( ८. ) **हिंवास**—चांप्याच्या फुलांचे देंठ काढून टाकून तें फूल विड्यां

तून खावें. व हिंव येण्याचे संधीसही खावें. ( ९. ) **फुरशाच्या विषारानें मूत्रावरोध** झाल्यास–पांढऱ्या चांप्याची साल बारीक कुटून खापरांत भाजावी, व सोसवेल तितका बेंबिखालीं पट्टा गरम बांधावा, ह्मणजे मूत्र मोकळें होतें.

## ३०. चाकवत. ( सं. चक्रवर्तिनी. )

ही भाजी बहुतेक ठिकाणीं होते. हें झाड सुमारें हातभर उंच वाढतें. याचीं पानें फार मोठीं नसतात. तीं कोमळ असतात. चाकवताची भाजी पौष्टिक आहे. या भाजींत हरभऱ्याची दाळ किंवा दुसरा कांहीं दाणा घातला असतां ती फार चांगली लागते. चाकवतांत हा एक गुण आहे कीं, जो दाणा शिजावयास कठिण असतो, त्यांत कांहीं चाकवताचीं पानें घातलीं असतां तो लवकर शिजतो. **चाकवत**–मधुर, शीत, खारट, रुचिकर, सारक, पाचक, मल व मूत्र यांना शुद्ध करणारा, अग्निदीपक, लघु, शुक्रप्रद, बलकर, हृद्य, ज्वरनाशक; व त्रिदोष, अर्श, कृमि, प्लीहा, रक्तविकार, कुष्ठ, पित्त, उदावर्तवायु यांचा नाश करितो. ( १. ) **देवी आल्यावर** प्रथम उलटी होण्यासाठीं चाकवताचा रस मधाशीं द्यावा. ( २. ) **अग्नीनें भाजून दाह** झाल्यास–चाकवताचा रस काढून जखमेवर लावावा ह्मणजे दाह शांत होईल.

## ३१. चांदवेल. ( सं. प्रसारिणी. गु. नारी. हिं. गंधप्रसारिणी. )

चांदवेल ही देशावर प्रसिद्ध आहे, पर्जन्यकाळीं या वेली उगवतात. हिचीं पानें अंगुळभर रुंद असून दोन तीन अंगुळें लांब असतात. या पानास अर्धचंद्राकृती एक मोठा खांचा असतो. त्यामुळें चांदवेल हें सार्थ नांव ह्या वेलीस पडलें असावें. हीस करण्याप्रमाणें फुलें येतात. हीस "राजबला" असेंही नांव आहे. चांदवेल ही गुरु, उष्ण, कडू, बलकर, सारक व मोडलेल्या हाडाला सांधणारी, कांतिकारक, धातुवर्धक

आहे; व वातार्श, सूज, कफ, वातरक्त, त्रिदोष, यांचा नाश करिते, व मलस्तंभक आहे. (१.) **वातविकारावर**—चांदवेलीची भाजी खावी. **नाळगुदावर**—चांदवेलीचा रस काढून बाटलींत भरून ठेवावा. हा रस एक चमचाभर घेऊन त्यांत कोंबडीची वाळलेली विष्टा थोडी टाकून तो पाजावा व याचाच लेपही करावा म्हणजे नाळगुदरोगी ताबडतोब बरा होतो.

## ३२. चांबेळ. (सं. महायमलपत्रक.)

चांबेळाचे वृक्ष कोंकण प्रांतीं होतात. याचीं पानें कांचनाच्या पानासारखीं असून तीं माहुलीच्या वेलाच्या पानाएवढीं मोठीं असतात. याच्या पत्रावळी होतात. चांबेळाचें लांकूड इमारतीच्या साधारण उपयोगीं आहे.

## ३३. चार. (सं. राजादन.)

चाराचा वृक्ष मोठा होतो. कोंकण, नागपूर प्रांत व मलबारांत हीं झाडें पुष्कळ आहेत. याचीं पानें लांबोडीं असून तीं मोहाच्या पानाएवढीं मोठीं असतात. त्यांच्या पत्रावळी करितात. यांची छाया फार थंड आहे. याचें लांकूड कांतीव कामास फारसें उपयोगीं पडत नाहीं. चारास लहान फळें येतात; त्यांत तुरीएवढे तांबूस रंगाचे दाणे असतात, त्यांस चारोळ्या म्हणतात. चारोळ्या मिठाईंत व पक्वान्नांत घालतात. चारोळीचें तेल निघतें, तें बदामाच्या तेलासारखें थंड आहे. चाराच्या पक्व फळांचा रंग जांभळा असतो. हीं फळें खाण्यास मधुर लागतात. चारोळीस "चिरोंजी" असेंही म्हणतात. **चाराचें मूळ**—तुरट; व रक्तरोग, व कफ, पित्त यांचा नाश करितें. चाराच्या वृक्षाची **मज्जा**—मधुर, वृष्य, स्निग्ध शीतल, मलस्तंभक, आमवर्धक, दुर्जर, हृद्य, शुक्रल, वातपित्तनाशक अशी आहे. **चारोळ्या**—मधुर, वृष्य, आंबट, गुरु, सारक, मलस्तंभक, स्निग्ध, शीतल, धातुवर्धक, कफकारक, दुर्जर, बलकारक, प्रिय; व वात,

पित्त, दाह, ज्वर, तृषा, क्षतरोग, रक्तदोष, क्षतक्षय यांचा नाश करितात. फळांतील गोळे–मधुर, वृष्य, व दाह, पित्त यांचा नाश करितात. चाराचें तेल–मधुर, जड, किंचित् उष्ण, कफकारक; व पित्त, वात यांचा नाश करणारें आहे. ( १ ) **रक्तातिसारावर**—चाराच्या झाडाची साल दुधांत वाटून मध घालून प्यावी. ( २. ) **शीतपित्तावर**–चारोळ्या दुधांत वाटून अंगास लावाव्या.

## ३४. चिकणा थोरला. ( गु: खपाट. सं बलोत्तमा )

चिकण्याचीं झाडें चिकणीच्या झाडांहून मोठीं होतात. चिकण्याचीं पानें कात्रेदार असतात व प्रत्येक पानास दोन खांचा असतात. हीं कांहींशीं तुपकडीच्या पानांसारखीं असतात. या झाडावर बारिक गोलाकृति फळें येतात; तीं खातात. हीं फळें किंचित तुरट, मधुर, धातुशुद्धिकारक, व मुखरोगनाशक आहेत. या फळांचा रंग नारंगी असतो. व हीं पिकल्यावर बारीक रुद्राक्षांप्रमाणें दिसतात. हीं झाडें बहुतक प्रांतीं होतात. चिकण्यास पांढऱ्या रंगाचीं फुलें येतात. याच्या बियांस "बळबीज" असें ह्मणतात. हें आकारानें झिझरुटीच्या बियांप्रमाणेंच असतें. चिकणा, सहदेवी, पेटारी व तुपकडी किंवा लेंची, या चोहोंच्या समुदायास "बलाचतुष्टय" असें ह्मणतात. **बलाचतुष्टय**–शीत, मधुर, बल व कांतिकारक, स्निग्ध, ग्राही; व वायु, रक्तपित्त, क्षत यांचा नाश करितें. चिकण्याच्या मुळाच्या सालीचें चूर्ण, दूध व साखरेशीं घेतल्यानें बहुमूत्ररोग दूर होतो. महाबला–मूत्रकृच्छ्रनाशक व वातानुलोमन करणारी आहे. अतिबला–दूधसाखरेशीं सेवन केल्यास प्रमेहाचा नाश करिते. ( १. ) **विद्रधी, व्रण, गळवें, [illegible], पाठें, काळपुळी,** इत्यादिकांवर–चिकण्याचीं तांबूल रंगाचीं कोंवळीं पानें असतात त्यांची बारीक वाटून वडी करून बसवावी व त्यावर फडक्याचें सैल वेष्टन देऊन त्या फडक्यावर थंड पाणी घालीत रहावें. या योगानें ती गांठ त्वरित पिकते व फुटते, व कोणत्याही प्रकारानें दाह होत असल्यास किंवा ठणका लागला अस-

त्यास तो त्वरित बंद होतो. अ० चिकण्याचा पाला वाटून लवंग घालून वर बांधावा. ( २. ) **गर्मीनें पडलेले चट्टे सुकण्यास**—चिकण्याची साल व जून पानें एकत्र कुटून त्यांत पाणी घालून अष्टमांश काढा करावा व त्या काढ्यानें चट्टे धुवावे; ह्मणजे काढ्याचा रांप बसून त्वरित आंवळतात ( ३. ) **भूतज्वरावर**—चिकण्याचें मूळ विधियुक्त गळ्यांत बांधावें.( ४. ) **चातुर्थिकज्वरावर**—चिकण्याचें मूळ पुष्यनक्षत्रीं हातास बांधावें. अ० चिकणामूळ आणि सुंठ यांचा काढा शीत, कंप व दाह यांणीं युक्त ज्वराचा दोन तीन दिवसांत नाश करितो. ( ५. ) **मूत्रदोष व शुक्रदोष यांवर**—चिकणा, हिंग, दूध, तूप एकत्र करून प्यावें. ( ६. ) **अंडवृद्धीवर**—चिकण्यांचे काढ्यांत एरंडेल घालून प्यावें. ( ७. ) **विंचवाचे दंशावर**—चिकणामूळ उगाळून लावावें.

## ३५. चिकणी. (सं. बला.)

चिकणीचें झाड सुमारें हात दीड हात उंच वाढतें. याचीं पानें आकारानें तुळशीच्या पानासारखीं असून, त्यापेक्षां रुंदट व लांबट असतात. हीं झाडें पर्जन्यकाळीं शेतांत व बांधावर पुष्कळ उगवतात. यास बारीक बोंडें येतात; त्यांत याचें बीं असतें. ही पौष्टिक आहे. कित्येक लोक हिच्या पानांची भाजी करितात. हिचीं पानें खाल्लीं असतां फार चिकट लागतात, ह्मणून हीस चिकणी हें नांव योग्य आहे. चिकण्याप्रमाणें हिचे गुण आहेत. ( १. ) **पुष्टतेस**—चिकणीचा ओला पाला नित्य सकाळीं खात जावा. ( २. ) प्रमेह व **धातुविकारावर**—चिकणीचें झाड मुळासुद्धां उपटून आणून स्वच्छ धुवावें आणि बारीक कुटून थोडें पाणी घालून रस काढावा. तो रस वस्त्रगाळ करून प्रतिवेळीं कच्चा पावशेरप्रमाणें दुवक्त सात रोज द्यावा; ह्मणजे धातुविकार नाहींसे होऊन धातुवृद्धि होते. ( ३. ) **जखम भरण्यास**—चिकणीचे मुळाचा रस जखमेंत भरावा आणि कापसाची वडी या रसांत भिजवून जखमेवर बांधावी. ही पट्टी एक दिवस सुकूं देऊं नये. वरचेवर त्या पट्टीवर रस सोडीत

रहावें. ( ४. ) **गळवें व्रण वगैरे पिकण्यास**-चिकणीचा पाला वाटून बांधावा.

## ३६. चिकू.

हीं झाडें मोठीं होतात. हीं बगीच्यांतून लावितात. या झाडांचीं पानें बकुळीच्या पानासारखीं लांबट असतात. या झाडावर अंजिराएवढीं फळें येतात. यांचा रंग तांबूस तपकिरी असतो. हीं फळें गोड व पुष्टिकारक आहेत. यांचा साहेब लोकांत विशेष खप होतो. ( १. ) **धातुविकार व. कडकी यांवर**-चिकूचीं फळें खडीसाखरेशीं सेवन करावीं.

## ३७. चिंच. ( सं. चिंचा. )

## ( गु० आमली. हिं० इमली. )

चिंच अमेरिका, आफ्रिका, एशिया खंडांतील बहुतेक देश या ठिकाणीं होते. हिंदुस्थानांतील बहुतेक भागांत ही सांपडते. हें झाड मोठें वाढतें. यास आठवे वर्षीं फळें येतात. चिंचा, माघ व फाल्गुन या महिन्यांत पिकून तयार होतात. चिंचेमध्यें ज्या बिया असतात त्यांस चिंचोके ह्मणतात. चिंच घरखर्चास ठेवावयाची असली, तर तिच्या आंतील चिंचोके काढून तींत मीठ घालून तिचे गोळे करून ठेवतात. चिंच, भाजा वगैरे बहुतेक पदार्थांत घालावी लागते. चिंचेच्या अंगीं आंबटपणा आहे, त्यामुळें ती बेतानें खाल्ली असतां स्वच्छ करते. भातावर घेण्याकारितां चिंचेचें सार करितात. नव्या चिंचेपेक्षां जुनी चिंच पथ्यकारक आहे. चिंचोके गरीब लोक भाजून खातात. त्याचें उत्तम तेल निघतें. परंतु याचें तेल काढण्याकडे लोक दुर्लक्ष्य करितात, हा केवढा मूर्खपणा आहे ! चिंचोक्यांची धनगर लोक खळ करितात. चिंचेच्या कोंवळ्या पाल्याची भाजी करितात, व फुलांची चटणी करितात, चिंचेचें लांकूड चिवट असतें, सबब त्याचे कुऱ्हाडी वगैरेस दांडे करितात. चिंचेच्या लांकडाचे कोळसे पाडितात. **चिंचेचें झाड**-गुरु, ऊष्ण, आंबट, पित्तकर,

कफप्रद, रक्तकोपन, वातनाशक, असें आहे. **चिंचेचीं फळें**–तुरट, स्वादु आंबट, रुचिकर, विशद, अग्निदीपक, लघु; व वायु, कफ, प्रमेह, यांचा नाश करितात. **चिंचेचीं पानें**–सूज व रक्तदोष, यांचा नाश करितात. कोंवळ्या **चिंचा**-अति आंबट, ग्राहक, उष्ण, रुचिकर, अग्निदीपक; व रक्तपित्त, पित्त, कफ, रक्त यांना कोपविणाऱ्या व वातनाशक आहेत. जून चिंचा—वातल, व कफ, पित्त यांना करणाऱ्या आहेत. **पक्क चिंचा**-मधुर, सारक, आंबट, हृद्य, भेदक, मलस्तंभक, दीपन, रुचिकर, उष्ण, रूक्ष, बस्तिशोधक; व व्रणदोष, कफ, वायु, जंतु, यांचा नाश करितात. **सुक्या चिंचा**-हृद्य, लघु; व श्रम, भ्रांति, तृषा, क्लम व कृमि यांचा नाश करितात. नवी चिंच–वात, कफ करणारी आहे. ती एक वर्षाची वात–पित्त–नाशक अशी आहे. चिंचेच्या सुकलेल्या सालीचा **क्षार**–अग्निमांद्य, शूल यांचा नाश करितो. पिकलेल्या चिंचांचा **रस** ह्मणजे बरबट—आंबट, मधुर, रुचिकर, व्रणनाशक व लेपानें–सूज, पक्तिशूल यांचा नाशक आहे. **चिंचेचें सार**–दाह, कफ यांना करणारें, अति आंबट, वातनाशक आहे. तेंच बरोबरीनें साखर घालून केलेलें दाह, पित्त व कफ यांचा नाश करितें. ( १. ) **रक्त मूळव्याधीवर**–चिंचेच्या खपल्यांचें ह्मणजे बाहेरील खरखरीत सालीचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें सकाळीं व संध्याकाळीं गाईच्या अदमुऱ्या दह्यांतून द्यावें. ( २. ) **थंडच्या परम्यावर**.—चिंचेच्या खपल्याची राख ६ मासे नारळाच्या नवटांक अंगरसांतून द्यावी. औषध दोन्ही वेळ प्रमाणें ५ दि० द्यावें. पथ्य अळणी. ( ३. ) **पांडुरोगावर**–चिंचेच्या सालीची काळी राख करून ४ तोळेपर्यंत शेळीच्या मूत्रांत एक तोळापर्यंत राख घालून द्यावी. ( ४. ) **पडजिभेवर**—चिंचोका थंड पाण्यांत उगाळून टाळूवर लेप केला असतां पडजीभ उतरून जो खोकला उत्पन्न होतो तो बंद होतो. ( ५ ) **विंचवाच्या दंशावर**–चिंचोका भाजून अगर नुसताच पांढरा होईपर्यंत उगाळून दंशावर चिकटवावा. तो वेदना शोषून घेऊन नंतर आपोआप खालीं पडतो.

(६.) क्षतकास ह्मणजे उरांत वायु, क्षत करून रक्तासहित कफ पाडतो त्यावर–चिंचोके अंमळ भाजून सालपटें काढून टाकावीं. त्यांची पूड मध व साजूक तूप याशीं द्यावी. (७.) शूलावर–चिंचेच्या सालीचें भस्म उष्णोदकांत द्यावें. अ० चिंचेच्या सालीचें चूर्ण उष्णोदकाशीं द्यावें. (८.) देवीचा आजार न येण्यास–चिंचोक्याचें व हळदीचें चूर्ण थंड पाण्याशीं द्यावें. (९) उंदराच्या विषावर–चिंच तोळे ४, धरोसा २ तोळे, हीं जुन्या तुपांत खलून तें ७ दि० खावें. (१०.) अतिसारावर–चिंचेचा पाला एक तोळा तांदुळांचे धुणांत वाटून तीन तोळे धुणांत ठिकरी तापविलेली विझवून त्यांत घालून घ्यावा. (११.) डोळे येतात त्यास–चिंचेचा ओला पाला एरंडाच्या पानांत बांधून मातीनें लिंपून भाजावा व त्याच्या रसांत तुरटीची लाही व गुंजभर अफू घालून तव्यावर तांब्याच्या भांड्यानें खलून गाळून ठेवावें, व त्याची घडी डोळ्यांवर घालावी (१२.) अन्न न जिरेल तर–चिंचेच्या अंगावरील सुक्या सालीचा रानगोवऱ्यांत भाजून राख करावी, व निजते वेळीं अजमासें ६ मासेपर्यंत खाऊन वर ऊन पाणी प्यावें. (१३.) क्षुधा कमी होण्यास—चिंचेच्या पाल्याची कोशिंबीर खावी. (१४.) हिंगुळाच्या विषावर—अर्धशेर चिंचोके चार शेर पाण्यांत कढवून त्याच्या गुळण्या धराव्या. दि० ७. (१५.) निवडुंगाच्या विषावर–चिंचेचा पाला वाटून लेप करावा. (१६) बैलाचा पाय सुजला तर–चिंचेचा पाला व वारुळाची माती पाण्यांत कढवून त्याची पोतंडी करून तिणें शेकावें. (१७.) कर्णमूळावर–चिंचेचा बलक, लोणा असेल त्या जमिनीवर तापवून ओतावा व जमिनीवर हातानें चोळून चिखलासारखा झाल्यावर लेप करावा. (१८) चिंचा पान–अरुचि व पित्तावर–चांगली पिकलेली व दळदार अशी चिंच घेऊन ती थंड पाण्यांत कुसकरावी, व त्यांत साखर घालून गाळून घ्यावी. नंतर त्यांत वेलदोडे, लवंगा, कापूर व मिरें यांचें चूर्ण घालावें व त्याचें

मिश्रण करून त्याचा गुळणा ( गंडूष ) वारंवार करावा; ह्मणजे अरुचि नाश पावते व पित्त शमतें. (१९.) चिंचेचें सरबत—पित्त व बद्ध कोष्ठावर—एकशेर चिंच २ शेर पाण्यांत चार प्रहर भिजूं द्यावी; नंतर गाळून तें पाणी अर्धें आटवावें व त्यांत २ शेर साखर घालून सरबता-सारखा पाक करून तें २ तोळयांपासून ५ तोळेपर्यंत ध्यावें. बद्धकोष्ठास रात्रीं द्यावें. पित्तावर सकाळीं सेवन करावें. ( २०. ) रुईचे विषावर —चिंचेचा पाला वाटून लेप करावा. ( २१. ) मुलांच्या रक्तसंग्रहणीवर— चिंचेच्या सालीचें चूर्ण तीन मासेपासून ६ मासेपर्यंत, दोन तोळे अदमुरे दह्यांत टाकून प्रत्यहीं दोन वेळ प्रमाणें तीन दि० खावें. ( २२. ) भांगेस उतार—चिंच कोळून पाजावी. ( २३. ) मोडशीवर—चिंच ९ भाग, बिबे ८ भाग, एकत्र वाटून पांढऱ्या कांद्याच्या रसांत कालवून फडक्यांत घालून गाळावें व तो रस प्यावा, ह्मणजे ओकारी व ढाळ हे बंद होतात, आणि जे सविष जंत असतात तेही पडून मरतात.

## ३८. चिटमिटकें.

कर्नाटक प्रांतांत चिटमिटकी या नांवाचें एक लहान झाड होतें. याची उंची दोन हात असते. त्यास वाटोळीं चणेबोराएवढीं फळें येतात; हीं आंबुस असतात. त्यांचें रायतें व भाजी करून खातात. तद्देशीय लोक हीं मोठीं पवित्र मानितात. याच्या फुलांचा रंग तांबूस असतो. इतर प्रांतांतही हीं झाडें होतात.

## ३९. चित्रक. सं. ( गु. चित्रो. हिं. चिता, चित्रक. )

हें झाड लहान असून इतर झुडपांच्या आश्रयानें असतें. याचीं पानें जाडसर व दडस असतात. या पानांची भाजी होते. या झाडास ज्या फांद्या फुटतात त्यांमध्यें पेरें असतात. चित्रकांत फुलावरून पांढरा व तांबडा अशा दोन जाती आहेत. चित्रकाची ओली साल उगाळून अगर ठेंचून अंगास लावली तर कातडी जाळून टाकते. चित्रक—पाचक, रुक्ष, लघु, अग्निदीपक, पाककाळीं तिखट, ग्राहक, कडू, उष्ण, रुचिकर, रसा-

थन, अग्नीसारखा पराक्रमी, व सूज, कुष्ठ, अर्श, खोकला, कृमि, वातोदर, कंडू, यकृत्, संग्रहणी, आम, क्षय, उदर यांचा नाश करितो. हा तिखट आहे ह्मणून कफाचा नाश करितो; कडू आहे ह्मणून पित्ताचा नाश करितो व उष्ण आहे ह्मणून वातनाश करितो. ( १. ) **खरजेवर**–चित्रकमुळाची साल बारीक वाटून ती लोण्यांत कालवावी, व तो गोळा एका परातींत ठेवून ती परात उन्हांत वांकडी करून ठेवावी ह्मणजे खालीं तूप निथळून पडेल. तें तूप खरजेवर लाविलें असतां खरूज जाते. तसेंच यानें गजकर्णही जातें. ( २. ) **स्तन, कर्ण** किंवा इतर ठिकाणीं सूज येऊन गांठ झाल्यास–चित्रकमूळ पाण्यांत उगाळून लेप करावा. ( ३. ) **सर्पदंशावर**–चित्रकाचें पाळ, काळे वेलाचा कांदा व बोखाड्याचें पाळ हीं एकत्र उगाळून थोडथोड्या अवकाशानें तीन वेळ पिण्यास द्यावें. विषार झालेल्या मनुष्यास शेणखळ्यावर बसवावें व अंगावर थंड पाण्याची धार धरावी. दोन प्रहरांत विष उतरेल. यास उतार तूप अर्धाशेर पाजावें. ( ४. ) **उंदराच्या विषावर**–चित्रकाच्या मुळांचें चूर्ण तेलांत पचन करावें. तें वस्त्रानें ब्रह्मरंध्रावर क्षत करून त्यावर चोळावें. ( ५. ) **सर्व प्रकारच्या उदररोगांवर**—चित्रकमूळ व देवदार यांचा कल्क दुधाशीं घ्यावा. ( ६ ) **बळास**—चित्रकाचें मूळ निंबाचे रसांत उगाळून वर लावावें. ( ७. ) **खरजेवर**–चित्रकाचीं मुळें कुटून त्यांचा रस नारळाचे रसांत घालून तेल काढावें व वर लावावें. ( ८. ) **चित्रकघृत**–चित्रकाचा काढा व कल्क, यांच्याशीं सिद्ध केलेलें घृत घेतलें असतां गुल्म, सूज, उदर, प्लीहा, शूळ, मूळव्याध व संग्रहणी, यांचा नाश होतो. ( ९. ) **पांडुरोगावर**–चित्रकचूर्णाला आंवळकाठीच्या काढ्याच्या तीन भावना द्याव्या. नंतर तें गाईच्या तुपांतून रात्रौ घेत जावें. ( १०. ) **नाकांतून रक्त पडतें त्यास**—चित्रकाचें चूर्ण मधाशीं द्यावें. ( ११. ) **मंडल कुष्ठावर**–चित्रकमूळाचा लेप करावा; नंतर निर्गुडीचे बीजांचा लेप करावा. ( १२. ) **तिडक्या परम्यावर**–चित्रकाचें

चूर्ण तिळांचे तेलांत द्यावें. निद्रा येण्यास गुळांत; अजीर्ण, संग्रहणी, अतिसार यांवर ताकाचे निवळींत द्यावें. ( १३. ) **कंडूवर**—चित्रकमूळाचा काढा करून घ्यावा. ( १४. ) **यकृत् व प्लीहोदरावर**–चित्रकाचा क्षार काढून तो द्यावा. क्षार काढण्याची रीति " आघाडा " या शब्दांत दिली आहे. ( १५. ) **मूळव्याधीवर**–चित्रक, टांकणखार, हळद व गूळ समभाग घेऊन वाटून, त्यांचा मोडांस लेप करावा. ( १६. ) **मूळव्याधीवर**–चित्रकमूळाची साल वाटून तिचा अथवा चित्रकमूळाचे चूर्णाचा एका कोऱ्या मडक्यास आंतून लेप करावा आणि त्यांत रात्रीस दूध विरजत घालून सकाळीं तें दहीं प्राशन करावें. याप्रमाणें कांहीं दिवस केलें असतां मूळव्याधीचा नाश होतो.

## ४०. चिमड.

चिमड गुजराथेंत प्रसिद्ध आहे. याचें झाड कासविंद्यासारखें असतें. याचें बीं काळें असून चपटें असतें. हें पौष्टिक आहे. ( १. ) **डोळे येतात त्यास**–चिमडाचा मगज वाटून त्याचें अंजन करावें.

## ४१. चिभूड. ( सं. चिर्भटिका. गु. चीभडो )

चिभुडाचा वेल कांकडीच्या वेलाप्रमाणेंच असतो. त्यांत वाटोळें व लांबट अशा दोन जाति आहेत. पिकलेलें चिभूड खाण्याच्या उपयोगीं पडतें, हें वातुळ आहे; परंतु तंबाकू ओढणाराला फार हितावह आहे. **चिभूड**–शीतळ, ग्राहक, गुरु, मधुर, मलस्तंभक; व पित्त, मूत्रकृच्छ्र, अश्मरी, दाह, प्रमेह, वायु, शोष, यांचा नाश करितें. तें कोंवळें असतां वातकर, व कफ, पित्त यांचें नाशक आहे; व पिकलेलें पित्तकर, उष्ण असें आहे. ( १. ) **मुतखड्यावर**—चिभुडाचें मूळ शिळ्या पाण्यांत उगाळून प्रातःकाळीं एक वेळ याप्रमाणें ७ दिवस घ्यावें.

## ४२. चिरबोट.

चिरबोटाचीं झाडें हात दीड हात उंच होतात. हीं मृगाचा पाऊस

पडूं लागला ह्मणजे रानांत, डोंगरांत, मैदानांत व पहाड जमिनींत चहूं-कडे होतात. हीं कोंकणांत फार होतात. यास लहान फळें येतात, हीं आंबुस गोड लागतात.

४३. चुका. ( सं. चुक्रिका. गु. चुका, चांगेरी. )

चुक्याचें झाड वीत दीड वीत वाढतें. देशावर व गुजराथेंत या भाजीचें बरेंच पीक होतें. या भाजीचें पान कांहींसें जाड असतें. हीस पांढरें फूल येतें. ही भाजी बारमाही होते. चुक्याची भाजी करितात, हींत हरभऱ्यांची डाळ अगर दुसरा कांहीं दाणा घातला असतां ती चांगली होते. चुका—अग्निदीपक, उष्ण, रुचिकर, लघु, पित्तल, सारक, पथ्यकर, गोड, अतिआंबट; व शूल, गुल्म, अग्निमांद्य, हृदयपीडा, बद्धविट्क, आमवात, तृष्णा, वांति, कफ, वात, गुल्म, वायु, तोंडाचा पचपचीतपणा यांचा नाश करितो. ( १. ) कटि, ऊरु, पृष्ठ, त्रिक ( माकडहाड ) यासंबंधी वायु; गुल्म, शूळ, गृध्रसी, उदावर्त, खल्ली, हनुग्रह यांवर—चुक्याच्या रसांत गूळ घालून द्यावा. ( २. ) चांगेरीघृत गुदभ्रंशावर—चुका, बोरें, दहीं, निंबू, जवखार व सुंठ, यांचे काढ्यांत तूप घालून पचन करावें व तें प्राशनार्थ द्यावें. ( ३. ) दुसरा प्रकार—पिंपळी, पिंपळमूळ, चवक, सुंठ, चित्रक, ओंवा, धणे, पहाडमूळ, वाळवेल, देवदार यांचा कल्क करून, चुक्याचा रस आणि दहीं हीं घृताच्या आठ पट घेऊन त्यांत घृत घालून सिद्ध करावें. हें घृत मूत्रकृच्छ्र, मूळव्याध, संग्रहणी, कफ, वायु, व गुदरोग यांवर हितकारक होतें. ( ४ ) धोत्र्याचे विषावर—चुक्याचा रस काढून द्यावा. या रसापासून तृषा शांत होते, क्षुधा वाढते व शरीरांत थंडाई येते. ( ५. ) मस्तक अतिशय दुखतें त्यास—चुक्याचा व कांद्याचा रस हे एकत्र करून मस्तकावर चोळावे.

४४. चेर.

हें झाड मोठें होतें, याचीं पानें कांडोळीच्या अथवा एरंडाच्या पानांसारखीं मोठीं असतात. हीं झाडें कोंकणप्रांतीं पुष्कळ होतात. याचें लां-

कूड साधारण कामास उपयोगीं आहे. ( १. ) **अतिसारावर**—चेराचे साळीचा रस २ तोळे, चार तोळे दह्यांत मिश्र करून त्यांत अर्धा तोळा वऱ्यांचें पीठ कालवून तें मिश्रण त्वरित प्राशन करावें.

## ४९. चोपाचिनी. ( सं. व्याधिनाशन. गु. व हिं. चोपचिनी. )

चोपचिनीचे वेल चीन, ब्रह्मदेश व ग्यारोपर्वत या प्रदेशांत होतात. चोपचिनीच्या कंदाचा औषधांत उपयोग होतो. गर्मीच्या रोगावर चोपचिनी ही वस्ताद आहे. चोपचिनीच्या गुणासारखाच पांढऱ्या गुळवाशीचाही कंद आहे. **चोपचिनी**—कडू, उष्ण, अग्निदीपक, धातुवर्धक, बलकर व मलमूत्र यांना शोधन करणारी, तारुण्यदायक, पुष्टिकर, वृष्य, रसायन, गर्भप्रद; व बद्धविट्क, आध्मान, उन्माद, वायु, शूल, अपस्मार, धातुक्षय, अंगग्रह, फिरंगोपदंश, मांद्य, कटिग्रह, पक्षाघात, ऊरुस्तंभ, क्षय, व्रण, गंडमाला, नेत्ररोग, शुक्र व शोणित यांचे दोष, सर्वांगवायु, कंपवात व कुब्जवात यांचा नाश करिते. ( १. ) **अंगांत भिनलेल्या गर्मीवर**—चोपाचिनीचूर्ण—चोपचिनी १६ तोळे, पिठीसाखर ४ तोळे, पिंपळी, पिंपळमूळ, मिरीं, लवंग, अक्कलकारा, खुरासनी ओंवा, सुंठ, वावडिंग, दालचिनी हीं तोळा तोळा घेऊन चूर्ण करून तें ६ मासे चूर्ण उष्णोदकाशीं द्यावें; ह्मणजे उपदंश रोग, उपदंशाचे परिणामी दोष ( त्वग्रोग, संधिवात, अस्थिशोथ व शूलादि होतात ते ), प्रमेह, क्षीणता, फिरंगोपदंश, इतक्यांचा नाश होतो ( २ ) **चोपचिनीपाक**—चोपचिनी ४८ तोळे, पिंपळी, पिंपळमूळ, मिरें, सुंठ, दालचिनी, अक्कलकारा, लवंगा हे एकेक तोळा व सर्व चूर्णासमान साखर घालून त्याचा पाक करावा. त्यांतून एक तोळा सकाळीं व एक तोळा सायंकाळीं घ्यावा; ह्मणजे उपदंश, व्रण, कुष्ठ, वातरोग, भगंदर, क्षयकास, पडसें, क्षय व संपूर्ण रोग दूर होऊन पुष्टि येते.

## ४६. चौधारी.

हें झाड सुमारें हातभर उंच वाढतें. यास चौधारी कांडवेलाप्रमाणें चार धारा असतात. याची भाजी करितात. या पक्क झाडाचा रंग लाल असतो. हीं झाडें खानदेशांत विशेषेंकरून होतात. ( १. ) **चातुर्थिकावर**–चौधारीचा काढा द्यावा.

## ४७. जटामांसी. (सं. गु. हिं.)

जटामांसी ही गवताप्रमाणें असून हिचीं झाडें नदीच्या कांठीं विशेषेंकरून होतात. हें झाड वेलीप्रमाणें जमिनीवर पसरतें. हीस "जटाशंकर" असेंही ह्मणतात.

## ४८. जव ( सं. यव; सक्तु. )

यास सातु असेंही ह्मणतात. जव हें धान्य गव्हांतीलच एक जात आहे, परंतु तें स्वादांत व आकृतींत गव्हांहून केवळ भिन्न आहे. हें धान्य अगदीं नीरस आहे. तें बहुतकरून बैल, घोडे, हत्ती व इतर जनावरें यांत खपतें, व कित्येक गरीब लोक याची भाकरी करून खातात. मारवाड व खंबायत या प्रांतांत याचें पीक फार होतें. या धान्यास कनिष्ठ प्रतीची जमीन लागते. **जव**–सशूक, निःशूक, व हरीत या भेदानें तीन प्रकारचा; त्यांत **सशूक यव**–वृष्य, शीत, तुरट, मारक, रूक्ष, मेध्य, मधुर, व्रणाविषयीं हितकर, अग्निवर्धक, स्वर्य, वर्ण्य, लेखन, मूत्रबंधकारक, गुरु, मृदु, तिखट, स्थैर्यकर; व मेद, तृषा, पित्त, वायु, कफ, रक्तरोग, श्वास, कास, त्वग्रोग, पीनस, कंठरोग, प्रमेह, ऊरुस्तंभ यांचा नाश करितो. याहून निःशूक अल्पगुण आहे. ( १ ) **तृष्णा, दाह व रक्तपित्तावर**–भाजलेल्या जवांचें पीठ थंड पाण्यांत फार पातळ नाहीं व फार दाट नाहीं अशा बेतानें तें कालवून त्यांत तूप मिळवून प्यावें. ( २. ) **गर्भ स्थिर होण्यास**—जव, तीळ, साखर समभाग घेऊन चूर्ण करून मधाशीं द्यावें; ह्मणजे गर्भपतनाचें भय स्त्रियांस होत नाहीं. ( ३, )

**अग्निदग्धव्रणावर**—जव जाळून तिळांचे तेलांत खलून लेप करावा. (४.) **धातुपुष्टतेस**—जवांचा एक शेर लोट, एक शेर साजुक तूप, एक शेर खडीसाखर, तोळाभर पांढरीं मिरें व दोन तोळे एलचीदाणे, यांची पूड करून सर्व औषधें मळून एकरूप झालीं ह्मणजे कल्हईचे ताटांत तापवून पौर्णिमेचे रात्रीं चांदण्यांत ठेवून सकाळीं आणावें. रोज सकाळीं ४ किंवा ५ तोळे घेत जावें व वर गाईचे दुधाचा एक घोट घेत जावा. (५.) **विषूचिकारोगावर**—जवांचें चूर्ण ताक घालून उष्ण करून जवखार घालून प्यावें. (६.) **जवखार**—जवांच्या झाडाच्या हिरव्या फांद्या जाळून ती राख पाण्यांत घालून गाळावी, व तें पाणी आटवावें; ह्मणजे जो क्षार निघतो तो जवखार. हा २ पासून ४ वालपर्यंत द्यावा. हा शूळ, गुल्म, यकृत् व प्लीहा आणि अजीर्ण यांचा नाश करितो. (७) खोकला, दमा व क्षय यांवर यवक्षारादिगुटिका—जवखार १ तोळा, मिरीं २ तोळे, पिंपळी २ तोळे, दाळिंबाची साल ४ तोळे, या जिनसा १६ तोळे गुळांत घालून अर्ध अर्ध माशाच्या गोळ्या करून त्या द्याव्या.

## ४९. जवस. ( सं. अतसी. )

यास "अळशी" असेंही ह्मणतात. हें झाड हातभर उंच वाढतें. जवसाचें तेल काढतात; तें खावयास उपयोगी पडतें. या देशांतून हजारों खंडी जवस दरसाल विलायतेस जातो. तेथें त्याचें तेल काढून त्याचें रोगण बनवितात व तेंच परत इकडे विकावयास पाठवितात. रोगण फारच महाग असतें; त्यामुळें इकडून त्याबद्दल फारच पैसा जातो. अशा रीतीनें या देशाची शेंकडो गोष्टींनीं लूट होत चालली आहे, परंतु आमचे लोक गाढांधकारांत लोळत पडल्यामुळें त्यांस या असल्या कांहींच गोष्टी दिसत नाहींत ही मोठी शोचनीय गोष्ट आहे. लोकांनीं जागें होऊन या गोष्टीचा कांहींतरी विचार करावा, ह्मणजे 'दगडापेक्षां वीट मऊ' या न्यायानें त्यांचें कांहींतरी हित होईल. जवस भाजून त्यांची चटणी करितात ती चांगली होते. जवसाच्या ओल्या बोंडांची चटणी फार सुरेख

होते व हीं बोंडें लोणच्यांतही घालतात. जवसाच्या झाडांपासून वाखही निघतो, परंतु आळसामुळें किंवा बेपर्वाईमुळें इकडे बहुतकरून तो काढीत नाहींत. या वाखाचीं तागाप्रमाणें वस्त्रें होतात. **जवस**–मधुर, स्निग्ध, कडू, बलकारक, पाककाळीं तिखट, गुरु, वातकर, कफकारक, उष्ण; व दृष्टि, शुक्ररोग, शुक्रदोष, पृष्ठशूल व पित्त, यांचा नाश करितात. याच्या पानांची भाजी–वात, कास, कफ, यांवर हितकर आहे. (१.) **झोंप येत नसल्यास**–जवसाचें व एरंड बीजाचें तेल समभाग एकत्र करून काशाच्या पात्रांत काशाच्या पात्रानें खलून त्याचें अंजन करावें ह्मणजे झोंप येते. (२.) **बद किंवा गळू वगैरे पिकण्यास**–जवसांचें पीठ करून दुधांत कालवून हळदीची पूड घालावी अथवा पाण्यांत कालवून हळदीची पूड घालून चांगलें शिजवून सोसेल तितकें गरम गांठीवर बसवावें. याप्रमाणें ५।७ वेळ प्रतिवेळीं गरम बसवीत जावें. यांस पोटीस ह्मणतात. या पोटीसावर विडयाचें पान बांधावें. याप्रमाणेंच तागाचें बीं व गहूं यांचेंही पोटीस बांधावें. (३.) **अग्निदग्ध व्रणावर**–जवसांचें तेल व चुन्याची निवळी एकत्र करून तें लावावें-(४.) **मूत्रदाहावर**–जवसांचा फांट करून द्यावा. (औषध ४ तोळे घेऊन त्यांत १६ तोळे पाणी घालून चांगलें कढवून गाळून द्यावें; यास फांट असें ह्मणतात.)

## ५०. जाई. (गु. चमेली. हिं. चंबेली. सं. जाती, मालती.)

जाईचा वेल मोठा वाढतो. कित्येक ठिकाणीं मोठमोठ्या वृक्षांवर चढलेले जाईचे जुनाट वेल फारच मोठे असतात. या वेलांवरून मनुष्यें सहज वर चढून जातात इतके ते मजबूत असतात. जाईचीं फुलें पांढरीं असून सुकुमार व सुवासिक अशीं असतात. जाईच्या पानांचा रस व्रणशोधक आहे. **जाई**–तुरट, कडू, लघु, उष्ण, तिखट; व मुखपाक, कफ, वायु, मुखरोग, दंतरोग; मस्तकरोग, नेत्ररोग, विष, कुष्ठ, रक्तदोष, व्रण, पित्त

व कृमि यांचा नाश करिते. हिच्या कळ्या—व्रण, विस्फोट, नेत्ररोग, कुष्ठ, यांचा नाश करितात. हिचें फूल—सुगंधि, मनोज्ञ; व कफ, पित्त यांचा नाश करितें. ( १. ) **जिभेस खरे येतात त्यास**—जाईच्या पाल्याचा रस पोटांत द्यावा. ( २. ) **गजकर्ण व नायटे यांवर**—जाईचें मूळ उगाळून लावावें. (३. ) **जखमेवर**—जाईच्या पाल्याची वडी करून जखमेवर बसवावी. ( ४. ) **कर्णशूलावर**—तिळाच्या तेलांत जाईच्या पाल्याचा अंगरस घालून तें तेल चांगलें कढवावें व सर्व रस आटूं द्यावा. याप्रमाणें ६।७पुटें देऊन तेल तयार करून ठेवावें. हें तेल कानांत घालावें ह्मणजे त्वरित गुण येतो. (५.) **ओकारीवर**—जाईचे पानांचा अंगरस काढून त्यांत मिरें व पिंपळीचें चूर्ण खडी साखरेची पूड व मध घालून द्यावें. ( ६. ) **जीर्णज्वरादि तीव्रज्वरावर**—दुधांत जाईचे मुळांचा काढा करून द्यावा. ( ७. ) **उपदंशावर**—जाईच्या कोंवळ्या पाल्याचा स्वरस २ तोळे, गाईचें तूप २ तोळे व किंचित् राळ घालून तो प्रातःकाळीं सेवन करावा, ह्मणजे ५ प्रकारच्या उपदंशांचा नाश होतो. यावर गहूं व तूप यांचें पथ्य करावें. (८. ) **मुखपाकावर**—जाईचा पाला चावीत जावा; अ० जाईचा पाला, दारुहळद, त्रिफला यांचा काढा करून त्याच्या गुळण्या कराव्या ह्मणजे त्वरित गुण येतो.

## ५१. जानवेल.

पर्जन्यकाळीं या वेली उगवतात. या वेलीचीं पानें लांबट असून कांटे असल्याप्रमाणें याच्या कडांस खांचें असतात. या वेली इतर झाडांवर चढलेल्या असतात. पाण्याच्या कडेस होणाऱ्या वेली मात्र उन्हाळ्यांत जिवंत राहतात. ( १ ) **आगपैणीवर**—जानवेल दुधांत वाटून तिचा रस पोटांत द्यावा, व जानवेलीची राख तिळांचे तेलांत खलून पैणीस लावावी, ह्मणजे त्वरित गुण येतो. ( २. ) **गजकर्णावर**—जानवेलीचा रस लावावा. ( ३. ) **गुरांच्या क्षतांत किडे पडतात त्यास**—जानवेलीच्या पाल्याची भुरी द्यावी.

## ५२. जांब.

कांहीं ठिकाणीं पेरूस व काजूच्या फळास जांब ह्मणतात. परंतु हें झाड त्याहून निराळें आहे. जांबाच्या दोन जाती आहेत. एकीस आंबट जांब व दुसरीस मलाखी जांब असें ह्मणतात. आंबट जांबाचें झाड उंच होतें. त्याचीं फुलें तांबडीं असतात; फळें पांढरीं व मोठीं असतात. त्याला मार्गशीर्ष व पौष या महिन्यांत फळें येतात. मलाखी जांबाचें झाड बहुतकरून मलाखा बेटांतून आणलें असावें. हें झाड उंच वाढत नाहीं; यास पांढरीं फुलें येतात. याच्या फळांचा रंग पिवळट असतो. याच्या अंगीं मधुरता असते व वास चांगला येतो. जांब वर्षांतून दोन वेळां पिकतात.

## ५३. जांभूळ. ( गु. जांबुडा. सं. जंबुवृक्ष. )

जांभळीचे वृक्ष सर्वत्र होतात. हा वृक्ष फार उंच वाढतो. याचीं पानें बकुळीच्या पानासारखीं असतात. जांभळीच्या झाडास वैशाख ज्येष्ठांत फळें येतात. या फळांचा रंग बाहेरून काळसर असून आंतून तांबूस असतो. रानांत जीं झाडें होतात त्यांचीं फळें बारीक व आंबट लागतात; परंतु बागांत जीं झाडें लावतात, त्यांचीं फळें मोठीं असून गोड असतात. बागांत लावलेल्या जांभळीस रायजांभूळ असें ह्मणतात. जांभळें कितीही खाल्लीं तरी उलटी होत नाहीं. जांभूळ हें शरीरास हितकारक आहे. जांभळीची छाया फार थंड असून सुखदायक आहे. जांभळीचें लांकूड फार चिवट असतें; तें पाण्यांत कुजत नाहीं. हें लांकूड घरकामासही उपयोगीं पडतें. जांभळीच्या झाडांत पाणी स्वच्छ करण्याचा मोठा गुण आहे. ज्या तळ्यांत शेवाळ वगैरे झालें असेल त्यांत जांभळीचे ठोकळ टाकले तर सर्व शेवाळ मरून जाऊन पाणी स्वच्छ होतें. जांभळाचा शिरका ( आंबवलेला रस ) करितात, तो पोटांतील गुल्म, उदर, अतिसार, विषूचि यांवर उपयोगीं पडतो. जांभूळ-तुरट, ग्राहक, मधुर, पाचक, मलस्तंभक, रुक्ष, रुचिकर, आंबट, कंठाला हितावह; व पित्त, दाह यांचा नाशक व कृमि, श्वास, शोष, अतिसार, कास, रक्तदोष, कफ, व्रण यांचा नाशक आहे. याचें फळ-तुरट, आंबट, मधुर, शीतल, रुच्य, रुक्ष,

ग्राहक, लेखन, कंठदूषक, मलस्तंभक, वातकारक; व कफ, पित्त, आध्मानवायु यांचा नाश करितें. **रायजांभूळ**—मधुर, उष्ण, तुरट, स्वर्य, मलस्तंभक; व श्वास, शोष, श्रम, मुखजाड्य, अतिसार, कफ, खोकला यांचा नाश करिते. हिचें फळ—मधुर, रुचिकर, स्तंभक, गुरु, दोषनाशक व स्वादु असें आहे. **जलजंबू**—तुरट, शीत, कडू, गुरु, पाककाळीं मधुर, आंबट, पुष्टिकर, ग्राहक, वीर्यवृद्धिकारक, बलकर; व श्रम, दाह, अतिसार, रक्तदोष, कफ, पित्त व व्रण यांचा नाश करिते. **भुयजांभूळ**—तुरट, प्रिय, मधुर, वीर्यप्रद, ग्राहक, पुष्टिकारक; व कफ, पित्त, हृद्रोग, कंठरोग व दाह यांचा नाश करिते. हिच्या फळाचे गुण रायजांभळीच्या फळांप्रमाणें आहेत. ( १. ) **घामोळ्या येतात त्या दूर होण्यास**—जांभळाच्या आंतली बी उगाळून लावावी; ह्मणजे घामोळ्या नाहींशा होऊन अंग स्वच्छ होतें. ( २. ) **रक्तातिसारावर**—जांभळीची साल दुधांत वाटून मध घालून प्यावी; अथवा जांभळीच्या पानांच्या रसांत मध, तूप व दूध मेळवून द्यावें. ( ३. ) **विंचवाच्या दंशावर**—जांभळीच्या पानांचा रस लावावा. ( ४. ) **पित्तावर**—जांभळीचे पाल्याचा रस तोळा १ व गूळ तोळा १ हीं एकत्र करून उन्हांत ठेवून निवळ येईल ती प्यावी. ( ५. ) **गर्भिणीचे अतिसारावर**—जांभळीची व आंब्याची साल घेउन तिचा काढा करून त्यांत १ तोळा लाह्यांचें व १ तोळा सातूंचें पीठ घालून चाटावयास द्यावें. अथवा पिकलेलीं जांभळें खाण्यास द्यावीं. ( ६. ) **मधुमेहावर**—जांभळीची साल अ० जांभळें सुकवून बारीक पूड करून ती दररोज २ तोळेपर्यंत खावी. जांभळें ताजीं मिळालीं असतां १५ दिवसपर्यंत खावीं. ( ७. ) **मुखरोगावर**—जांभूळ, बाभळ, बोर, बकूळ, यांतील कोणत्याही वृक्षाच्या अंतरसालीचें थंड पाणी काढून त्याच्या गुळण्या कराव्या; व यांच्या काड्यांनीं नेहमीं दंतधावन करावें; ह्मणजे कधींही मुखरोग होत नाहीं व दांतही बळकट होतात. ( ८. ) **अतिसारावर**—जांभळीच्या सालीचा रस द्यावा. ( ९. ) **बचनागाचे**

**विषावर**–जांभळीच्या अंतरसालीचा रस नवटाकपर्यंत, त्यांत तितकीच पेज घालून तो द्यावा. ( १०. ) **पित्तविकार**–जांभळीच्या सालीचा रस दुधाशीं मिळवून प्यावा या योगानें वांतीं होऊन पित्त पडतें. उतार तूपभात. ( ११. ) **पोटांत केश गेल्यास** व **लोहाचा अंश गेल्यास**–जांभळें खावीं. ( १२. ) **ओकारीवर**–जांभळीच्या सालीची राख मधांत द्यावी. ( १३ **जांभळांचा शिरका**–जांभळांचा रस काढून गाळून तो बाटलींत भरून ठेवावा. जसजसा तो रस आंबत जाईल तसतसा त्यांत जास्त गुण येत जातो. हा अतिसार, मोडशी, उदर, यांवर द्यावा.

### ५४. जायफळ. ( सं. जातिफल. ) गु. हिं.

एशिया खंडाच्या पूर्वेस मलाका ह्मणून बेटें आहेत. तेथें जायफळें होतात. हिंदुस्थानांतही श्रीमंत लोकांच्या बागांत हीं झाडें लावतात, परंतु त्यांस जायफळें फार येत नाहींत. हें झाड फार सुंदर दिसतें. याचीं फळें पिकून तयार झालीं ह्मणजे पेरुएवढीं असतात. आंत जायफळाच्या सभोंवती जायपत्री असते, तिचा रंग तांबडा असतो. फळाच्या वरची साल नारळाच्या चोडासारखी जाड असते. जशी नारळाला बाहेरून करोटी असते तसें जायफळासही बाहेरून पातळ कवच असतें; तें फोडलें ह्मणजे जायफळ बाहेर पडतें. जायफळ व जायपत्री हीं विड्यांत खातात व बासुंदी वगैरे पक्वान्नांत व पाक वगैरे औषधांत घालतात. जायफळांचें तेल निघतें. जायफळ साधारण मादक असून उष्ण, वीर्यवृद्धिकर व वातनाशक आहे. जायफळ तुपांत घालून ठेवलें असतां पुष्कळ वर्षें जशाचें तसें राहतें. **जायफळ**–तुरट, तिखट, वृष्य, दीपन, रसकाळीं कडू, लघु, ग्राहक, हृद्य, उष्ण, स्वराविषयीं हितकर; व कंठरोग, कफ, वायु, मेह, वातातिसार, मलदौर्गंध्य यांतें शामक व मुखवैरस्यकारक; व काळेपणा, कृमि, खोकला, वांति, दमा, पीनस, हृद्रोग, शोष यांचा नाश करितें. **जायपत्री**–तिखट, कडू, सुरभि, सुखा-

ला स्वच्छ करणारी, गोड, वर्णकारक, लघु, कांतिकर, रुचिकर, उष्ण; व अंगजडता, कफ, रक्तदोष, दमा, खोकला, वांति, तृष्णा, विष, वायु, कृमि यांचा नाश करिते. ( १. ) **डोकें दुखत असल्यास.**—जायफळ उगाळून लेप करावा. ( २. ) **झोंप लागत नसेल तर**—जायफळ तुपांत उगाळून डोळ्यांवर घालावें. ( ३. ) **झोंप येत नसल्यास, अतिसार व वांति व तृषा** लागत असल्यास—जायफळ खाण्यास द्यावें. ( ४ ) **मुलांस थंडीनें हगवण लागते त्यावर** गाईच्या तुपांत जायफळ व सुंठ उगाळून चाटण द्यावें. ( ५. ) **पडशावर**—गाईच्या दुधांत अफू कुवळून त्यांतच जायफळ गंधाप्रमाणें उगाळून नाकावर व मस्तकावर लेप द्यावा अथवा जायफळ दुधांत उगाळून गरम करून मस्तकास लावावें ( ६. ) **उचकीवर व वांतीवर**—जायफळ तांदुळांच्या धुणांत उगाळून द्यावें ( ७. ) **विषूचिका** ह्मणजे **मोडशीवर**—३ मासे जायपत्री दुधांत वाटून द्यावी. ( ८. ) **तारुण्यपीटिकेवर**—जायफळ दुधांत उगाळून लावावें. ( ९. ) **मोडशीवर**—जायफळ १ तोळा चूर्ण करून गुळांत तीन माशांच्या गोळ्या करून द्याव्या॰ गोळी अर्ध अर्ध तासानें द्यावी, व वर गरम पाणी थोडें प्यावें; ह्मणजे जुलाब बंद होतील. ( १०. ) **आमातिसार व अतिसार यांवर**—जायपत्रीचें दोन अडीच मासे चूर्ण, दह्यांच्या साईंत अथवा गाईच्या दह्यांत कालवून द्यावें. दि० ७; ह्मणजे हे रोग असाध्यही असले तरी बंद होतात. ( ११. ) **पोट फुगतें व परसाकडे होत नाहीं त्यास**—निंबूचे रसांत जायफळ उगाळून द्यावें; ह्मणजे परसाकडे होऊन पोट उतरतें. ( १२. ) **पटकीच्या पेटक्यांवर उपाय**—एक जायफळ घेऊन चूर्ण करावें. तें पावशेर गोड्या तेलांत कालवावें. मग तें भांड्यांत घालून कढवावें. चांगलें कढल्यावर खालीं उतरून साफ निवाल्यावर कुपींत घालून बंद करून ठेवावें, जरूरीच्या वेळीं जेथें पेटके ( गोळे )

येत असतील तितक्या भागावर तें चोळावें, ह्मणजे पेटके त्वरित बंद होतात.

## ५५: जास्वंद. [ सं. जपा. ]

हें झाड सुमारें पुरुषभर वाढतें. जास्वंदींत पांढरी, तांबडी, भगवी, अशा पुष्कळ (सुमारें १८) जाति आहेत. परंतु पांढरी जास्वंद अधिक गुणावह आहे. तांबड्या जास्वंदीच्या फुलांचा रस चाकूच्या पानास लावून त्यानें लिंबू कापलें तर आंतून रक्तासारखें तांबडें पाणी निघतें. **जास्वंद**-शीतळ, मधुर, स्निग्ध, पुष्टिकारक, गर्भवृद्धि करणारी, ग्राहक, केश्य, वांति, कृमि यांना करणारी; व दाह प्रमेह, अर्श, धातुरोग, प्रदर, इंद्रलुप्त यांचा नाश करिते. हिचें फूल-लघु, ग्राहक, कडू; व केश वाढविणारें असें आहे. ( १. ) **वायगोळ्यास**-जास्वंदीचे पाल्याचा रस प्रत्यहीं नवटाक पोटांत द्यावा. दि ७. ( २. ) **पित्त शमनार्थ**-पांढरे जास्वंदीचे पाल्याचा रस साखर घालून द्यावा ( ३. ) **गर्भधारणास**-पांढऱ्या जास्वंदीचें मूळ एकवर्णी गाईचे दुधांत उगाळून त्यांत महाळुंगीच्या बिया बारीक वाटून घालाव्या व तें ऋतुकाळीं पिण्यास द्यावें. ( ४. ) **गर्भस्राव होण्याची खोड असल्यास**-पांढऱ्या जास्वंदीचें मूळ, कुंभारणीचे घराची माती, कुंभाराचे निर्पणाची माती व गोपीचंदन दुधांत उगाळून द्यावें. ( ५. ) **टक्कल पडतें त्यास**-जास्वंदीचें फूल अगर पाला तेथें चोळावा. ( ६. ) **धुपणीवर**-पांढऱ्या जास्वंदीच्या ४।५ कळ्या तुपांत तळून खडीसाखरेबरोबर खाव्या, व वर गाईचें दूध प्यावें. याप्रमाणें संध्याकाळीं कळ्या खाव्या. दि० ७ ( ७. ) **रक्तातिसार व मुळव्याधीवर**-पांढऱ्या जास्वंदीच्या कळ्या तुपांत तळून, खडीसाखर व नागकेशर घालून तुपांत गोळी करून द्यावी. ( ८. ) **धातुविकार व पुष्टतेस**-जास्वंदीच्या कळ्या ४।५ घेऊन तुपांत तळून खडीसाखरेबरोबर खाव्या व वर गाईचें दूध प्यावें. याचप्रमाणें संध्याकाळीं वरप्रमाणें कळ्या खाव्या. ( ९. ) **थंडचा प्रमेहा-**

वर-पांढऱ्या जास्वंदीची मुळी आणि गोमेटीची मुळी या दोन्ही मुळ्या समभाग गाईच्या तुपांत उगाळून द्याव्या. ( १०. ) **प्रदर, धातुविकार, रक्तमूळव्याधि, उपदंश व प्रमेह यांवर**-पांढऱ्या जास्वंदीचें मूळ गाईच्या निरशा दुधांत उगाळून, आंत थोडी खडीसाखर घालून सकाळीं व संध्याकाळीं, याप्रमाणें सतत कांहीं दिवस सेवन करावें. व तेलकट, तिखट, उष्णपदार्थ वर्ज करावेत. या औषधापासून पुष्टताही प्राप्त होते. ( ११. ) **उदकमेहावर**-जास्वंदीचीं पानें अथवा फुलें खडीसाखरेबरोबर खावीं. ( १२. ) **प्रदर व धातुविकार यांवर**-पांढऱ्या जास्वंदीच्या मुळ्या, कमळकंद, पांढऱ्या सावरीचा कंद अथवा साल यांची ६ मासे वस्त्रगाळ पूड, नित्य सकाळ सायंकाळ गाईच्या दुधांत खडीसाखर घालून त्यांतून द्यावी. ( १३. ) **करतुडें न होण्यास**-चौदा दिवसपर्यंत नित्य जास्वंदीच्या कळ्या ९ घेऊन खडीसाखरेशीं खाव्या.

**५६ जिरें. ( ग. धोळूं जीरूं. हिं. जीरा. सं. जीरक. )**

जिऱ्याचीं झाडें ओंव्याच्या झाडाप्रमाणें असतात. ओंव्याप्रमाणेंच जिऱ्याच्या झाडावर जिरें येतें. हिंदुस्थानांत पुष्कळ प्रांतांत जिरें उत्पन्न होतें. जिऱ्याचा उपयोग मसाल्यांत व औषधांत पुष्कळ होतो. जिरें हें वातहर, क्षुधा प्रदीप्त करणारें, रुचिकर व थंड आहे. अंगांतील गर्मी ( उष्णता )काढण्यास जिरें हें वस्ताद आहे. जिऱ्याविषयीं एक हिंदुस्थानी ह्मण आहे-' थंडीकू जीरा और गर्मीकू मिरा. ' **पांढरें जिरें**-तिखट; ग्राहक, पाचक, दीपन, लघु, किंचित् उष्ण, मधुर, चक्षूंना हितावह, रुचिकारक, गर्भाशयाला शुद्ध करणारें, रूक्ष, बलकर, सुगंधि, कडू; व वांति, क्षय, आध्मानवायु, कुष्ठ, विषदोष, ज्वर, अरुचि, रक्तदोष, अतिसार, कृमि, पित्त, गुल्म यांचा नाश करितें. **पिंवळें जिरें**- दीपन, तिखट, उष्ण; व अतिसार, आध्मानवात, गुल्म, संग्रहणी व कृमि यांचा नाश करितें. ( १. ) **ओंठावर ज्वर ( जर ) उठतो त्यास**-जिरें पाण्यांत वाटून लावावें. ( २. ) **रातांधळ्यांस**-जिरें, आवळकाठी व कापशीचा

पाला शिळच्या पाण्यांत समभाग वाटून डोकीवर २१ दिवस पेंड ठेवा-वा. ( ३ ) जीर्णज्वरास- जिऱ्याची पूड एक पैसाभार प्रातःकाळीं अ-गर रात्रीं जुन्या गुळांतून खात जावी. दि० २१. (४.) धुपणीवर-जिरें व खडीसाखर यांचें चूर्ण तांदुळाच्या धुणांत द्यावें. ( ५. ) परिणा-मशूळावर-जिरें, हिंग व सैंधव यांचें चूर्ण, मध व तुपाशीं द्यावें. ( ६. ) हरताळाचे विषास-जिरें व साखर ७ दि० द्यावी. ( ७. ) जीर्णज्वरावर-जिरें गाईच्या दुधांत शिजवून त्याचें चूर्ण करून तें खडी-साखरेबरोबर खावें; ह्मणजे अंगांतील कडकी निघून अंगांत शक्तीही येते. ( ८. ) मुखरोगावर-जिरें कुटून त्याचे पाण्यांत चंदन उगाळून त्यांत एलचीची पूड व तुरटीची लाही घालून गुळण्या कराव्या. ( ९. ) हिंव-तापावर-जिरें एक तोळा कारलीच्या रसाशीं द्यावें. अ० रात्रीं जुन्या गुळातून द्यावें. ( १०. ) सामान्य ज्वरावर-जिऱ्याचें चूर्ण जुन्या गुळांत कालवून १ तोळा वजनाची गोळी करून निजनेवेळीं ध्यावी, ह्मणजे घाम येऊन ज्वर निघून जातो. ( ११. ) जीर्णज्वरावर-जिरें व त्याच्या अष्टमांश शहाजिरें तुपांत साधारण भाजून बारीक पूड करावी, व खडी-साखरेचा अ० जुन्या गुळाचा पाक करून त्यांत घालून वड्या किंवा गोळ्या कराव्या. हें औषध नित्य दोहीं सांज एकेक तोळा घ्यावें. दि० ९१. ( १२. ) ओकारीवर-पीतांबराचे फडक्यांत जिरें घालून त्याची विडी नाकानें ओढावी.

## ५७ जुई. ( सं. यूथिका )

जुईच्या वेलास त्रिदलें ह्मणजे तीन पानें एका जागीं अशीं येतात. हीस कोणी साइली असेंही ह्मणतात. जाईच्या फुलांप्रमाणेंच जुईचीं फुलें असून सुवासिक आहेत. जुई—स्वादु, कडू, शीतळ, तिखट, लघु, मधुर, हृद्य, तुरट, सुगंधि; व वायु, कफ, यांना करणारी; व पित्त, दाह, तृषा, मूत्राश्मरी, त्वग्दोष, रक्तदोष, व्रण, दंतरोग, नेत्ररोग, मुखरोग, शिरोरोग विष व नवज्वर यांचा नाश करिते.

५८. जेपाळ. ( सं. जेपाल, बृहद्दंती. ) दंती पहा!

मोगली एरंडाचीं जशीं झाडें असतात, तशींच जेपाळाचीं झाडें होतात. मोगलीएरंडाच्या पानांहून याचीं पानें लहान असतात. हीं झाडें कोंकणप्रांतीं पुष्कळ होतात. यास जें बीं येतें त्यास 'जेपाळ' व मुसलमानी भाषेंत 'जमालगोटा' असें ह्मणतात. हें एरंड्यांप्रमाणें असतें. हें मोठें विषारी आहे. हें शुद्ध करून अनेक रसायनांत घालतात. हें तीव्र रेचक आहे. जेपाळ—सारक, कडू, तीक्ष्ण, अग्निदीपक, वांतिकारक, तिखट, अति उष्ण, पित्तकर, भेदक; व कफ, आम, जंतु व उदरें यांचा नाश करितो. ( १. ) विंचवाच्या विषावर—जेपाळ पाण्यांत वाटून त्याचा लेप करावा. ( २. ) सर्पाचे विषावर—जेपाळाचे बियांतल्या मगजास निंबुरसाचीं २१ पुटें देऊन बारीक खलून लांबोडी गोळी करावी व ती गोळी मनुष्याचे लाळेंत उगाळून अंजन करावें. ( ३. ) अर्धशिशीवर—मोठ्या पहांटेस दोन किंवा तीन जेपाळाच्या बियांतील मगज घेऊन तो निंबाच्या रसांत उगळावा, व ज्या बाजूचें मस्तक दुखत असेल त्या बाजूच्या डोळ्यावरील भिवईवर तें काडीनें लावावें. थोडी चुणचुण होईल खरी, पण त्याच दिवशीं व्याधि हटकून दूर होते. अथवा निंबाच्या रसांत जेपाळाच्या बियांतील मगज उगाळून ज्या बाजूकडील कपाळ दुखत नसेल त्या कानांत घालावा. हा रस घालण्याच्या अगोदर थोडेंसें तूप कानांत घालावें; ह्मणजे कानांची आग होत नाहीं. हा प्रयोग पहांटेस करून कांहीं खाऊन थोडी झोंप घ्यावी. ( ४. ) मोडशीवर—जेपाळाचें मूळ ताकांत उगाळून द्यावें. व हेंच मूळ पाण्यांत उगाळून अंगासही लेप करावा. ( ५. ) गंडमालांवर—जेपाळाचीं पानें वाटून त्यांच्या अंगरसाची वडी सावलींत वाळवून त्याचा लेप करावा.

५९. ज्येष्ठमध. ( सं. मधुक. गु. जेठीमध. ई. मुलहठी, जेठीमधु.)

ज्येष्ठमधाचे वेल हिंदुस्थानांत बहुतेक ठिकाणीं होतात. दक्षिण युरोपां-

तहीं ही वनस्पति होते. ही वनस्पती उगवण्याला जमीन डोंगराळ व ओलसर लागते, व हवेचें मान उष्ण असावें लागतें. ज्येष्ठमधाची दुसरी जात आहे, तिचे क्षूप (झुडप) असतात. या क्षुपांची उंची सुमारें २ हात असते. याचीं पानें कोरांट्याच्या पानांसारखीं लांबट असतात. यास पांच पांच अंगुळांवर कांडें असतात. सातारा जिल्ह्यांत माहुलीच्या डोंगरावर हीं झाडें बरींच होतात. हीं उन्हाळ्यांत अगदीं सुकून जातात. पाण्यांत होणारी एक ज्येष्ठमधाची जात आहे, तीस "मधूलिका" असें संस्कृत भाषेंत नांव आहे. या वनस्पतीचीं मुळें काढून आणतात, त्यास ज्येष्ठमध असें ह्मणतात. ज्येष्ठमध गोड असते. परकीय लोक या वनस्पतीच्या मुळांचा अर्क काढून त्याच्या कांड्या तयार करून इकडे पाठवितात व आपण त्या कांड्या गोड ह्मणून मोठ्या आवडीनें चघळितों. परंतु ज्येष्ठमध इकडे विपुल मिळत असून त्याच्या अर्काच्या कांड्या करण्याकडे अझून इकडील लोकांचें लक्ष जात नाहीं, ही मोठी शोचनीय गोष्ट आहे. **मधुवल्ली**—दोन प्रकारची ( जलज व स्थलज ). वृष्य, मधुर, रुच्य, बल्य, गुरु, शीतळ, चक्षुष्य, वर्णकर, स्वर्य, स्निग्ध, केशांना हितावह, शुक्रल, रक्तपित्तनाशक, व्रणशुद्धि करणारी; व सूज, विष, वातरक्त, व्रण, वांति, तृषा, ग्लानि, क्षय, रक्तदोष, रक्तपित्त, पित्त, सद्योव्रण, वातपित्त यांचा नाश करिते. **मधुयष्टी**—मधुर, किंचित् कडू, शीतळ, चक्षुष्य, रुचिकर; व शोष, पित्त, तृषा, व्रण यांचा नाश करिते. वरकड गुण मधुवल्लीसारखेच आहेत. ( १. ) **ज्येष्ठमधाचा शिरा** तयार करण्याची कृति—या ज्येष्ठमधाच्या मुळ्या चार पांच वर्षांच्या झाल्याशिवाय अर्क काढावयास योग्य होत नाहींत. सुमारें शंभर पौंड वजन मुळ्यांपासून १६ पौंड अर्क निघतो. ज्येष्ठमधाच्या मुळ्या आणून त्याचे दोन चार बोटें लांबीचे तुकडे पाडावे व ते पाण्यांत घालून चांगले धुवावे. नंतर ते पाणींत ओबड धोबड कुटावे. हीं पीठ झालेलीं मुळें एका मोठ्या भांड्यांत घालून २४ तासपर्यंत मंदाग्नीवर शिजवावीं. मग तीं एका

स्क्रूच्या दाबाखालीं ठेवून त्यांतील सर सर्व काढून घ्यावा. ही शिजविण्याची व रस काढण्याची क्रिया, त्या मुळ्यांवर दोन चार वेळ करावी लागते, व जो रस निघेल तो गाळून पुनः चुलीवर ठेवावा लागतो. बराच वेळ शिजल्यावर हा काढा उथळ परातींत घालून पुनः चुलीवर ठेवावा व वरचेवर ढवळावें. हें ढवळणें, तो रस घट्ट होईपर्यंत चालू ठेवावें. नंतर परात चुलीवरून खालीं उतरून त्याच्या कांड्या एका सांच्यांत घालून पाडाव्या ह्मणजे तयार झाल्या. अशी ही या कांड्यांची स्वल्प कृति आहे. या कांड्या खोकल्यावर दाढेखालीं धरितात, तेणेंकरून खोकला शमतो व तृषाही शमन होते. ( २. ) **तृषा शमन होण्यास**—ज्येष्ठमधाचें मूळ दाढेखालीं धरून रस गिळीत जावा अ० ज्येष्ठमधाचा काढा करून घ्यावा. ( ३. ) **आगंतुक जखम** लागल्यास त्यावर ज्येष्ठमधाचें चूर्ण तुपांत खलून किंचित् उष्ण करून लेप द्यावा. ( ४. ) **उचकीवर**—ज्येष्ठमधाचें चूर्ण मधांत द्यावें. ( ५. ) **वमन होण्यास**–ज्येष्ठमधाच्या काढ्यांत ३ मासे मोहऱ्यांचें चूर्ण घालून द्यावें, ह्मणजे वमन होऊन विषदोष, अजीर्ण व कफ हे शमन होतात ( ६. ) **वीर्यवृद्धि व बल प्राप्त होण्यास**—ज्येष्ठमधाचें चूर्ण तूप व मध यांमध्यें मिश्र करून द्यावें, व वर दूध प्यावें. ( ७. ) **आगरू** ह्मणजे तोंडांत चट्टे पडतात त्यास—रात्रौ खडीसाखर व कंकोळ दाढेखालीं धरावा व सकाळीं ज्येष्ठमधाचा काढा, खडीसाखर व तूप घालून प्यावा. ( ८. ) **पित्तप्रदरावर**—ज्येष्ठमध १ तोळा वाटून तांदुळाच्या धुणाशीं कल्क करून, साखर ४ तोळे घालून तो द्यावा. ( ९. ) **मुलांच्या त्वग्विकारावर**—गाईचे लोण्याची विरघळ ( लोणी थोडें गरम करून पातळ केलेलें ) घेऊन त्यांत ज्येष्ठमधाचा शिरा उगाळावा व त्यांतच थोडा पांढरा कात घालून खल करावा, व तें मिश्रण अंगावरील चट्ट्यांस लावावें. ( १०. ) **उष्णतेमुळें छातींत कफ शुष्क झाला असल्यास व खोकल्यावर**—ज्येष्ठमधाचा काढा करून त्यांत खडीसाखर घालून प्यावा

( ११. ) उरःक्षतक्षयावर–ज्येष्ठमध व चिकणामूळ यांचा काढा करून त्यांत पिंपळी व वंशलोचन यांचें चूर्ण घालून द्यावें. ( १२. ) अपस्मारावर–कोहळ्याचे गिरांत ज्येष्ठमध उगाळून द्यावें. ( १३. ) कफरोगावर–ज्येष्ठमधाचा काढा, मध अथवा खडीसाखर घालून द्यावा; अथवा गोमूत्रांत ज्येष्ठमध व बेहडा उगाळून चाटण करून द्यावें. ( १४. ) त्रिदोषावर–आल्याचा रस व तुळशीचा रस यांत ज्येष्ठमध उगाळून त्यात मध घालून तें द्यावें. ( १५. ) अक्षिरोगावर–ज्येष्ठमध मधांत उगाळून डोळ्यात अंजन करावें. ( १६. ) कफदोषानें दूध दूषित झालें असतां त्यांवर–ज्येष्ठमध व सैंधव घालून तूप द्यावें व अशोकाचीं फुलें वाटून स्तनाला व बाळकाच्या ओठांस लेप द्यावा म्हणजे बाळकाला सुखानें वांति होते व कफकोपही शांत होतो. ( १७. ) गालगुंडावर–ज्येष्ठमधाचा शिरा स्त्रीच्या दुधांत उगाळून लेप द्यावा. ( १८. ) मूत्रकृच्छ्रावर–ज्येष्ठमधाचें बारीक चूर्ण करून दुधांत कालवून द्यावें. ( १९. ) हृद्रोगावर–ज्येष्ठमध व कुटकी यांचें चूर्ण उष्णोदकाशीं द्यावें. ( २०. ) पटकीवर–ज्येष्ठमधाचा काढा द्यावा. ( २१. ) रक्तजनितवांतीवर–ज्येष्ठमध व पांढरा चंदन हे दुधांत द्यावे. ( २२. ) स्वरभंगावर–ज्येष्ठमधाचें चूर्ण तूपसाखरेशीं द्यावें.

### ६०. जोंधळा. ( गु. जुवारी. सं. यावनाल. )

बुंदेलखंड, माळवा, गुजराथ, खानदेश, वऱ्हाड, कृष्णागिर, बालेघाट, धारवाड व मद्रास देशाच्या कित्येक भागांत हें धान्य फार पिकतें. खरिपाच्या पिकास जोंधळा व रबीच्या पिकास शाळू असें म्हणतात. जोंधळा हें धान्य बळकट असून शीतळ आहे. जोंधळ्याचें ताट तीन चार हात उंच वाढतें. जोंधळ्याचीं ओलीं कणसें भाजून खातात, त्यास हुरडा असें म्हणतात. तो गोड असून पौष्टिक आहे. देशावर हा मोठ्या प्रतिष्ठितपणानें इष्टमित्रांसह खातात. देशावरील लोकांस हुरडा हा एक मेवाच आहे. त्यांस हा हुरडा मिळाला म्हणजे भाकरीची देखील जरूर लागत नाहीं.

जोंधळ्याचें ओलें ताट उंसाप्रमाणें गोड लागतें. जोंधळ्याचीं ओलीं ताटें गुरांस फारच मानवतात. याचा वाळला कडबाही गुरांस इतर वैरणीपेक्षां चांगला आहे. जोंधळा आठ दहा वर्षेपर्यंत टिकतो. देशावर पूर्वी जोंधळ्याचीं पेवें व अंबारें भरून ठेवीत असत. परंतु हल्लीं स्वमांत देखील पेव व अंबार मिळावयाचें नाहीं. कारण लोक इतके कंगाल व भिकारी झाले आहेत कीं, त्यांस शेतांतील धान्य घरीं आलें कीं, आधीं सरकारची व सावकाराची भरती करावी लागते. ती भरती करून बाकी थोडेंबहुत जें राहील त्यांत कसातरी प्रपंच भागवावा लागतो. लक्षावधि लोक अर्धपोटीं राहूं लागले आहेत! केवढी ही हिंदुलोकांस विपन्नावस्था प्राप्त झाली आहे, कीं ज्यांनीं रात्रंदिवस सतत उद्योग करून जें धान्य उत्पन्न केलें तें सुद्धा त्यांस पोटभर खावयास मिळूं नये? हिंदु लोकांनीं धान्यें उत्पन्न करावीं आणि परकीयांनीं त्यांच्यावर यथेच्छ हात मारावा हाच प्रकार सध्यां चालू आहे. पूर्वींच्या काळांत लोकांजवळ धान्याचीं कोठारें भरपूर भरून ठेवलेलीं असत; ह्मणून दुर्गादेवीसारखे बारा बारा वर्षेपर्यंत रहाणारे भयंकर दुष्काळ पडत, तरी पूर्वींचे लोक तसल्या दुष्काळांतून निभावून जात. परंतु हल्लीं लहानसा जरी दुष्काळ पडला तरी हजारों लोकांचे—अन्न न मिळाल्यामुळें—रस्त्यांतून सांगाड्यांचे सांगाडे पडतात. हें जर अनुभवास आलें आहे, तर एखाद्या भयंकर दुष्काळांत लोकांची अतिशय वाईट स्थिति होईल असें निश्चयानें सांगतां येतें. परंतु परमेश्वरानें असा प्रसंग आह्मांवर कदापीही आणूं नये. सध्याच्या हिंदु लोकांची स्थिति, प्रखर दोन प्रहरच्या उन्हाप्रमाणें झाली आहे, असें अनेक गोष्टींनीं सिद्ध करितां येतें. सुज्ञ, ज्ञानी आणि दूरदर्शी लोकांनीं ही स्थिति सुधारण्याचा कांहींतरी प्रयत्न करावा, ह्मणजे त्यास कालांतरानें तरी खचित यश येईल. **साधारण जोंधळे**—गुरु, शीत, रुक्ष, ग्राहक, रुचिकर, वृष्य, मलस्तंभक, स्वादु; व पित्त, कफ, रक्तरोग यांचा नाश करितात. **पांढरे जोंधळे**—पथ्यकर, वृष्य, बलप्रद; व त्रिदोष, अर्श, व्रण, गुल्म, अरुची

यांचा नाश करितात. शालू जोंधळे—कफकारक, पिच्छल, गुरु, शीतल मधुर, वृष्य, बलकर, पुष्टिकारक; व त्रिदोषनाशक आहेत. ( १. ) घाम येण्यास—जोंधळ्याचे लाहीपिठाचा काढा करून घ्यावा.

## ६१. झरस. ( सं. झरसी. )

झरसाचें झाड हें हरयाळीसारखें शेतजमिनींत व वाडींत—जेथें सरदीची जागा असते तेथें—होतें. ही भाजी वैशाख ज्येष्ठांत पुष्कळ होते. हें झाड सुमारें वीतभर जमिनीवर पसरलेलें असतें. त्याचे फांटे इकडेतिकडे पसरलेले असतात. झरसाची पानें बारीक मेंदीसारखी असून तीं फार कडू आहेत ही भाजी वायुनाशक आहे, ह्मणून लोक मोठ्या अगत्यानें खातात या भाजींत कांदा पुष्कळ घालावा लागतो. मळ्यांत होणाऱ्या झरसांत कडूपणा किंचित् असतो.

## ६२. झाडशेवाळी.

झाडशेवाळीचीं झाडें ओढ्यांत उत्पन्न होतात. याची उंची सुमारें एक हात असते. या झाडास कांद्याच्या झाडाप्रमाणें पात्या असून त्या रुंदट असतात. हीं झाडें बहुतेक प्रांतो होतात. ही बाराही महिने मिळतात. ( १. ) बद फुटण्यास—झाडशेवाळीची मुळी गंधाप्रमाणें पाण्यांत उगाळून तुरीचे डाळीएवढा ठिपका द्यावा. याप्रमाणें तीन चार वेळां लाविल्यानें कशीही जरी गांठ असली तरी त्वरित फुटते. हें औषध मनुष्यास कोणत्याही प्रकारची गांठ झाली असता तिजवर व गुरें आणि घोडे यांस ज्या गांठी होतात त्यांजवर लाविलें असतां दोन प्रहरांत किंवा एक दिवसांत रंध्र करून दर्द काढणारें अति उत्तम आहे.

## ६३. झिंझरूट. ( सं. झिंझिरा, बृहन्नागबला. )

हें झाड तीन चार हात उंच वाढतें. याचीं पानें लहान असून तीं कांहींशीं एरंडाच्या पानासारखीं असतात. यास गुलाबी रंगाचीं बारीक

फुलें येतात. या झाडावर कुमांनीं व्यास असें चपटें गोलाकार फळ येतें. त्यांत चार पाकळ्या असतात. हें फळ निबर होऊन सुकत चाललें ह्मणजे त्या पाकळ्या निरनिराळ्या होतात. हीं फळें तुपकडीच्या फळाप्रमाणेंच वस्त्रास चिकटतात. हीस 'लेचो' असेंही ह्मणतात. झिझरूट—तुरट, तिखट, शीतळ, वृष्य, बलप्रद, स्त्रियांचें दूध वाढविणारी, रक्तातिसाराला नाशक, तृप्तिकारक अशी आहे. (१.) **बेंबीजवळ गांठ झाली असल्यास**—झिझरुटीचें मूळ उगाळून बेंबीवर ठिपका द्यावा व मूळ कंबरेस बांधावें. (२.) **उपदंशावर**—झिझरुटीचा पाला मूठभर वाटून त्यांत थोडीं जिरें व धणे घालून द्यावा. दि० ७. व चट्ट्यांस या झाडाची धुरी द्यावी (३.) **कुत्र्याच्या विषावर**—झिझरुटीचें बीं, कडू भोंपळा, जुना गूळ, गुडगुडाचा कीट हीं कुटून पोटात द्यावीं (४) **बैलांचा खांदा सुजतो त्यास**—इच्या मुळाची साल चावून लावावी.

## ६४. टाकळ (सं. अग्निमंथ. गु. अरणी. हिं. गनिआरि.)

टाकळीस "अरणी," "ऐरण," असेंही ह्मणतात. टाकळींत लहान व मोठी अशा दोन जाती असून पांढरी व काळी अशाही आणखी दोन जाती आहेत. लहान जातीचीं झाडें पुरुष दोन पुरुष उंच वाढतात. मोठ्या जातीचें झाड बरेंच मोठें होतें. हिचीं पानें कात्रेदार असून तीं नरवेलाच्या पानाहून लहान असतात. टाकळीस फुलांचा बहार येतो, त्या वेळीं या फुलांवरून आलेली वायूची झुळूक सुगंधि असून मनास आल्हाद देते. गांवाशेजारीं हीं झाडें फार होतात. कोंकणादेशावर हीं झाडें फार होतात. काळ्या टाकळीच्या मुळांचें तेल काढतात. दशमूळांत हिचें मूळ येतें. थोर टाकळ—ही तिखट, उष्ण, मधुर, कडू, तुरट, अग्निदीपक, अशी आहे; व वायु, पडसें, कफ, सूज, अर्श, आमवात, मलावरोध, अग्निमांद्य, पांडुरोग, विषदोष, आम, आणि मेदोरोग यांचा नाश करिते. लघु टाकळीचें गुण थोर टाकळीसा-

रेचक आहेत, परंतु विशेषेंकरून लेपन, पेंड बांधणें, याविषयीं ही हित-कर, व सूज यांचा नाश करितें. ( १. ) सुजेवर–टांकळीच्या पाल्याचा पेंड बांधावा. ( २. ) शीतज्वरावर–टाकळीचें मूळ मस्तकीं बांधावें. ( ३. ) वाघचवड्यास–टाकळीचा पाला मीठ घालून बांधावा. ( ४. ) अंड उतरल्यास–टाकळीचा पाला वाटून ऊन्ह करून अंडास पेंड बांधावा व तांब्याच्या काडीनें पायाच्या अनामिकेस पेरावर डाग द्यावा. ( ५. ) जीर्णज्वरावर–पांढऱ्या टाकळीचें मूळ विधियुक्त शेंडी-स बांधावें. ( ६. ) त्रिदोष गुल्मावर–लहान अथवा थोर टाकळीच्या मुळांचा काढा गरम असतांच गूळ घालून प्यावा. ( ७.) वसामेहा-वर–टाकळीचे मुळाचा काढा घालून द्यावा. ( ८.) शीतपित्तावर–टाक-ळीच्या मुळाचें चूर्ण तुपाशीं प्राशनार्थ द्यावें. ( ९. ) पक्षघात संधिवा-यु व सूज यांवर–काळ्या टाकळीच्या मुळांचें तेल काढून त्याचा दररो-ज लेप करीत जावा व शेकीत जावें.

### ६५. टाकळा. (गु. कुवाडीओ. हिं. हाकुच. सं. चक्रमर्दक, दद्रुघ्न.)

यास देशावर तरवटा असें ह्मणतात. रानभाजींत टाकळा हा जगप्रसिद्ध आहे. पर्जन्य पडून पंधरा दिवस होतांच टाकळा भाजी करण्यास उप-योगी असा होतो. हें झाड सुमारें कंबरेइतकें वाढतें; यास पिवळ्या रंगा-चीं फुलें येऊन बारीक शेंगा येतात. या शेंगांत मेथ्यांप्रमाणें बिया अस-तात. गरीब लोक टाकळ्याच्या भाजीवरच कित्येक दिवस काढतात. **टाकळा**–गोड. रुक्ष, लघु, कडू, तिखट, हृद्य, शीतळ, खारट; व वायु, पित्त, कफ, दद्रु; कुष्ठ, कृमि, दमा, मस्तकशूल, व्रण, मेदोरोग, परमा, त्रिदोष, अरुचि, ज्वर, मळ व मूत्र यांचा स्तंभ, मेह, खोकला, यांचा नाश करितो. याचें **बीज**–ग्राहक, उष्ण, तिखट; व कफ, कुष्ठ, दमा, खोकला, दद्रु, कंडु, विष, सुज, गुल्म व वातरक्त यांचा नाश करितें. **याच्या पाल्याची भाजी**–लघु, पित्तकर, आंबट, उष्ण; व कफ, वायु

दद्रु, कुष्ठ, परमा, कंडू, खोकला, दमा यांचा नाश करितें. ( १. ) इस-बावर—टाकळ्याची मुळी उगाळून लावावी. ( २. ) काळपुळीस-पांढरे टाकळ्याचा पाला ७ दि० लावावा. (३. ) गजकर्णावर—टाकळ्याच्या पाल्याचा रस निंबाच्या रसांत मिश्र करून लावावा. ( ४. ) सोमरोग ह्मणजे जलप्रदरावर-टाकळ्याच्या मुळ्या तांदुळाच्या धुवणांत वाटून प्राशन कराव्या. ( ५. ) पुष्टतेस व अंगांत गर्मी मुरून रक्त नासतें त्यावर-टाकळ्याचीं मुळें आणून स्वच्छ धुऊन सुकवावीं, व त्यांची वस्त्रगाळ पूड करून ठेवावी. प्रतिदिवशीं प्रातःकाळीं तूप २ तोळे, खडीसाखरेची पूड १ तोळा यांत टाकळ्याच्या मुळाचें चूर्ण ४ माशांपासून १ तोळ्यापर्यंत कालवून घ्यावें. याच्या योगानें रक्त शुद्ध होऊन शक्तिही वाढते. ( ६. ) अर्धशिशीवर—टाकळ्याचें बीं कांजींत वाटून लेप करावा. ( ७. ) इसबास—टाकळ्याच्या बिया ६ भाग, बांवच्या ४ भाग व गाजराचें बीं २ भाग, यांचें चूर्ण मडक्यांत घालून गोमूत्रांत ८ दिवस भिजूं द्यावें व नंतर लावावें. हें औषध सुकूं न दिलें तर वर्षभर उपयोगीं पडतें. ( ८. ) व-सामेहावर—टाकळ्याचे मुळांचा काढा द्यावा. ( ९. ) वळ फुटण्यास—टाकळ्याचा पाला बारीक वाटून त्याची गोळी करून वळावर बसवावी. याप्रमाणें एकेक प्रहरानें ताजी गोळी बसवावी ह्मणजे वळ फुटतो. ( १०. ) वांसरांस किंवा गुरांस कृमि झाले असतां त्यांवर—टाकळ्याच्या पाल्याचा रस काढून त्यांत तितकेंच ताक घालावें, आणि गंधक एक तोळा व हिंग पाव तोळापर्यंत दोन्हींची पूड करून त्यांत मिश्र करून पाजावी. वांसरांस देणें झाल्यास रस नवटांक व औषधें चतुर्थांश असावीं. थोर गुरांस अच्छेरपासून, एक शेरपर्यंत रस व वर लिहिल्याप्रमाणें वजनानें औषधें असावीं. ( ११. ) शीतपित्तावर—टाकळ्याच्या मुळाचें, चूर्ण तुपांत कालवून द्यावें.

६६. टेंटू ( सं. श्योनाक. गु. अरलु. हिं. शोना. )

टेंटूचा वृक्ष फार मोठा होत नाहीं. याचीं पानें कांहींशीं मिरवेलीच्या

पानासारखीं असतात. याच्या फांद्या पपईच्या झाडासारख्या पोकट असतात. यास शेंगा येतात. त्या चार अंगुळें रुंद असून हात दोन हात लांब असतात. यांत सुमारें दोन अडीचशें बिया असून त्या केवळ कापसाप्रमाणें असतात. या शेंगा कोंवळया असतात तेव्हां त्यांची भाजी व लोणचें करितात. या शेंगांचा आकार हुबेहुब तरवारीसारखा असतो. टेंटूमुळाची अंतरत्वचा हिरव्या रंगाची असते. दशमूळांत टेंटूमूळ येतें. टेंटूस "टेंटवें" "जगदळा" असेंही कोणी ह्मणतात. टेंटू-तुरट, कडू, तिखट, अग्निदीपक ग्राहक, शीतळ, वृष्य, बलप्रद; व वात, पित्त, सन्निपातज्वर, कफ, त्रिदोष, अरुचि, आमवात, कृमि, वांति, खोकला, अतिसार, तृषा, कुष्ठ यांचा नाश करितो. पुटपाकानें याचा रस भक्षण केला असतां फार दिवसांच्या अतिसाराचा नाश होतो. याचें कोंवळें फळ-तुरट, मधुर, लघु, हृद्य, रुच्य, पाचक, कंठाला हितावह, अग्निदीपक, उष्ण, तिखट, खारट, व गुल्म, वायु, कफ, अर्श, अरुचि व कृमि यांचा नाश करितें. याचें जून फळ-गुरु व वायूला कोपविणारें आहे (१.) कर्णशूलावर—टेंटूमूळ आणून बारीक वाटून त्याच्या चौपट तिळांचें तेल घेऊन दोन्ही एकत्र करावीं, व त्यांत तिळाच्या तेलाइतकें पाणी घालून चुलीवर ठेवून हलका हलका अग्नी देऊन पाक करून शुद्ध तेल राहिलें ह्मणजे तें तेल घेऊन कानांत घालावें; ह्मणजे त्रिदोषोत्पन्न कर्णशूल दूर होतो. (२.) सर्वातिसारावर—टेंटूचे सालीचा अंगरस द्यावा. अथवा सालीचा पुटपाकानें रस काढून त्यांत मध व मोचरसाचें चूर्ण घालून तो द्यावा. (३.) आगंतुक व्रणावर व व्रण होऊन रक्तस्राव होत असल्यास-टेंटूची साल अ० पानें वाटून बांधावीं ह्मणजे जखम लवकर भरून येते; तसेंच टेंटूच्या रसांत तेल सिद्ध करून तें लावावें. (४.) रक्तातिसारावर-टेंटूचीं पानें, साल, अथवा मूळ यांचा रस द्यावा. (५.) प्रमेहावर-टेंटूची साल वाटून द्यावी. (६.) पाणथरीवर-टेंटूच्या शेंगांतील बियांचें चूर्ण व पापडखार यांची गुळांत गोळी करून द्यावी. (७.) सर्व

प्रकारच्या गर्मीवर त्वरित गुण येण्यास—टेंटूच्या झाडाची अगर मुळाची साल आणून बारीक करून सुकवावी. नंतर त्यांतील अर्धतोळा अगर जास्त साल घेऊन ती चार पांच तोळे पाण्यांत भिजत घालावी. चार घटका गेल्यानंतर ही साल बारीक वाटून पूर्वीच्याच पाण्यांत कालवून तें पाणी वस्त्रगाळ करून खडीसाखर टाकून प्यावें. याप्रमाणें सायंकाळींही घ्यावें. दि० ७. पथ्य—गहूं, तूप, खडीसाखर, पोळी, वरण इ० अळणी खावे. भात खाऊं नये. सात दिवसपर्यंत स्नान करूं नये. आठवे दिवशीं कडू पाण्यानें स्नान करून पथ्य सोडावें. (८.) गर्मीच्या योगानें सर्वांगावर चट्टे पडले असल्यास व खांडकास—टेंटूची साल ओली अगर वाळली उगाळून लावावी ह्मणजे चट्टे बरे होतात. (९) आगपैणीस—टेंटूची साल दह्यांत वाटून लावावी. (१०.) पानथरीवर टेंटूची साल गोमूत्रांतून वाटून घ्यावी अथवा सालीचें चूर्ण गोमूत्रांतून घ्यावें. (११.) मूळव्याधीवर—टेंटूची साल, चित्रकमूळ, इंद्रजव, करंजाची साल, सैंधव व सुंठ यांचें चूर्ण मठ्ठयांत घालून सात दिवस प्यावें; ह्मणजे मुळापासून मोड गळून पडतात. (१२.) मुखपाकावर—टेंटूच्या सालीचा काढा करून त्याच्या गुळण्या कराव्या.

## ६७. टेंभुरणी. (सं. तिंदुकी. गु. टिंबरू. हिं. तेंदु)

टेंभुरणीचीं झाडें मोठमोठीं होतात. याचीं पानें मोठीं असून लांबट असतात. त्यास बोराएवढीं फळें येतात व तीं खातात. त्याच्या पानांच्या तंबाकूच्या विड्या करितात. या विड्या ओढल्यानें काळीज करपून जातें; हृदयांत पिवळा डाग पडतो; कंठशोष होतो; कफ वाढतो; हीं लक्षणें होतात. असें असून नित्य या व्यसनाचा फैलाव वाढतच चालला आहे. हें यःकश्चित व्यसन आहे असें दिसतें; परंतु यानें फारच नुकसान होत आहे. द्रव्यनाश होतो, शक्तिनाश होतो, डोळे मंद होतात; तेव्हां अशा दुष्ट व हलकट व्यसनापासून लोकांनीं दूर रहावें हें चांगलें. टेंभुरणी—तुरट, कडू, स्निग्ध, उष्ण, मधुर; व वायु, कफ यांचा नाश करिते.

ह्येच फळ तुरट, लेखन, ग्राहक, शीत, स्वादु, रुक्ष, मलस्तंभक, अरुचिकारक, वातकारक, व कडू आहे. पक्वफळ–गुरु, स्वादु, मधुर, स्निग्ध, दुर्जर; कफकर; व मेह, पित्त, रक्तरोग, वायु यांचा नाश करितें. टेंभुरणीचा सार पित्तरोगनाशक आहे. ( १ ) उवा मरण्यास–टेंभुरणीच्या सालीचा गोमूत्राशीं वाटून लेप करावा. ( २. ) दम्यावर–टेंभुरणीच्या फळाची साल सुकवून ती पावनोळा चिलमींत घालून ओढावी.

## ६८. डांगर ( सं. डंगरी. )

डांगराचा वेल पांचपंचवीस हात लांब वाढतो. दर वेलास तीस चाळीस पर्यंत फळें येतात कांहीं डांगर वाटोळे व कांहीं लांबोडे असतात. त्यांचा बाहेरील रंग पिवळा असतो. याच्या आंत तांबड्या भोंपळ्याप्रमाणें चपट्या बिया असतात. त्या सोलून खातात; या बिया मोठ्या पौष्टिक आहेत. याचे लाडूही करितात डांगरास पिवळीं फुलें येतात. त्यांची देखील भाजी करितात. यांच्या कोंवळ्या पाल्याची व वेलाची भाजी होते. डांगरास भोपळा, देवडांगर, अशीही नावें आहेत डांगर सात आठ महिने टिकतो.

## ६९. डामर.

डामराचे वृक्ष मलबार येथील अरण्यांत आहेत, हे मोठे होतात. ह्यापासून जो चीक निघतो त्याला डामर ह्मणतात. चीक काढण्याची कृति अशी आहे कीं, या झाडाच्या मोठमोठाल्या डाहळ्या तोडून त्यांचे लहान लहान तुकडे करितात. नंतर ते भट्टींत घातल्यावर त्यांत जो चीक असतो तो वर येतो, तो काढून घेतात; मग तो घट्ट होतो. डामर तारवांच्या दोरांस व लांकडी कामास लावलें ह्मणजे त्यास मजबुती येते.

## ७०. डाळिंब. ( गु. दाडिम. हिं. अनार. सं. दाडिम. )

डाळिंबीचें झाड या देशांत सर्वत्र होतें. अरबस्तानांत मस्कत येथें

जीं डाळिंबें होतात तीं उत्कृष्ट असतात. त्यांत बीं अगदीं मऊ असतें. डाळिंबीचें झाड दोन अडीच पुरुष उंच वाढतें. या झाडांतही दोन प्रकार आहेत. एकास फुलें मात्र येतात, यास गुलनार म्हणतात; दुसऱ्यास फुलें व फळें येतात. डाळिंबीचें फूल कुसुंबी रंगाचें असून त्यांत थोडीशी पिवळट झांक मारते. या रंगासारख्या रंगाचीं पागोटीं अथवा वस्त्रें रंगवितात. त्यास गुलनार ( डाळिंबीरंग ) असें म्हणतात. डाळिंब हें फळ खाण्यास रुचिदायक व शरीरास हितकर असें आहे. याच्या योगानें शरीरास हुशारी येऊन तृषा शमते. हें फळ रोग्यासही देण्यास हरकत नाहीं. या झाडाचीं मुळें, पानें, साल, फुलें व फळांची साल हीं सर्व औषधांस उपयोगीं पडतात. डाळिंबाच्या रसाचा उत्तम पाक होतो; त्यास डाळिंबपाक म्हणतात. डाळिंबाचा रस पित्तशामक आहे. डाळिंब तुरट, आंबट, मधुर, तृप्तिकारक, स्निग्ध, दीपन, ग्राहि, हृद्य, उष्ण, रुचिकर, लघु, अग्निदीपक; व कफ, खोकला, श्रम, मुखरोग, कंठरोग व पित्त यांचा नाश करितें. **गोडें डाळिंब**—तृप्तिकारक, धातुवर्धक, लघु, तुरट, ग्राहक, स्निग्ध, मेधाकर, बलप्रद, मधुर, पथ्यकर; त्रिदोष, तहान, दाह, ज्वर, हृद्रोग, मुखरोग, कंठरोग यांचा नाश करितें. **मधुराम्ल डाळिंब**—रुचिकर, दीपन, लघु; व वायु, पित्त, यांचा नाश करितें. **आंबट डाळिंब**—पित्तकारक, रक्तपित्त करणारें; व कफ, वायु, यांचा नाश करितें. **कोवळें सुकविलेलें डाळिंब**—रुचिकर, हृद्य, वायूला अनुलोमन करणारें आहे. ( १ ) **मुलांच्या खोकल्यावर**—डाळिंबफळाची साल खावयास द्यावी. अ० डाळिंबाच्या रसाचें चाटण करून द्यावें. ( २. ) **मुलांच्या अतिसार व संग्रहणीवर**—डाळिंबफळाची साल उगाळून द्यावी. ( ३. ) **जंतांवर**—डाळिंबाच्या झाडाची व मुळाची साल यांचा काढा करून द्यावा; अथवा डाळिंबफळाच्या सालीचा काढा करून तिळाचें तेल घालून ३ दि० द्यावा. ( ४ ) **उष्णपित्तावर डाळिंबाचें सरबत**—खडीसाखरेचा पाक करून त्यांत डाळिंबाच्या दाण्यांचा रस काढून घा-

लावा व लागलीच शर्करेनें गाळून ठेवावें. जरूर लागेल तेव्हां हें सरबत १ तोळे व तितकेंच पाणी घालून घ्यावें म्हणजे उष्णपित्त त्वरित शमतें (५.) डोळ्यांची उष्णता शमन होण्यास-डाळिंबाचे दाणे डोळ्यांत पिळावे. (६.) संग्रहणीवर-हिरवें डाळिंब ठेंचून रस काढावा. त्यांत मायफळ, लवंग व सुंठ उगाळून थोडा मध घालून तें द्यावें. डाळिंब न मिळाल्यास डाळिंबाची साल उगाळून द्यावी (७.) उष्णतेनें नाकांतून रक्त पडते त्यास व रक्तष्ठीवी सन्निपातावर-डाळिंबाची फुलें व दूर्वांच्या मुळ्या यांचा रस काढून अ० एकट्या डाळिंबाच्या फुलांचा रस नाकांत पिळावा व टाळूवर चोळावा म्हणजे त्वरित रक्त पडण्याचें बंद होईल (८.) छातींत दुखत असल्यास—डाळिंबाच्या दाण्यांच्या रसांत भुईतरवडाचें चूर्ण १ मासा घालून द्यावें (९) घोड्याचे विषावर-डाळिंबीचा पाला, तीळ, हरताळ व गूळ हीं एकत्र करून वाटून चावल्या ठिकाणीं लावावीं. (१०) मुरदाड शिंगाचे विषावर-डाळिंबाचा रस द्यावा. (११.) डोळे येतात त्यास-डाळिंबीची पानें वटून त्याचा लेप करावा. (१२.) पित्तरोगावर-पिकलेल्या डाळिंबाचा रस काढून त्यांत खडीसाखर घालून तो द्यावा. (१३) शोष व मुखाची विरसता यावर-साखर आणि डाळिंब अ० द्राक्षें आणि डाळिंब यांचा कल्क सेवन करावा. (१४.) रक्तातिसारावर-डाळिंबसाल व कुड्याची साल यांचा काढा मध घालून द्यावा (१५.) उपदंशावर-डाळिंबाच्या सालीचें चूर्ण करून लावावें. (१६) त्रिदोषोत्पन्न वांतीवर-मसुरा भाजून त्यांच्या पिठांत डाळिंबाचा रस घालून तें भिजवून त्यात थोडा मध घालून तें खावें. (१७.) डाळिंबपाक—धणे, सुंठ, नागरमोथा, वाळा, बेलाचा मगज, आवळकाठी, मोचरस, धायटीफूल, लोध्र, कुड्याची साल, जायफळ, अतिविष, खैराची साल, अजमोदा, खुरासनी ओंवा, एरंडमूळ, जिरें, लवंग, पिंपळी, काकडशिंगी, हे पैसा पैसाभार घेऊन चूर्ण करून डाळिंबांत भरून वर कणकीनें लोंबून चुलीत

कुकडून वरील कणीक काढून डाळिंबासुद्धां खलून, गोळ्या बोराएवढ्या करून रोज एक गोळी घ्यावी; ह्मणजे अतिसार, संग्रहणी, मंदाग्नि, अरुचि, शूल याचा नाश होतो.

## ७१. डिकेमाली. ( सं हिंगुफला. )

डिकेमालीचे वृक्ष मोठमोठे होतात.हे बहुधा डोंगराळ प्रदेशांत होतात. कोंकणांत व देशावर हे वृक्ष पुष्कळ ठिकाणीं होतात. यांचीं पानें पेरूच्या पानाएवढीं असून तीं आकारानेंही तशींच असतात. याम तोंडल्याएवढीं फळें येतात. हीं फळें लोणच्यांत घालतात. या झाडाच्या डेंखांतून हिंवाळ्यांत हिरवट पिवळा असा चीक येतो, त्यास "डिकेमाली" असें ह्मणतात. जंगली लोक या चिकाच्या वड्या करून त्या विकतात. या चिकांत डेंखाचीही भसळ करितात. **डिकेमाली**–तिखट, तीक्ष्ण, उष्ण, अग्निदीपक; व कफ. वायु, मलबंध, मनाचा मोह व आम यांचा नाश करिते ( १. ) **पोटदुखीवर**–एक निंबू चिरून त्याच्या एका फोडीवर डिकेमाली भरून दुसरे फांकीचा रस तीवर पिळून डिकेमाली भरलेली फाक निखाऱ्यांवर ठेवून खतखतूं द्यावी, मग काढून चोखावी. ( २. ) **जंतावर**–डिकेमालीचें चूर्ण साखरेशीं द्यावें. ( ३. ) **मोडशी, शणि व ज्वर यांवर**–डिकेमालीचें चूर्ण साखरेशीं द्यावें. ( ४. ) **जनावरांच्या क्षतांत कृमि झाल्यास**–क्षतांत डिकेमाली भरावी. ( ५. ) **डब्यावर**–डिकेमाली व काळबोळ ही पाजावीं. ( ६. ) **मुलाच्या उसणीवर**–डिकेमाली, रेवाचिनी व काळाबोळ उन्ह पाण्यांत वाटून पोटावर बेंबीची जागा खेरीजकरून लेप द्यावा.

## ७१ डुक्करकंद ( सं. वाराही. )

डुक्करकंदाची वेल असते. या वलीच्या कांद्याचा आकार डुक्कराप्रमाणें असून डुक्कराच्या अंगावर जसे केश असतात तसे याच्या अंगावर केश असतात. डुक्करकंद ही मोठी तीव्र गुणाची औषधि आहे. **डुक्करकंद**–तिखट कडू, बलकर, पित्तल, रसायन, शुक्रल, वृष्य, अग्निदीपक, मधुर,

उष्ण, वर्णकर, स्वर्य, आयुष्यवर्धक; व कुष्ठ, मेह, त्रिदोष, कफ, वात, कृमि, मूत्रकृच्छ्र, यांचा नाश करितो. ( १. ) कांडराचे विषारांवर-डुक्करकंद पाण्यांत उगाळून दोन तोळेपर्यंत पिण्यास द्यावा. हें औषध मोठें जलाल आहे. कांडराचा विषार नसेल तर हें सहन होणार नाहीं, व घसा भाजून जाईल. चुकून हें औषध दिल्यास यास उतार तूप पाजावें. ( २. ) तृतीयक ज्वरावर-डुक्करकंदाची खांदी किंवा मुळी पंचरंगी सुतानें बाहूस किंवा गळ्यात बांधावी.

## ७२. डोरली. ( सं. वार्ताकी. )

डोरलीचें झाड हुबेहुब वांग्याच्या झाडासारखेंच असतें. हीस "रान वांगी" असेंही ह्मणतात. हें झाड कंबरेइतकें उंच वाढतें. डोरलीचें फळ गोल असून सुपारीएवढें मोठें असतें. या फळांचा रंग पिवळा असतो. गरीब लोक या फळांची भाजी करितात. डोरलीची कोंकणांत होणारी एक जात आहे; तीस "मोतरिंगणी" किंवा "चिचुरटी वांगी" असें ह्मणतात. मोतरिंगणीचीं फळें डोरलीपेक्षां बारीक असतात. या फळाची भाजी चांगली होते. डोरलीचें मूळ दशमूळांत येतें. **मोठी डोरली**-तिखट, उष्ण, कडू हृद्य, पाचक, ग्राही, अग्निदीपक, व कफ, वायु, ज्वर, कुष्ठ, अरोचक, वांति, दमा, खोकला, कृमि, मुखवैरस्य हृल्लास, कंडू, शूल, आमदोष, हृद्रोग, अग्निमांद्य यांचा नाश करितें. **लघु डोरली**-वायु, दमा, शूल, कफ, अग्निमांद्य, ज्वर, छर्दि हृद्रोग, आम यांचा नाश करिते. **पांढरी डोरली**-रुच्य; व कफ, वायु व अंजनानें नेत्ररोग यांचा नाश करिते. वरकड गुण लघु डोरलीसारखे आहेत. **मोतरिंगणी**-कडू, तिखट, उष्ण, पित्तकर, रुक्ष, रुचिकर, भेदक, पाचक, अग्निदीपक; व कफवातनाशक आहे ( १. ) **खोकल्यावर**- डोरलीचा काढा पिंपळी घालून द्यावा, ह्मणजे खोकला, त्वरित दूर होतो. ( २. **गुरांस कोणताही विषार लागल्यास**-डोरलीच्या मुळ्या कुटून, त्यांचा पाणी घालून रस काढावा व तो पाजावा. (३., **आरक्त**

नेत्र करणें—डोरलीच्या बियांचें अंजन डोळ्यांत घातलें असतां डोळे आरक्त होतात. पूर्वी शिपाई लोकांत, आपलें शौर्य अथवा रागीटपणा लोकांस दाखविण्याकरितां ही चाल होती. (४.) नारूवर—डारलीचें मूळ पुरुषाच्या मूत्राशीं व अश्वत्थपत्राशीं वाटून त्याचा फोडावर पेंड बांधावा.

## ७३. ढोर आंबा.

गोमांतक प्रांताच्या रानांत अनेक तऱ्हेचे वृक्ष आहेत. त्यांमध्यें ढोर आंबा ह्मणून एक साधारण वृक्ष आहे; त्यास मार्गशीर्षाच्या सुमारास आंब्यासारखीं वाटोळीं फळें येऊन त्यांच्या शेवटास लहान टोंक असतें. हीं फळें पिकलीं ह्मणजे गुळचट होतात. कित्येक लोक यांचें सांबारें व रायतें करितात.

## ७४. तगर. (सं. गु. हिं. तगर.)

तगरीचें झाड बरेंच मोठें होतें. तगरीचें पान लांबट असून शेवटीं त्यास टोंक असतें. याचा विस्तार बराच मोठा होतो. तगरींत एकेरी पांढरी व दुहेरी पांढरी अशा दोन जाति आहेत. दुहेरी तगरीचें पान जरा काळसर रंगाचें असतें. हीस "गोंडे तगर" असेंही ह्मणतात. एकेरी तगरीचें फूल पारिजातकाच्या फुलापेक्षां कांहींसें मोठें असतें. त्यास पांच सहा पाकळ्या असतात. या फुलास लांब दांडा असतो. याच्या फुलांस सकाळीं मात्र काहीं वास असतो, पुढें येत नाहीं. तगरीचे गुण गांठ्या तगरासारखे आहेत. (१.) मस्तकशूलावर—तगरीचें मूळ उगाळून लेप द्यावा.

## ७५. गांठ्या तगर. (गु. तगर, गंठोना, सं. पिंडी तगर.)

तगराचीं झाडें हिमालय पर्वत व अलमोराचा पहाड यांवर होतात. याच्या मुळांस "तगरमूळ" असें ह्मणतात. तगर हें फार सुवासिक आहे. याचा धुपांत उपयोग करितात. तगरमूळाचा रंग कांहींसा

तपकिरीसारखा असतो. सुवासिक उटणीं व सुगंधि पदार्थांत याचा फार उपयोग होतो. **तगर**–शीतळ, पथ्यकर, कडू, मधुर, लघु, स्निग्ध, पाककाळीं तिखट, तुरट, विषनाशक; व नेत्ररोग, मस्तकरोग, रक्तदोष, भूतोन्माद, अपस्मार, भूतबाधा यांचा नाश करितो. ( १. ) **तगरादि काढा, प्रलापक सन्निपातावर**–तगर, आस्कंध, कुंभा, शंखाहुली, देवदार, कुटकी, ब्राह्मी, जटामांसी, नागरमोथा, बाहवा, हिरडा व द्राक्षें यांचा काढा द्यावा.

## ७६. तवकीर वृक्ष. ( सं. तवक्षीर. )

हें झाड मलबार प्रांतांत होतें. यास तिकडे कुवा असें नांव आहे. इंग्रजींत या वृक्षास आरारूट ह्मणतात. हें सुमारें एक पुरुषभर उंच देखील वाढतें. साधारण पर्शी दोन हात उंच असतें. याचीं पानें हळदीच्या पानासारखीं असून झाडही तसेंच दिसतें आणि त्यासारख्या-च यास मुंडल्या लागतात. त्या खणून काढून पाण्यांत धुतल्यावर उखळींत ठेंचून चार पांच वेळ धुऊन उन्हांत सुकवितात. नंतर खल-बत्त्यांत कुटून किंवा दळून त्याची बारीक काजळासारखी बुकी करितात. ती शुभ्र रंगाची असते. तीस तवकीर ह्मणतात. हें दुधांत शिजवून खातात. असा जो त्याचा पदार्थ करितात, त्यास लापशी असें ह्मणतात. लहान मुलांस व रोग्यांस ही लापशी देतात. हा पदार्थ शीतळ व पौष्टिक आहे. तवकीर हें पांच सहा जातींच्या वृक्षांच्या कंदांपासून होतें. महाबळेश्वराच्या डोंगरावरही तवकीर उत्पन्न होणारीं झाडें आहेत. अमेरिका खंडांत हें झाड प्रख्यात आहे. अमेरिकन लोक बाणापासून किंवा दुसऱ्या शस्त्रापासून जखम झाली असतां या झाडाचा चीक लावितात, ह्मणून त्यांनीं यास ‘ आरोरूट ’ असें नांव दिलें आहे. इंग्रजीभाषेंत ‘ अरो ’ ह्मणजे तीर व ‘ रूट ’ ह्मणजे मूळ असा अर्थ होतो. लबाड लोक तवकिरीच्या योगानें तेलाचें तूप करितात. तें आठ दिवस मात्र चांगलें राहतें. त्यास तेलकट वास येतो. **तवकीर**–मधुर,

शुभ्र, शीत, सुगंधि, बलकर, वृष्य, पौष्टिक, धातुवर्धक, लघु, स्निग्ध; व क्षय, पित्तरक्त, पित्तदाह, अरुचि, खोकला, दमा, ज्वर, तृषा, कामला, पांडु, कुष्ठ, मूत्राश्मरी, मूत्रकृच्छ्र, मेह, व्रण, कफ, रक्तदोष यांचा नाश करितें. ( १. ) **उष्णतेपासून**–तोंडांत चट्टे होतात त्यास तवकीर लावावी. ( २. ) **पित्तावर**–तवकीर तुपांत घालून खावी. (३.) **मुलास शक्तिवर्धक** भक्ष्य–तवकीर थंड पाण्यांत किंवा गाईचे दुधांत घालून शिजवून पातळ राबडी तयार करावी व त्यांत थोडी खडीसाखर घालून पाजावी. ( ४. ) **रक्तप्रदरावर**–तवकीर, राळ व गेरू यांचें चूर्ण तुपाशीं द्यावें.

## ७७. तंबाखू ( सं. ताम्रकूट. गु. हिं. तमाखू )

तंबाखूचें झाड सुमारें हातभर उंच वाढतें. यास वीत वीत लांब पानें येतात. तंबाखू कापून घेतल्यावर मागें जे खुंट राहतात त्यांसही पानें फुटून बीं येतें. हीं मागून आलेलीं पानें निरुपयोगी असतात. तंबाखू बहुतकरून सर्व प्रांतांत होतो. तंबाखू हा एक हलक्या प्रतीचा कैफ आहे; परंतु तिचा प्रतिवर्षी निरर्थक लाखों रुपयांचा खप होऊन सरकारास फारच फायदा होऊं लागला आहे. तंबाखू औषधास उपयोगीं पडते, परंतु मनुष्यांनीं मिजासीसाठीं तिचे नानातऱ्हेचे निरर्थक उपयोग करून तिचा खप वाढविला आहे. कित्येक तपकीर करून ओढतात, कित्येक खातात, व कित्येक ओढतात. पृथ्वीवर तिचा उपयोग करणारे नाहींत असे थोडे सांपडतील. या व्यसनापायीं मनुष्यांचें किती नुकसान होत आहे, परंतु तें त्यांच्या ध्यानींमनीं येत नाहीं. तंबाखू खाण्यापासून तोंडास दुर्गंधी येते, दांतांस इजा होते, कफ होतो, डोळ्यांस इजा होते व पित्त वाढतें. याप्रमाणेंच ओढण्यापासूनही छातींत कफ उत्पन्न होऊन काळीज करपून जातें. तंबाखू खाणारा कोठें थुंकेल याचा नेम नाहीं. यावर एक म्हण आहे–“ हगवणीची गांड आणि तंबाखू खाणाराचें तोंड यांचा नेमच नाहीं. ” इतकें हें अमंगळ व ओंगळ व्यसन असून, हल्लीं

या व्यसनाची निरर्थक बढाई वाढली आहे. हें व्यसन जर सर्वांनीं सो-डलें तर त्यापासून देशाचें पुष्कळ हित होणारें आहे **तंबाखू**-पित्तल, तीक्ष्ण, उष्ण, बस्तिशोधक, मदकर भ्रामक, कडू, दृष्टिमांद्यकारक, सारक, वामक, तिखट, रुचिकर, वातानुलोमन; व कफ, खोकला, दमा, वायु, कोष्ठवात, कृमि, दंतरोग, शुक्ररोग, दृष्टिरोग लिखा, उवा, विंचवाचें विष, सूज, यांचा नाश करिते. ( १ ) **जनावरांचे कृमि दूर होण्यास**—तंबाकू बारीक करून क्षतांत भरावी. ( २ ) **अंडवृद्धीवर**—तंबाखूचीं पानें शिलारस लावून बांधावीं किंवा सागरगोट्याचा मगज एरंडेलांत खलून तंबाखूचे पानावर लावून तें बांधावें. या योगें सर्वांगास खरख सुटून शांति होते. फारच तलखी झाल्यास तें सोडून टाकावें व पुनः बांधावें यानें एक दोन दिवसांत अंड ओसरतो तंबाखूचें पान नुसतेंही बांधावें. ( ३. ) **मधमाशा वगैरे यांच्या दंशावर**.-तपकीर किंवा तंबाखू ओली करून दंशावर चोळावी. ( ४. ) **पीनस रोगावर**—जुनी तपकीर ओढावी. ( ५. ) **अर्धशिशीवर**—तंबाखू घेऊन पाणी घालून कपडछान करून त्याचे दोन थेंब नाकांत घालावे, व ताळवेसही थोडे लावावे. ( ६. ) **सर्पाचे विषावर**—तंबाखू पाण्यांत कोळून तें पाणी सुमारें अच्छेरपर्यंत वस्त्रगाळ करून ठेवावें व घटके घटकेच्या अवकाशानें प्रतिवेळीं सात सात तोळे असें दोन तीन वेळ देऊन वमन करावें हें औषध पांच सहा वेळ दिल्यास निखालस गुण येतो. ( ७. ) **विंचवाचे विषावर**.—तंबाखूच्या चिलमींतील कीट विड्याच्या पानांत घालून थोडा खाण्यास द्यावा. ( ८. ) **उवा मरण्यास**—तंबाखू पाण्यांत कोळून तें पाणी डोकीस लावून वर पट्टा बांधावा. दोन प्रहरांनंतर पट्टा सोडून रिठ्याचा फेंस लावून स्नान करावें ह्मणजे सर्व उवा मरतात.

### ७८. तमालवृक्ष. (सं. गु. हिं.)

जसे दालचिनीचे वृक्ष असतात त्याचप्रमाणें तमालवृक्ष असतात. तमालवृक्ष सिंहलद्वीपांत फार होतात. याच्या पानास तमालपत्र किंवा

तेजपत्र असें ह्मणतात तमालपत्राचा मसाल्यांत व औषधांत पुष्कळ उपयोग होतो तमालपत्र हें तसूभर रुंद असून चार पांच अंगुळें लांब असतें. **तमालवृक्ष**–मधुर, बलकर, वृष्य गुरु, धातुवर्धक, शीत; व श्रम, दाह, कफ, शोथ, विस्फोट, पित्त यांचा नाश करितो.

## ७९. तरटी ( सं. रक्तबीजका )

तरटीचें झाड सुमारें दोन पुरुष उंच वाढतें. याचीं पानें चिंचोळीं व लांबट असतात. तरटीस लाल रंगाचीं फळें येतात. या झाडास कांटे असतात. तरटीचीं झाडें सोलापूर प्रांतांत पुष्कळ आहेत. **तरटी**–मधुर, कडू, गुरु, बलकर व कफनाशक आहे ( १ ) **कफावर**–तरटीच्या सालीचा काढा मध घालून द्यावा

## ८०: तरवड ( सं. अर्बूर, शरत्पुष्प. )

तरवडाचें झाड साधारण तीन चार हात उंच वाढतें. याचीं पानें टाकळ्याच्या पानांसारखीं असतात. यास पिंवळ्या रंगाच्या फुलांचे घोंस येतात. याच्या शेंगा चापट असून टीचभर लांब असतात. हीं झाडें देशावर फार होतात. कोकणांत हें झाड पाहण्यांत येत नाहीं. यास "चांभार आवळी" असेंही ह्मणतात तरवडाची साल चामडीं रंगविण्यास उपयोगीं पडते याचीं लांकडें सर्पणास उपयोगीं पडतात. **तरवड** कडू, शीत, चक्षूंना हितावह; व पित्त, दाह, मुखरोग, कुष्ठ, जंत, अतिसार, सूज, शूल, व्रण व ज्वर यांचा नाश करितो ( १. ) **गर्भिणीचे ओकारीस**—तरवडाचीं फुलें १ तोळा गाईचे ८ तोळे दुधांत वाटून त्यांत खडीसाखर १ तोळा टाकून तीं घ्यावीं. ( २. ) **पाय किंवा गुडघा मुरगळला तर व सुजेवर**–तरवडाचा पाला ऊन्ह करून पेंड द्यावा. ( ३ ) **मुलांचे मोडशीवर**–तरवडाची व रिंगणीच्या मुळाची साल उगाळून पाजावी. ( ४. ) **गुडघी व वाघचवडा यांवर**–तरवडाचा पाला व सोमल याचा थुंकयांत खल करून लेप द्यावा. ( ५. ) **उपदंशावर**–तरव-

डाचा पाला मूठभर व शमीचा पाला मूठभर वाटून त्यांत थोडें जिरें व धणे घालून तो ७ दिवस घ्यावा. ( ६ ) **डोळ्यांत फूलें व भूल आल्यास**–तरवडाचें बीं मोगली एरंडाचे चिकांत उगाळून अंजन करावें. ( ८ ) **मूत्राघातावर**–तरवडाचें बीज पाण्यांत वाटून पिण्यास द्यावें व नाभीवरही लेप द्यावा.

## ८१. ताग. ( गु. सण. हिं. ताग. सं. शण. )

ताग कोंकण, दक्षिण व गुजराथ या देशांत पिकतो. हें झाड चार हातपर्यंत उंच वाढतें. तागाचें बीं पेरल्यापासून त्यास चार घटकेंत कोंम फुटतो. तागाचीं झाडें कुजवून त्यांचे दोर काढतात. त्याचें गोण-पाट, दोर आदिकरून जिनसा व कागद होतात. हे कागद कापसाच्या कागदांपेक्षां मजबूत असतात. तागाचे दोर फार मजबूत असतात. तागाच्या झाडाच्या दिवेसळ्या करितात. तागाच्या बियाचें तेल औषधाच्या व यंत्रास लावण्याच्या उपयोगीं पडतें. ते उंच प्रतीचा साबण करावयासही उपयोगीं पडतें. पेंड गुरांस खावयास चालतात. तागाचीं उंच प्रतीचीं वस्त्रेंही होतात **ताग**–आंबट, तुरट, मल पातन करणारा, गर्भपात, रक्तपात, यांना करणारा, वांतिकारक, आमाला पाडणारा व उष्ण आहे; व वायु, कफ, अंगमोड यांचा नाश करितो. फुल–प्रदर व रक्तदोष यांचा नाश करितात. **लघुताग**–तिखट, वांतिकर; व कफ, पित्त यांचा नाशक आहे. ( १ ) **खोकल्यावर**–तागाच्या बियांचा काढा करून घ्यावा. ( २. ) **उठाणू, वळ व बद** इत्यादिकांवर–तागाच्या बिया वाटून पोटीस तयार करून बांधावें ह्मणजे तीं त्वरित पिकतात. ( ३. ) **नारूवर**–तागाचें बीं वाटून उन्ह करून जितकें सोसवेल तितकें ऊन्ह नारूवर बांधावें.

## [illegible] ( [illegible]. तालवृक्ष. गु. ताड. हिं. ताल. तृणराज. )

[illegible], सुरमाड, शिंदी हीं झाडें एकाच जातीचीं

आहेत. यांची उत्पत्ति उष्णदेशांत होते. ताडाचीं झाडें डोंगरावर व रानांत आपोआप उत्पन्न होतात. हीं दहा बारा वर्षांनीं लागवडीस येतात. ताडाचा वृक्ष फारच उंच वाढतो. ताडाचा सोट सुमारें ४०।५० हात सरळ असतो. या वृक्षापासून ताडी काढतात. याच्या फळांस ताडगोळे असें ह्मणतात. हे गोळे फार थंड आहेत. ह्मणून कितीएक लोक उष्णता झाली असतां खातात. ताडवृक्ष फारच उपयोगी. आहे. त्याच्या झांवळ्या घरांच्या छपरावर घालतात. त्याच्या पातीपासून छत्र्या वगैरे अनेक वस्तु होतात. ताडाचा सोट घरांचीं वहालें करवयास व पाणी आण्याकरितां पन्हळ करावयास उपयोगीं पडतो. ताडपत्रवृक्ष ह्मणून याची एक जात सिंहलद्वीपांत होते. याची उंची सव्वाशें हात असून त्याच्या झांवळ्या पंधरा वीस हात लांब असतात. या एक झांवळीकडून वीस पचवीस मनुष्यांचें पावसापासून किंवा उन्हापासून रक्षण होतें. हा ताडपत्रवृक्ष सुमारें ८० वर्षें वांचतो. इतक्या काळांत तो एकदाच फळास येतो. याचें फळ हत्तीच्या मस्तकाएवढें असून त्यांत ताडगोळ्यासारखा गीर असतो. तो लोक खातात. या वृक्षाच्या झावळ्याचा पुस्तकें लिहावयास कागदासारखा उपयोग होतो. सिंहलद्वीप, कर्नाटक, द्रविड येथें अद्यापही या ताडपत्रावर पोथ्या लिहितात. लिहिण्याच्या कामांत आणण्यापूर्वी हीं पानें दूध-पाण्यात उकडून काढतात. या पत्रावर लोखंडाच्या खिळ्यानें लिहितात. हीं पत्रें कागदापेक्षा पुष्कळ वर्षें टिकतात. कजनताल ह्मणून एक ताडाची जात आहे, तिची झाडें दक्षिण अमेरिकेंत फार आहेत. याच्या झांवळ्या पंखे करण्यास उपयोगीं पडतात. ताडगोळे कोंवळेपणीं रुचकर लागतात; जून ताडगोळे खाल्यानें अतिसार होतो. ताडगोळ्याच्या आंत नारळाप्रमाणें पाणी असतें तें पितात. ताडवृक्ष—मधुर, शीतल, मादक, पुष्टिकर, शुक्रल, कफकर, बलकर, मेदकारक, वृष्य, सारक; व पित्त, दाह, शोष, विष, श्रम, कुष्ठ, कृमि, रक्तदोष, वायु यांचा नाशक आहे,

याचें कोंवळें फळ–स्निग्ध, स्वादु, गुरु, मलावरोधक, बलकर, शीतल, धातुवर्धक, वृष्य, तृप्तिकारक, मांसल, कफकर; व वायु, श्वास, रक्तपित्त, व्रण, दाह, क्षत, पित्त, क्षय, रक्तदोष, यांचा नाश करितें. याचीं पक्व फळें–दुर्जर, मूत्रल; व शुक्र, झांपड, पित्त, कफ, नेत्राभिष्यंद व रक्त यांना करणारी आहेत. याचें ओलें खोबरें–मूत्रल, शीतल, रसकालीं व पाककालीं मधुर, वातपित्तनाशक आहे. याचें जून खोबरें–कफकर, मदकारक, लघु, स्निग्ध, मधुर, सारक, व वातपित्तनाशक आहे. ताडाच्या मस्तकांतील पांजर–धातुवर्धक, वात, पित्त यांचा नाशक, बस्ति शुद्ध करणारा असा आहे. ताडी–अति मादक, स्निग्ध, गुरु, वृष्य, अशी आहे. तीच आंबट झाली असतां पित्तकर, वातनाशक अशी आहे. ताडाचें मूळ–पाककाळीं स्नायु व रक्तपित्तनाशक आहे. (१.) उष्णतेनें लघ्वीची जळजळ होते त्यावर–कोवळें ताडगोळे खावे म्हणजे लघ्वी साफ होते; अ० ताडाचें मूळ तांदळांचे धुणांत वाटून साखर घालून द्यावें.

**८३. तांदुळजा.** (सं. तंदुलीय. गु. तांदुळजो. हिं. चवराई.)

ही भाजी बारमाही होते. या भाजीचीं पानें लहान असून रोपा दोन वितींहून अधिक उंच नसतो. या भाजीस कोणी चवळीची भाजी असेंही म्हणतात. ही भाजी स्वादास फार चांगली असून पथ्यकर आहे. तांदुळजा–मधुर, शीतल, रुचिकर, अग्निदीपक, लघु, रुक्ष, मूत्रल, पथ्यकारक, सारक; व विष, पित्त, श्रम, दाह, रक्तदोष, उन्माद, रक्तपित्त, शीतपित्त, त्रिदोष, ज्वर, कफ, खोकला व अतिसार यांचा नाश करितो. तांदुळजाचीं पानें–शीत, व पित्त, रक्तविकार, विष, खोकला, यांचा नाश करणारीं, पाककाळीं मधुर व दाह, शोष, यांचा नाश करणारीं व रुचिकर अशीं आहेत. जलतांदुळजा–कंटक–रक्तपित्त यांचा नाशक, कडू व लघु असा आहे. (१.) सर्पाच्या विषावर–तांदुळजाच्या मुळ्या व मिरीं हीं

तांदुळांच्या धुणांत वाटून द्यावीं. ( २. ) सर्व प्रदरांवर—तांदुळजाच्या मुळ्या वाटून त्यांचा कल्क करून त्यांत रसांजन ( दारुहळदीचा अष्टमांश काढा करून, त्यांत बकरीचें दूध समसमान घालून कढवून खवा करून वाळवून चूर्ण करावें तें ) मिळवून त्यांत मध व तांदुळांचें धुवण चौपट घालून प्यालें असतां सर्व प्रदर दूर होतात. ( ३. ) गर्भ स्थिर होण्यास—ऋतुकाळीं तांदुळजाची मुळी तांदुळांचे धुणांत उगाळून द्यावी. ( ४.) विषमज्वरावर—तांदुळजाच्या मुळ्या मस्तकावर बांधल्या असतां विषमज्वर जातो. ( ५. ) आगीमण्यारीचे विषावर—तांदुळजाचें मूळ व मिरीं तांदुळांच्या धुणांत उगाळून द्यावें. ( ६. ) गर्भिणी व बाळंतिणी यांचे रक्तस्रवावर—तांदुळजाच्या मुळ्या वाटून तांदुळांच्या धुणांत द्याव्या. ( ७. ) विंचवाच्या विषारावर—तांदुळजाचा रस साखर घालून द्यावा. ( ८. ) सोमलावर उतार तांदुळजाचा रस साखर घालून द्यावा. ( ९.) बचनागाचे विषावर—मुळासुद्धां तांदुळजाच्या रसांत गाईचें दूध घालून द्यावें. ( १०. ) गुंजेच्या विषावर—तांदुळजाचा रस व साखर द्यावी. ( ११. ) गुरांस सोमल घातल्यास—तांदुळजाचें मूळ, बेलाचें मूळ व कवठाचें मूळ, गाईचे तुपांत उगाळून पाजावें. ( १२. ) अर्धशिशीवर तांदुळजा व जटामांशी यांच्या कल्कांत तूप सिद्ध करून त्याचें नस्य द्यावें. ( १३. ) गेलेले केश येण्यास—तांदुळजाची भाजी भक्षण करावी. ( १४. ) अग्निदग्धव्रणावर—तांदुळजाच्या रसाचा लेप द्यावा. ( १५ ) उदररोगावर—तांदुळजाच्या पाल्याचा रस काढून द्यावा. अ० तांदुळजाची भाजी नित्य खावी. ( १६. ) पारा आदिकरून अंगांत भिनलेलीं सर्व रसायनें निघून जाण्यास तांदुळजाचा रस तुपाशीं ७ दिवस प्राशन करावा. ( १७. ) कृत्रिमविषांवर—वेडोसा व तांदुळजाचीं मुळें, दोन्ही समान, पाण्यांत वाटून त्यांत त्यांच्या चौपट तूप घालून तुपाचे चौपट दूध घालून तूप शेष राहीतोंपर्यंत आटवावें आणि प्यावें. ह्मणजे सर्व कृत्रिमविषांचा नाश होईल.

## ८४. त्रायमाण. ( सं. )

ही वनस्पति हिमालयाच्या उतरणीवरील प्रदेशांतील जंगलांत होते. पर्शिया देशांतही हिची उत्पत्ति होते. त्रायमाण—कडू, रोचक व ज्वरहर आहे. हिच्या काड्या व फुलें रेशमी कपडे रंगविण्याकडे वापरली जातात. **त्रायमाण**—तुरट, शीतल, मधुर, सारक, कडू; व पित्तरोग, वांति, ज्वर, गुल्म, कफ, विष, शूल, भ्रम, रक्तरोग, क्षय, ग्लानि, तृषा, हृद्रोग, रक्तपित्त, मुळव्याध, त्रिदोष, यांचा नाश करिते. ( १. ) **विषमज्वरावर**—त्रायमाण, कुटकी, धमासा, उपळसरी यांचा काढा द्यावा.

## ८५. तालीस. ( सं. गु. हिं. )

याची उत्पत्ति हिमालय पर्वतावर होते. हें झाड लहान असतें. याच्या पानास तालीसपत्र असें ह्मणतात. तालीसपत्राचा औषधांत पुष्कळ उपयोग होतो. **तालीसपत्र**—मधुर, कडू, उष्ण, लघु, तीक्ष्ण, स्वर्य, हृद्य, अग्निदीपक; व दमा, खोकला, कफ, वायु, क्षय, गुल्म, अरुचि, रक्तदोष, वांति, आमदोष, अग्निमांद्य, मुखरोग व पित्त यांचा नाश करितें. ( १. ) **तालीसादि चूर्ण**—तालीसपत्र १, मिरीं २, सुंठ ३, पिंपळी २, वंशलोचन २, वेलदोडे -।।- दालचिनी -।। व पिठीसाखर ३२ तोळे, या सर्वांचें चूर्ण करून तें ३ मासे घ्यावें; ह्मणजे अरुचि, अजीर्ण, खोकला, श्वास, ज्वर, ओकारी, अतिसार, शोष, पोटफुगी, पानथरी, पांडु, संग्रहणी हे रोग दूर होतात.

## ८६. तांबडी रिंगणी. ( खरूज वांगें. )

हें झाड चिरबोटीसारखें होतें, परंतु पानें बारीक असतात. रिंगणीचें आणि याचें कांहीं सादृश्य दिसत नाहीं. यास सुंदर कंवडळासारखीं तांबडीं फळें येतात; त्यावर पातळ कांद्यासारखी साल असून आंत वांग्यासारिखा गीर व बिया असतात. किरिस्तांव व इंग्रज लोकांतच या भाजीचा बहुधा खप होतो.

श्रीशंकर.

# वनौषधीगुणादर्श-भाग ३ रा.

## परिशिष्ट-सार्थ श्रीऔषधीकल्पलता.

(मूळ ग्रंथ)

श्रीगणेशायनमः ॥ अथ ते संप्रवक्ष्यामि भुवनेश्वरिपद्धतीम् ॥ श्रृणुष्व एकचित्तेन रसज्ञे प्राणवल्लभे ॥ १ ॥ लक्ष्मणाकल्पः ॥ शुक्लपक्षे चतुर्दश्यां गुरुपुष्ये च लक्ष्मणाम् ॥ समंत्रस्तु समुच्चार्य सोपचारं समुद्धरेत् ॥ २ ॥ ॐ सर्वार्थसाधनी लक्ष्मणायै स्वाहा ॥ शुभं तन्मूलमादाय कृष्णोन्मत्त-फले स्थितम् ॥ त्रिदिनं च स्वशुक्रेण मंत्र्य चूर्णेन वश्यकृत् ॥ ३ ॥ रोचनं लक्ष्मणामूलं चंदनं कुंकुमं समम् ॥ मुखलेपादितः सर्वं वैशेष्यं नरमोहनम् ॥ ४ ॥ ॐ वशी नमोनमः ॥ तन्मूलं मूलतांतस्थं पल्लवाद्राजव-श्यकृत् ॥ तन्मूलमेव स्वर्णाख्यधत्तूररसभावितम् ॥ ५ ॥ तद्धूपधूपितं देहं दृष्ट्वासौ धव मुह्यते ॥ २. ॥ अथ शिवलिंगीकल्पः ॥ ॐ श्रीं ईश्वरी सर्वदानववशंकरि तारासाधिन्यै स्वाहा ॥ इत्यमुना मंत्रेण गंधादि-भिरनुष्ठितान् ॥ त्रिधा सूत्रेण संवेष्ट्य गुटिकां संप्रपूजयेत् ॥ १ ॥ पुष्ये वा रेवतीऋक्षे गृहीत्वा स्वजटां पिबेत् ॥ क्षीरशुद्धेन रत्यर्थं रमतेऽथ सहस्र-शः ॥ २ ॥ भावितं पंचशतधा तन्मूलं कनकांबुना ॥ तत्तैलस्य विलेपेन तत्करोति नरं वधः ॥३ ॥ आत्मांबुपिष्टं तत्कल्कं लेपेनानेन मोहनम् ॥ सद्यो जयति दुर्वारं वैरिणं विजयो भवेत् ॥ ४ ॥ धृता शिरसि पुष्यार्के मंत्रमुच्चारपूर्ववत् ॥ ईश्वरी सकलां भीतिं निहंतीति न संशयः ॥ ५ ॥ सह-देवीश्वरीमूलं मयूरशिखया सह ॥ ततः प्रदक्षणीकृत्य भक्त्या स्तुत्वा प्रणम्य च ॥ ६ ॥ तत्र सूर्योदयात्पूर्वं मंत्रमष्टोत्तरं शतम् ॥ जप्वा च पादलेपेन दिनेनैकेन मानवः ॥ ७ ॥ विंशद्योजनगोभूत्वा पुनरेतीति चाल॰

सर्व प्रकारच्या भितींचा नाश होतो यांत संशय नाहीं. सहदेवी, शिव-लिंगीचें मूळ व मोराची शेंडी हीं घेऊन भक्तिपूर्वक स्तवन व नमन करून सूर्योदयाच्या पूर्वी १०८ वेळां वरील मंत्राचा जप करून त्या औषधाचा पायांस लेप केला असतां वीस योजनें ( ८० कोश ) चालू-नही पुन्हा चालण्याची शक्ती रहाते. गोरोचन व शिवलिंगीचें मूळ यांचा पाण्याबरोबर कल्क करून १०८ वेळां मंत्राचा जप करून त्याचा पायांस लेप केला असतां पूर्वीचीच सिद्धी प्राप्त होते. चंदन व शिवलिं-गीमूळ, केशर, अगरु, टांकणखार, गोरोचन हीं समप्रमाणानें घेऊन यांचा अंगाला लेप करावा. त्या देहाला पाहिलें असतां किंवा स्पर्श [illegible] असतां पुरुष व स्त्रियांनां मोहित करणारें आहे. मंत्रपूर्वक याचा [illegible]योग केला असतां मानी असा पुरुषही वश होतो. सूर्याच्या अथवा [illegible]ग्रहणाचे वेळीं शिवलिंगीचें मूळ घेऊन त्याचें चूर्ण करून डोळ्यांत [illegible]लें असतां किंवा हातामध्यें ठेवलें असतां ग्रहपीडा दूर होते व या [illegible]लिंगीमुळाच्या सेवनानें सर्व रोगांची शांति होते. याच मुळाचें [illegible]मध्यें वाटून नस्य केलें असतां विषाचा नाश करतें. (...) [illegible]आदि विषांचें हरण करतें. •करंजकल्प—करंजाचे नम्र पल्लव घेऊन [illegible]त तळावे. त्यांच्या सेवनानें दुःसाध्य जांभयांचा नाश होतो. करं-[illegible]ची कोंवळी मुळी तुपांत पक्क करून घेतली असतां संधिवाताचा निः-[illegible] नाश होतो. आतां पुनर्नव्याचा कल्प सांगतों.—पांढऱ्या पुन-[illegible]चें मूळ गाईच्या तुपांत मिळवून त्याचें अंजन केलें असतां डोळ्यां-[illegible] अंतर्गत विकारांचा लवकर नाश होतो. पांढऱ्या पुनर्नव्याचे मुळाचा डोळ्यांतील फुलावर तुपाशीं मिश्र करून, अश्रुपातावर मधाबरोबर, कंडु [illegible] तर माक्याच्या रसाबरोबर, पटल असेल तर हळदीबरोबर, रातां-[illegible]वर तूप व हळद यांबरोबर अंजन केलें असतां त्या त्या नेत्ररोगां-[illegible] नाश करतें. (...) पुनर्नव्याचें झाड, मूळ, फळ व पाला यांसह [illegible] न छायेमध्यें वाळवून गाईचें तूप व सैंधव याबरोबर दिलें असतां

गुल्म व प्लीहावृद्धि यांचा नाश होतो. याचें चूर्ण सांखरेबरोबर किंवा दुधाबरोबर रोज प्रातः काळीं प्यालें असतां शंभरवर्षे पर्यंत प्राणि जगतो. ह्या चूर्णाचा ( . . . ) बरोबर उपयोग केला असतां देह व अग्नि यांची वृद्धि होते. साल पाण्याबरोबर वाटून घेतली असतां नेत्ररोग व अजीर्ण यांचा नाश होतो. मधाबराबर मूळ घेतलें असतां जरा लवकर येत नाहीं. पुनर्नव्याच्या मूळांचें चूर्ण दुधाबरोबर रोज दोन तोळेप्रमाणें घेऊन जीर्ण झाल्यावर दुग्धपान, भोजन करावें. याप्रमाणें एक महिना अगर दोन महिने सेवन केलें असतां शिरोरोग, ज्वर वगैरेचा नाश होतो. **पळाशकल्प–पळसाचे कल्प**–पळसाच्या बियांचें पाताळ यंत्रानें तेल काढून त्यापैकीं आठ मासे तेल, तूप व मध याबरोबर प्यावें. या प्रमाणें एक महिना केलें असतां तो योगीन्द्र दिवसा नक्षत्रेंही पहातो. व पुष्कळ कालपर्यंत जगणारा असा होत्साता देवदानवांना प्रिय होतो. पळसाच्या बियांचें चूर्ण करून त्याला आंवळयांच्या रसाची भावना द्यावी. त्याचप्रमाणें दुधाचीही सात दिवस भावना द्यावी व तें चूर्ण वाळवावें. सात दिवसपर्यंत या चूर्णाचें सेवन केलें असतां तो पुरुष दूरदृष्टि होतो. सूर्याप्रमाणें तेजस्वी, चंद्राप्रमाणें आल्हादकारक, वायूप्रमाणें अति उग्र वेग बळ धारण करणारा, बृहस्पतिप्रमाणें बुद्धिवान्, आपल्या वाणीनें सरस्वतीलाही जिंकणारा असा होउन चंद्रसूर्यादि ग्रह आहेत तोंपर्यंत जगतो. पळस पापडीला वर सांगितल्याप्रमाणें भावना दिल्यावर त्याचें चूर्ण नुकत्याच प्रसूत झालेल्या गाईच्या दुधांत भिजवुन तुपानें राबलेल्या भांड्यांत झांकून ठेवावें. एकवीस दिवसांनंतर सुमुहूर्त पाहुन त्याचें भक्षण करावें; दुग्धाहार ठेवावा. कांजी, आंबट वगैरे पदार्थ वर्ज करावे. हा कल्क एकवीस दिवस सेवन केला असतां तो मनुष्य आकाशसंचारी होतो, बलानें, कांतीनें, भीमसेनासारखा पराक्रमी, जरामरणरहित होतो व त्याचा कधीं क्षय होत नाहीं. तसेंच ह्या चूर्णापैकीं एक पळ चूर्ण

पळ दुधाबरोबर एक महिनापर्यंत सेवन केलें असतां मूत्राचा पणा व ऊष्णता कमी होते. मूत्राला पिवळेपणा प्राप्त होतो. ळ काळपर्यंत तो जगून मदनाप्रमाणें सुंदर होतो. पळसाच्या चें पंचांग ( मूळ, पत्र, फळ, पुष्प, त्वचा ) आणून सांवलींत ावें व त्याचें बारीक चूर्ण करावें व एक तोळा प्रमाणें तूप रोबर घेतलें असतां जरा येत नाहीं व तो मनुष्य दिव्य देहधारी एक हजार वर्षे जगतो. पळसाच्या झाडाचें मोठें कांड पाहून आडवा छेद अर्धभागावर करावा. ( . . . ) त्याच्या मध्य भागीं करून त्यांत ९ जाम फळें घालावी. व त्यावर लांकुड बसवून बंद करावें. नंतर त्या खोडासभोंवतीं दर्भ गुंडाळून त्यावर ताचा लेप करावा. व त्यावर वस्त्र गुंडाळुन वर आणखी नी लावावी व ती सुकल्यावर रानशेणी सभोवतीं घालून गजपुट द्यावें. थंड झाल्यावर वरील मातीवगैरे काढून टाकून द्रवयुक्त अशीं फळें काढून घ्यावीं व तूपमधाबरोबर तीं करावीं. यथेष्ट दुग्धाहार करावा. त्या योगानें जरा नाश पावते. महिन्यानें जमिनी मधील गुप्त द्रव्याचा सांठा त्यास दिसतो व गांनीं राहित असा ब्रह्मदिनपर्यंत जगतो. पळसाच्या झाडाचें ळ व फळ घेऊन त्याचें बारीक चूर्ण करावें व काळ्यावर्णाच्या ा दुधाबरोबर तें खावें ( . . . ) या योगें तिनशें वर्षे मनुष्य जगतो. च्या फुलांचा रस काढून त्यांत हरताळ घालावा व त्याचा कल्कें त्या कल्क चा बत्तिसावा भाग कथिल घेऊन त्यास लेप करावा त्या कमलाचें कुंदपुष्पासारखें शुभ्र रुपें तयार होतें. पळसाच्या । रस घेऊन त्याच्या गंधकास भावना द्याव्या व त्याचा च्या पत्र्यांना लेप करून पुट दिल्यास कांचन होतें. त्याच्या तेल, पारा व गंधक मर्दन करून त्याची बत्तीस पुटें दिल्यानें होतें. पांढऱ्या पळसाचें पंचांग घेऊन त्याचें चूर्ण करावें व

श्रीशंकर.

# वनौषधी-गुणादर्श.

## भाग ३ रा.

### १. गेळ. (सं. मदन. मं. गेळ. हिं. गेळ.)

हें झाड फार मोठें होत नाहीं. यास दोन अंगुळेंपर्यंत लांबीचे लहान व मोठे कांटे असतात याचीं पानें वडाच्या पानाप्रमाणें असतात. यास सुपारीएवढीं फळें येतात, तीं पिकून पिवळीं होतात, या फळास मेणफळ असेंही नांव आहे. हीं झाडें डोंगराळ प्रदेशांत फार असतात. याच्या फळांची भुकणी करून कोळी लोक नदींत टाकतात; तेणेंकरून मासे तिला लुब्ध होऊन तेथचे तेथेंच राहतात. पावसाळ्याकरितां जें धान्य संग्रह करून ठेवावयाचें, त्यांत ओलीं गेळफळें घालून ठेवावीं; म्हणजे त्या धान्यास कीड वगैरे लागत नाहीं. वाळलेल्या राखेंत पारा मिश्र करून ती राख धान्यांत घालितात, त्याहीपेक्षां हा योग उत्तम आहे. गेळ-तिखट, कडू, मधुर, उष्ण, लेखन, लघु, रुक्ष, वांतिकारक, बस्तिकर्माविषयीं उत्तम, हितकारक; व कफ, वायु, व्रण, शोथ, आनाह, विद्रधि, गुल्म, कुष्ठ, पडसें, विष, अर्श व ज्वर यांचा नाश करितो (१.) आगंतुक पोटशूळावर-गेळफळ कांजींत उगाळून त्याचा दिवसांतून दहा पांच वेळ नाभीवर लेप करावा. (२.) पित्त पाडण्यास-गेळफळाचा रस दोन तीन पैसेभार काढून त्यांत मध घालून द्यावा. सुकें फळ असेल तर चूर्ण मधाबरोबर द्यावें, म्हणजे वमन होऊन पित्त पडेल. (३.) सुखप्रसूतीस-गेळफळाची जननेंद्रियास धुरी द्यावी व कळलावीचे मुळास तंतू बांधून ते हातापायास बांधावे. (४.) कफवातावर-गेळफळाचें चूर्ण दुधांत घालून द्यावें; म्हणजे वमन होऊन कफवायूची पीडा दूर होते.

वर्षे किंवा सहा महिने अथवा एक वर्षपर्यंत जो मनुष्य या तेलाचें सेवन करतो त्याचा देह सुवर्णासारखा होऊन तो अक्षय होतो, म्ह. त्याचा नाश होत नाहीं. प्रयत्नपूर्वक आराधना केल्यामुळें देवानें हा योग सांगितला आहे. श्रीशंकर सांगतात: हे वत्सा, तुला दोन योग सांगितले, आतां तिसरा योग ऐक. तेल. तूप व मध यांबरोबर एक कुडव प्रमाणें जो सेवन करील त्याचें फळ ऐक. एक वर्षभर याचें सेवन केलें असतां अग्नि, उदक यांपासून त्याला मरण येत नाहीं. तो इतिहासपुराणें जाणणारा व वेदवेत्ता होतो. त्याच्या मूत्रपुरीषाच्या योगानें तांब्याचें सुवर्ण होतें. बारा वर्षेपर्यंत सांगितलेल्या रीतीनें जो या तेलाचें सेवन करील तो या देहासह ब्रह्मलोकांत जातो. हें परमगुह्य मीं कोणालाही सांगितलेलें नाहीं. हे वत्स मी तुला तिसरा कल्प सांगितला. आतां चवथा कल्प ऐक. वर सांगितलेलें हें पळसबीजांचें तेल व गूळ हीं एकत्र करून तुपानें रावलेल्या भांड्यांत ठेवावीं. पंधरा दिवसानंतर त्याचें सेवन करावें. दुग्धभोजन, मुगांचा खाण्यांत उपयोग करावा. जितेंद्रियहोत्साता व्रतस्थ राहावें. याप्रमाणें सात दिवस केलें असतां तो किन्नरांसारखें गायन करतो. दहा दिवस सेवन केलें असतां तो मोठा बुद्धिवान् होतो, व ज्याचें नवयौवन कधीं क्षीण होत नाहीं असा हजार वर्षे जगतो. तो भाग्यवान्, दर्शनीय, केतकीपत्रासारखा ज्याचा वर्ण आहे असा होतो. श्रीशंकर म्हणतात हे पुत्र मी चवथा कल्प सांगितला. आतां पाचवा कथन करतों तो ऐक रोज पळसाची एकेक बी तूप व साखर यांबरोबर सेवन करावी. याप्रमाणें एक वर्ष सेवन केलें असतां त्याचें फल सांगतों ऐक. पूर्वी जे योग सांगितले त्याचें जें फळ यापासून प्राप्त होतें. हा पांचवा कल्प गुप्तपणें तुला सांगितला. आतां सहावा कल्प ऐक. पळसाचीं कोंवळीं पानें घेऊन सांवलींत वाळवून लोखंडाच्या पात्रांत घालावीं व त्याचें बारीक चूर्ण करावें. व तें ब्रह्मचारी जो त्यानें शुभ दिवशीं ग्रहण केलें असतां कल्याणकारक होतें. ( . . . ) पळसाच्या बियांचें चूर्ण करून ताकाबरोबर प्यावें व तें जीर्ण होऊं

लागलें ह्मणजे आंबट व खारट पदार्थांनीं रहित असें पथ्यकारक भोजन करावें, तहान लागली असतां दूध किंवा थंड पाणी प्यावें. याप्रमाणें एक महिना सेवन केलें असतां भ्रमरासारखा तो होतो. सहा महिने सेवन केलें असतां कार्णिक पुष्पासारखी कांति होते व तो बुद्धिवान होतो. त्याच्या अंगाला वळ्या पडत नाहीं. केश पिकत नाहींत. व एक हजार वर्षें तो जगतो. हा सहावा योग तुला सांगितला. आतां सातवा कल्प ऐक. पळसाचीं फुलें घेऊन तीं उन्हांत सुकवून त्यांचें बारीक चूर्ण करावें. व त्याचें एकवीस दिवस सेवन करावें. व साठ्या साळींचा भात भक्षण करावा. तहान लागली असतां खैराच्या साळीचा किंवा नाराचा काढा करून तें पाणी प्यावें. याप्रमाणें २१ रात्री गेल्या असतां तो मनुष्य मत्त हत्तीप्रमाणें गमन करणारा, वायुवेगाप्रमाणें सामर्थ्यवान् व अग्निप्रमाणें कांतिवान् होत्साता हजार वर्षें जगतो. हे वत्सा हा सातवा कल्प तुला सांगितला. आतां आठवा कल्प ऐक. पळसाच्या झाडाचे साळीचें सूक्ष्म चूर्ण करावें व गाईच्या दुधाबरोबर सेवन करावें. दुधाबरोबर लघु आहार करावा. जितेंद्रिय रहावें. याप्रमाणें एक वर्ष पर्यंत सेवन केलें असतां काय लक्षणें होतात तीं ऐक. सहा महिन्यानंतर त्याच्या मूत्रापासून लोहाचें सुवर्ण होतें, व तो शेंकडों हजारों वर्षें जगतो यांत संशय नाहीं. आतां नववा कल्प ऐक. पळसाच्या बियांचें तेल एक पल ( चार तोळे ) प्रमाण तुपाबरोबर प्यावें. त्या योगें तो महायोगी, बुद्धिवान् होतो व त्याला मूर्च्छा प्राप्त होते. एक मास पर्यंत मोठ्या प्रयत्नानें दुग्धाहारी राहून याचें सेवन केलें असतां तो अदृश्य अशा वस्तुही पाहातो. अग्नीनें जळला असताही त्याला मळ येत नाहीं, व वलिपलित रोगानें रहित असा होऊन दहा हजार वर्षें जगतो. हे कार्तिकेय आतां दहावा कल्प ऐक. पळसाचें तेल, मध व ब्राह्मीचा रस हीं समभाग एकत्र करून त्याचें तीन महिनेपर्यंत सेवन केलें असतां तो मनुष्य दिवसासही नक्षत्रे पहातो. सहा महिने

सेवन केलें असतां सिद्धी प्राप्त होते, ब्रह्म देवाचीं व विष्णुची
ावधी वर्षे गेलीं तरी त्याला मरण येत नाहीं. हे पुत्रा तुझ्या
स्त मी तुला हें सत्य रहस्य सांगितलें. तीं सर्व गुह्यांत गुप्त व
कालासारभुत असें उत्तम औषध सांगतों. पळसाच्या बियांचें
ेऊन तें प्रथम श्रावण अथवा भाद्रपदमासीं दुपट बुधांत कढवावें
ः दिवसपर्यंत तसेंच राहूं द्यावें. झ. त्याचे दाहि होतें. त्या
ं घुसळून लोणी काढावें व तें जवाच्या पदार्थाबरावर भक्षण
. साळीचा भात दुधाबराबर भक्षण करावा. याप्रमाणें सात दिवस
असतां अंगाला सुरकुत्या पडत नाहींत. केश पिकत नाहीं व तो
वेदवेत्ता, सर्व सत्व जाणणारा होऊन तीनशें वर्षे जागतो. ९२
. ) आतां कृष्ण हरिद्रा कल्प सांगतो. ओली हळद आणून
त तीचें चूर्ण करावें व तें कोरड्या भांड्यामध्यें ठेवावें. गाईच्या
राबर तें प्यालें असतां शरीराचें शोधन करतें. सात दिवसपर्यंत
सेवन केल्यानें कुक्षिमधील रोग नाश पावतात. ऊन पाण्याबराबर
त दिवस घेतलें असतां मनुष्य वीर्यवान होतो. साळीचा भात
ाबर किंवा तुपाबराबर खावा. व चार मासे हळदीचें चूर्ण मधाब-
रोज घेत जावें. याप्रमाणें एक महिना केलें असतां चंद्रासारखी
होते दोन मास सेवन केलें असतां कमळासारखी प्रभा होते.
महिन्यानीं पित्ताचा नाश होतो. ... नीं ज्वरादिकांपासून
होतो. व पाच महिने सेवन केल्यानें ... यौवन प्राप्त होते स-
ा महिन्यात सूर्यासारखी कांती होते. ... महिन्यांत (...)
या महिन्यात प्रसन्न अंतःकरणाचा ... दूरचें ऐकूं येतें व
ा महिन्यांत अनायासानें शंभर ... सामर्थ्याचें सामर्थ्य येतें.
महिने सेवन केल्यानें अनेक शास्त्रें ... होतो. अकराव्या
यांत तो मनुष्य सर्वज्ञ होतो व ए... ... ज हरिद्राचूर्ण खा-
दुधावर राहणारा तो मनुष्य वृद्धाव... ... ांनीं रहित होतो.

कटुरोहिणी-कुटकीचा कल्प-पुष्य नक्षत्रीं रवि असतां कटुकीचें चूर्ण पाण्याबरोबर घ्यावें. त्यायोगें कष्टसाध्य असा ताप, ज्यामध्यें भ्रम, मोह असतो, त्याचा नाश होतो. पाहाड व कटुकी यांचा अष्टमांश आठपट पाणी घालून काढा करून घेतला असतां, सर्व ज्वरांचा नाश करतो. सकाळीं हा काढा घेतला असतां तो रेचन करणारा आहे. कटुकी व विषकाची साल व काष्ठ यांचा लेप केला असतां ज्वरांतील दाह नाश पावतो. कटुकीचें मूळ पाण्याबरोबर उगाळून प्यालें असतां सर्व ज्वरांचा नाश करतें. कटुकीच्या चूर्णाला रुईच्या दुधाच्या भावना द्याव्या व त्याच्या वड्या कराव्या. एक वडी विड्याबरोबर खाल्ली असतां तृतीयक ज्वर व चातुर्थिक ज्वर यांचा नाश होतो. कांजीबरोबर कटुकीचें सेवन केलें असतां ती सर्व प्रकारचे विषाचा नाश करणारी आहे. बडाया पारंबीनें कटुकीचें मूळ गळ्यामध्यें बांधलें असतां सर्व ज्वरांचा नाश होतो.

(. . .) अश्वगंधाकल्प-आस्कंधाचे कल्प-आस्कंधाचें बारीक चूर्ण करून तें दुधाबरोबर सेवन करावें किंवा तीळ व आस्कंध याचें चूर्ण गुळ घालून रोज एक तोळा प्रमाणें घेतल्यानें सर्व रोगांचा नाश करतें. तसेंच तें चूर्ण आंवळीच्या रसाबरोबर एक तोळा प्रमाणें सेवन केलें असतां मनुष्याची दृष्टी दिव्य होते व तो जरामरणरहित होतो. आस्कंधाचें चार मासे, गुळवेलीच्या हिरव्या सालीचें चूर्ण आठ मासे असें एकत्र करून रोज सायंकाळीं ऊन पाण्याबरोबर घेतलें असतां दुःसाध्य असे ज्वर वगैरे निरनिराळे रोगांचा नाश करतें. अश्वगंधाचें चूर्ण लोण्याबरोबर घेतलें असतां केश उत्पन्न करतें. तेलाबरोबर चूर्ण लावलें असतां स्वप्नरोगांचा नाश होतो. तसेंच अश्वगंधाचें चूर्ण दोन तोळे, तीळ चार तोळे, उडदांचें पीठ सोळा तोळे मिळून सर्वांचें चूर्ण तुपांत भाजून त्याचे वडे करून ग्रीष्म ऋतूंत भक्षण करावे. त्यायोगें जरा येत नाहीं. पांढऱ्या अश्वगंधाच्या मुळीनें रसायन केला असतां दुर्बळ असा मनुष्यही क्लेश न सोसतां मोठा भार वाहतो. अश्वगंधाचें पान, मूळ,

दांडा व फूल यांचें चूर्ण करून ताक, ... दिवस, दूध, मध, ... बरोबर सहा महिने सेवन केलें असतां मनुष्य अजरामर होतो. अंकोलकल्प—पांढरा, तांबडा, काळा व पिवळा असे चार प्रकारचे अं... आहेत. अंकोलाच्या झाडाचें पूर्वेकडील मूळ घेऊन कापूर व ... बरोबर, त्याचें डोळ्यांत दिवस मावळतांना अंजन केल्यास नष्ट ... वस्तु दिसते. एकवीस दिवसपर्यंत अंकोलाचें बीं मधाबरोबर ... त्या माणसानें तें खात असतां सर्पानें पाहिलें तर सर्प तत्काळ मरण ... . ह्याच बीजाचें चूर्ण मधाबरोबर शुद्धपक्षांतील चांदण्यांत घेतलें ... जरेनें युक्त असा मनुष्य तरुण होतो. अंकोलाच्या बियांचे त... पारा मर्दन करून त्याचे ( .. ) त्यापैकीं चार मासे (...) असतां ... प्रतीमाचें सोनें होतें. काळ्या अंकोलाच्या बियांचें चूर्ण करून (.,.) मर्दन करावें व तें मातीच्या भांड्याचे आंतून लावावें (...) ... काजळाचें अंजन केलें असतां अदृश्य होण्याची शक्ति येते. (...) ... ज्या अंकोलाच्या बियांचें तेल, पूर्वी सांगितल्याप्रमाणें काढावें. त्यानें ... च्या पड्यांस लेप करून (....) शाल्मलीकल्प—पांढरी, काळी, ... व हिरवी अशी चार वर्णाची सांवर आहे. (....) सांवरीच्या ... ची साल घेऊन त्याचे तेल सिद्ध करावें. तें तेल साखर घालून सात ... सेवन केलें असतां अनेक स्त्रियांचा उपभोग घेणारा दीर्घायुषी ... दनासारखा सुंदर होतो. सांवरीच्या झाडाला रंध्र पाडून त्यांत टो... वी पोकळ नळी घालावी. व त्या नळीच्या टोंकाखालीं भांडें ठेवावें, व ... सभोंवती अग्नि करावा; ह्या त्या वृक्षांतून नळीच्या द्वारानें रस येईल. ... रस चवदा दिवसपर्यंत मधाबरोबर सेवन केला असतां, इच्छेस ये... नें रूप धारण करतो व स्वतःस अदृश्यत्व प्राप्त होतें देवानाही तो ... य होतो या रसाच्या योगानें रुप्याला काळा वर्ण येतो.—(.. .) ... चें फुल. माका, तेल ... कमळाचा कंद यानीं तेल सिद्ध करून तें ... ना लावलें असतां सात दिवसांत पलित रोग नाहींसा होतो पांढऱ्या

सांवरीचें मूळ, कापूर व मध याचें अंजन करून केळीचें पान वर बांधावें म्हणजे नाहींशी झालेली वस्तु किंवा जमिनीतील द्रवाचे विधि पहातो. पूर्वी सांगितल्याप्रमाणें शाल्मलीनिर्यासापासून तळ काढून त्यांत चार तोळे पारा मर्दन करावा. त्यांत दोन तोळे लवंग व दोन तोळे वंग घालावें व तें औषव दूध व सार याबरोबर सेवन करावें. ह्म. त्यानें अनेक स्त्रियांचा उपभोग घेण्याचें सामर्थ्य येतें तो मदनासारखा होतो. सांवरीचें मूळ व अश्वगंधाचें चूर्ण करून त्यांत उडदाचें पीठ, साखर व तूप मिळवावें व त्याचे वडे करून खावे. याप्रमाणें २१ दिवस सेवन केलें असतां तो ऐश्वर्ययुक्त होतो व त्याला तरुणहत्तींचें बल प्राप्त होतें. व तरुण स्त्रियांचा मद शमविण्यास तो समर्थ होतो हें औषध घेत असतां आंबट व खारट रस सेवन करूं नयत. हिरव्या सांवरीपासून पूर्वी सांगितल्याप्रमाणें तेल काढावें. त्याच्या योगानें रुप्याला सुवर्णत्व प्राप्त होतें. तुपाबरोबर तें तेल सेवन केलें असतां तो मनुष्य दिव्यदेही* होतो. तें तेल मद्याबरोबर घेतलें असतां सर्व रोगांचा नाश करत व सुवर्णासारखा वर्ण व सूर्यासारखी प्रभा होते. हिरव्या सांवरीच्या फुलांचा स्वरस प्याला असतां बालसूर्यासारखी कांती होत व पुष्कळ काळपर्यंत जगून देवासारखें सुख भोगते. तांबड्या सांवरीच्या कोंवळ्या मुळांचा रस खडीसाखर व मध घालून प्याला असतां वज्रासारखें शरीर होतें. ( .... ) काकजंघाकल्प —पुष्य नक्षत्र असतां काकजंघेचें मुळासह सर्व झाड आणावें. त्याचा रस किंवा चूर्ण एक तोळाप्रमाणें तुपाबरोबर सेवन करावा. याप्रमाणें सहा महिने केलें असतां सर्व शस्त्रांचें निवारण करणारें आहे. मळमूत्राचा स्तंभ होईल तर व्यायाम करावा. दुधाबरोबर हें चूर्ण सेवन केलें असतां वज्रदेही होतो चवदा दिवस सेवन केल्यानें वृद्ध मनुष्याला ही तारुण्य प्राप्त होतें. काकजंघेचें चूर्ण व शिंगाडीचें चूर्ण, गव्हाचें पीठ हें एकत्र करून त्याचा वेष्टन करून त्याचा पुटपाकविधीनें पोटळी भजावी. एक दिवस त्याचें सेवन केलें

ही तो मनुष्य वज्रशरीरी होऊन सूर्यासारखा दिसतो. करकटकल्प (उटकटारीचे कल्प) उटकटारीचें पंचांग घेऊन त्याचें चूर्ण करून साखरेबरोबर सेवन करावें. व आहार मधुर ठेवावा म्हणजे तील सर्व रोगांचा नाश होतो. उटकटारीच्या मुळाचें चूर्ण पाण्या- घेतलें असतां क्षय व अपस्मार यांचा नाश होतो. उत्तर दिशेकडे त्याचें मूळ खडीसाखर व दूध याबरोबर घेतलें असतां पुष्टीदाय- आहे. (. . .) उत्पन्न झालेलें त्याचें मूळ हळदीचे चूर्णाबरोबर केलें असतां दुःसाध्य पांडुरोगाचा नाश होतो. गाईचें मूत्र या बरोबर तिच्या मुळाच्या चूर्णाचें सेवन चवदा दिवस केलें प्रमुख अशीं महाकुष्टें व दुष्टरोग व्रण यांचा नाश करतें. ारीच्या पंचागाचें चूर्ण ताकाबरोबर घेतलें असतां व्रणाचा करतें. दुधाबरोबर त्याच्या चूर्णाचें सेवन केलें असतां थंड पाण्यास केल्याबरोबर त्याचा वेग थांबतो. वेताळ, स्मर, कोदंड, सूर्य यांची पीडा नाश करतो. निर्गुडीकल्प–निर्गुडीच्या मुळाचें तोळे, गाईचें तूप ३२ तोळे, तूप व मध ६४ तोळे–दुध ६४ हीं एकत्र करून तुपानें रावलेल्या मडक्यांत ठेऊन त्याला लाख करून धान्याच्या राशींत ठेवावें. एक महिन्यानंतर काढून नक्षत्रयुक्त शुभ दिवशी त्या औषधापैकीं एक तोळा औषध करावें. या प्रमाणें एक महिना केलें असतां तो मनुष्य वळी त रोग यांनी रहीत होऊन तीनशें वर्षें जगतो. निर्गुडीचें ऊन बकरीच्या मूत्राबरोबर तें प्यालें असतां नखें, दांत व सात दिवसांत गळतात. निर्गुडीचें मूळ एक महिनापर्यंत राबर सेवन केलें असतां, वळीपलिताचा नाश होतो एक या प्रयोगाच्या योगानें मनुष्य आकाशगामी होतो. निर्गुडीचें घेऊन तिळांच्या तेलाबरोबर भक्षण करावें. एक महिन्यानें त कुष्टांचाही नाश होतो. पुष्य नक्षत्रीं सूर्य असतां प्रातःकाळीं

निर्गुंडीची साल घेऊन ती चुर्ण करून चूर्ण करावें. त्यापैकीं एक तोळा चूर्ण बकरीच्या मूत्रावर घ्यावें. याप्रमाणें सहा महिने सेवन केलें असतां अमर होतो. एक वर्ष सेवन केलें असतां तो मनुष्य शिवासारखा होतो. अर्ध तोळा प्रमाणें हे चूर्ण मधाबरोबर चाटलें असतां पूर्वीप्रमाणेंच फळें होतात. निर्गुंडीच्या मूळाचें चूर्ण त्रिफळा, सुंठी, माका, कडुनिंब, गुळवेल व वेखंड हीं समभाग घेऊन चूर्ण करून मध व तूप याबरोबर घ्यावें. या योगेंही पूर्वीचेच गुण प्राप्त होतात. गुळामध्यें टाकून याच्या गोळ्या करून त्या घेतल्या असता जोगचें रेचक आहे. व मुख, दंत, नेत्र व कर्णरोग, क्षय इत्यादि रोगांचा सात दिवसांत नाश करते. तीन महिने सेवन केलें असतां जरा येत नाहीं व तीनशें वर्षें जगतो. भक्षण करताना ॐ माय त्मगणपतये कुरुस्वाहा असा मंत्र ह्मणावा. निर्गुंडीचें मूळ घेऊन सावलीत सुकवून चूर्ण करावें व गोमूत्राबरोबर सात दिवस सेवन केलें असतां तो निर्भय होतो. बकरीच्या मूत्राबरोबर तें चूर्ण घेतलें असतां नखकेश व दंत हे गळून नवीन येतात व चवदा दिवस सेवन केल्यानें मनुष्याचें शरीर दिव्य होतें व त्याला पाणी व अग्नि यांपासून भय रहात नाहीं हस्तनक्षत्रीं सूर्य व सोमवार असतां उत्तरेकडील मूळ आणून त्याला स्पर्श केला असतांही बंधापासून मुक्त होतो ( . . . ) इंद्रवारुणीकल्प–इंद्रवारुणीचें मूळ कांजी बरोबर सेवन केलें असतां स्थावर व जंगमविष, भूतबाधा व ग्रहपीडा इत्यादिकांचा नाश होतो. बिल्व पत्राबरोबर तें सेवन केलें असतां ग्रहपीडा होत नाहीं. त्याचा रस दुधाबरोबर घेतला असतां वंध्येला पुत्रप्राप्ती होते पुष्य नक्षत्रीं इंद्रवारुणीचें मूळ आणावें. तें व चंदन याचें चूर्ण करून दुधांत खलून गोळी करावी व सावलींत वाळवावी. त्याचा तिळक कपाळीं केला असतां तो प्राण्यांना वश करणारा आहे. इंद्रवारुणीचें चूर्ण व सुंठ, मिरीं, पिंपळी हीं गायीच्या दुधांत शिजवून गोळी करावी,

...विलींत वाळवावी ती तोंडांत धरिली असतां दांतांचा स्तंभ ... ८१. भृंगराजकल्प—पुष्ययोग असतां माक्याचीं मुळें आणून ...त वाळवून बारीक चूर्ण करावें. व कांजीबरोबर पुष्यार्क असतां ... तोळाप्रमाणें सेवन करावें. त्या योगें रोग होत नाहीं. तेलाबरोबर ... असतां जरा उत्पन्न होत नाहीं. एक महिना सेवन केलें असतां ... रोगांचा नाश करतें. दोन महिन्यानीं, सर्व वेदांना धारण करणारा होतो. चार महिन्याचे सेवनानें किन्नरांबरोबर गायन करतो. पांचव्या ...न्यांत काव्य करणारा होतो. सहाव्या महिन्यांत काकासारखी ... होते. सात महिन्यांत नख केस गळून पुन्हा येतात. ...महिन्यानीं सर्व भूतांना पाहातो. दहा मास सेवन केलें असतां ...ों वर्षे जगतो. एक वर्ष सेवन केलें असतां मनुष्य हजार वर्षे ...ी. हें रसायन सेवन करीत असतां कोहळा, कारलें, धने, ...ी हीं वर्ज करावीं. माक्याच्या रसाच्या भावना त्रिफलाचूर्णास ... तें दीड महिना सेवन केलें असतां पलित रोगाचा नाश होतो. ...माचीचा रस व माक्याचा रस, याच्या त्रिफळ्याला भावना देऊन ...रा दिवस सेवन केल्यानें पलिताचा नाश होतो. त्रिफलाकल्क— ... तीन निष्क, बेहडा सहा निष्क, आंवळकाठी १२ निष्क ... सूक्ष्म चूर्ण करावें. नंतर त्या चूर्णाला वावडिंग, खैरसाल, माका ...या काढ्याच्या सात भावना द्याव्या. एक महिनापर्यंत याचें ... केलें असतां, वळी व पलित रोगापासून मुक्त होतो. सहा ...न्यांनीं दिव्य देह होतो. एक वर्ष सेवन केलें असतां मनुष्य एक ...ार वर्षे जगतो. हरीतकी तीन भाग, आंवळकाठी १२ भाग, ...ा सात भाग याला त्रिफला म्हणतात. खैरसाल, माक्याचा रस, ...डिंगाचा काढा, व ब्राम्हीचा रस या प्रत्येकाची सात सात ...म त्रिफळ्याला भावना द्यावी. नंतर त्यांत सम भाग साखर मिळवावी. ...ाचें भक्षण करावें. यायोगें वळी व पलितांपासून मुक्त होऊन

सर्व रोगांपासून मुक्त होतो. मुसलीकल्प.–मुसलीकंदाचें मधाबरोबर सेवन केलें असतां ज्वराचा नाश होतो. गोमूत्राबरोबर संतत ज्वराचा नाश होतो. उष्ण पाण्याबरोबर शूलाचा नाश होतो. जांभळांच्या रसाबरोबर कामलेचा नाश करतो. कांजीबरोबर ह्याचें चूर्ण प्यालें असतां तत्काळ कुक्षिशूळाचा नाश करतें. केळीच्या पाण्याबरोबर तृतीय ज्वराचा नाश करतें दुधाबरोबर सेवन केलें असतां छातीतील पीडा व शरीराचा कृष्णवर्ण नाहींसा करतो. आवाळ्याबरोबर सेवन केलें असतां वाताची शांती होते. तुपाबरोबर त्याचें चूर्ण वीर्यवृद्धी करणारें आहे. नारळाच्या पाण्याबरोबर प्यालें असतां मस्तकपीडा नाहींशी होते. तिळाच्या तेलाबरोबर कफरोग नाश होतात. ( ..) सुरणाबरोबर घेतलें असतां गुदसंबंधी रोगाचा नाश होतो. आल्याच्या रसाबरोबर प्यालें असतां शूलाचा नाश होतो. ( ... ) जलोदराचा नाश होतो. सैंधवाबरोबर चूर्ण घेतलें असतां दुष्ट व्रणाचें शोधन होतें. पिंपळीबरोबर जीर्णज्वराचा नाश होतो. ऋतुस्नात असतां पांढऱ्या रिंगणीच्या मुळाबरोबर सेवन केलें असतां वंध्येलाही पुत्रप्राप्ती होते. वेखंडाबरोबर सेवन केलें असतां बृहस्पतीसारखा होतो. माक्याच्या रसाबरोबर दूषित वाताचा नाश होतो. भूशिरीषाबरोबर सेवन केलें असतां जरा व मरण यांचा नाश होतो. ताकाबरोबर पांडुरोगनाशक आहे. निर्गुंडीच्या रसाबरोबर वज्रदेह करणारा आहे. बकरीच्या मुताबरोबर वलिपलिताचा नाश करतो. नारळाच्या पाण्याबरोबर विषाचा नाश करतो. कडू पडवळाच्या काढ्याबरोबर घेतला असतां (. .) महाळुंगाच्या रसाबरोबर घेतलें असतां कुक्षिरोगाचा नाश करते. मुसलीचें मूळ आणून सांवलींत सुकवून चूर्ण करावें. व शुभ दिवशीं तूप मधाबरोबर देह शुद्धी करतां तें घ्यावें. जीर्ण झाल्यावर दुधाबरोबर भोजन करावें. वातुल पदार्थ वर्ज करावें. या प्रमाणें १ महिना केलें असतां मनुष्य वलीपलितरहित होतो. तूप-मधाबरोबर मुसळी सेवन केली

नां सर्व कुष्ठांचा नाश करते. या मुसळीला स्वर्णपुष्पी, गौरी, ना-
…, कुष्ठशोषिणी व खर्जुरपत्रक अशीं नांवें सांगितलीं आहेत
… कल्प—देवदानवांनींही जिची प्रशंसा केली आहे अशी मुंडी तीन
… रची आहे. पांढरी, लाल व काळी हिच्या ठाईं अनुक्रमें सत्त्व,
… तम हे गुण आहेत, असें श्रीशिव सांगतात. शुद्ध पक्षांत पंचमीला
… पौर्णिमेला रेवती, रोहिणी, पुष्य व श्रवण नक्षत्रीं रवि असतां
… णांनीं गंधपुष्पादिकांनीं मुंडीची पूजा करून मुळासह ती उपटून
… वी. त्याचें चूर्ण सात दिवस सेवन केलें असतां शरीर दृढ होतें.
… दिवस सेवन केलें असतां अमरत्व प्राप्त होतें. सांवलींत वाळवून
… चूर्ण एक तोळा गायीच्या दुधाबरोबर घ्यावें, याप्रमाणें एक वर्ष स-
… केलें असतां सर्व रोग नाहींसे होऊन तो तीनशें वर्षें जगतो. औषध
… चा मंत्र—ॐ नमो भगवते अमृतोद्भवाय अमृतं कुरु कुरु स्वाहा. हा
… ह्मणून मुंडीच्या पंचांगाचें चूर्ण ताक, कांजी, दूध, मध, तूप, पाणी
… बरोबर सहा महिने सेवन केलें असतां अमरत्व प्राप्त होतें. चित्रकक-
…—धन्वंतरी ह्मणतात. आतां चित्रकाचे उत्तम कल्प सांगतों.
… सेवन केलें असतां जरा मृत्यु यांचा नाश होतो. पृथ्वीतलावर
… यासारखें दुसरें औषध नाहीं. कृमी—जंतूंनी दूषित केलेला, ग्रामाच्या
… वरील, स्मशानभूमीवरील, वारुळांतील, चवाठ्यावरील, घराच्या जव-
… चित्रक घेऊं नये. चित्रक तीन प्रकारचा आहे. एक सू पित्रमुख,
… मंडलपत्रक व तिसरा दोन्ही पत्रें ज्याला आहेत असा आहे.
… क अथवा मार्गशिर्षामध्यें तो काढावा. त्याच्या सेवनानें फार बळ
… होतें. दोन महिने सेवन केला असतां शरीर दृढ होऊन मनुष्य
… न्द्रिय होतो. एक महिनापर्यंत ताकाबरोबर जो चित्रकाचें सेवन
… त्याच सर्व रोगाचा नाश होऊन तो मदनासारखा सुंदर होतो.
… बरोबर चित्रकाचें एक महिना सेवन केलें असतां वज्रासारखा देह,
… निरोग शरीर, मोठें बल व पराक्रम प्राप्त होतो. योगरत्नावली-

त सांगितलें आहे. मूळासह चित्रकाचें झाड उपटून सावलींत वाळवून चूर्ण करावें व सुंठ, मिरीं, पिंपळी, यांच्या चूर्णाबरोबर तूप व मध यांशीं एक तोळाप्रमाणें सेवन करावें. याप्रमाणें सहा महिने केलें असतां वलीपलित रोगाचा नाश होऊन पांडुरोग, अपस्मार, जलोदर, भगंदर-सर्व प्रकारचे मेह, कुष्ठ, यांचा नाश होतो. गोमूत्राबरोबर चित्रकाचें एक महिना सेवन केलें असतां सर्व व्याधींचा नाश होऊन, रूपवान होतो. मधाबरोबर एक महिना सेवन केला असतां बुद्धिवान्, सत्य बोलणारा, दर्शनप्रिय होऊन व वलीपलित रोग यांनीं रहित होऊन शंभर वर्षे जगतो. हें चित्रकाचें रसायन हे ब्राह्मणा मी तुला सांगितलें आहे. एक अहोरात्र उपवास करून ईश्वरपूजा करून, रक्तांबर व मौन धारण करून रक्तगंध अंगास लावून, रक्तवस्त्रें धारण करून वद्य अष्टमी, चतुर्दशी, किंवा पंचमी, या दिवशीं चंद्रबल व ताराबल पाहून 'ॐ छि यि चित्राय स्वाहा' या मंत्रानें गंधपुष्पादिकांनीं लेपित करून बली द्यावा व पुन्हा हा मंत्र ह्मणावा. 'ॐ सत्यवतीत्रिपुरमहोदधे माचलःसमय हुंफट स्वाहा.' ह्या मंत्राचें उच्चारण करून मुळासह चित्रकाचें झाड उपटावें व सावलींत वाळवून बारिक चूर्ण करावें, व तें तूप व मध बरोबर त्रिकटूच्या चूर्णासह एक तोळाप्रमाणें सेवन करावें. सात दिवस तें सेवन करून दुधावर रहावें. त्यायोगें तो जितेंद्रिय होतो व पांचशें वर्षें जगून वलीपलित रोगांनीं रहित होतो. एक वर्ष सेवन केलें असतें हजार वर्षें जगतो व शंभर स्त्रियांचा उपभोग घेणारा होऊन त्याचें बल व यौवन क्षीण होत नाहीं व तो सोळा वर्षांचा मदनासारखा रूपवान्, सिंहासारखें बलवान् शरीरयुक्त, व कुबेराप्रमाणें धनवान् होतो. याचें सतत सेवन केलें असतां तो शंकरासारखा व रुद्रासारखा तेजस्वी होतो. व चित्रकाच्या प्रभावानें तो जरा व मृत्यु यांपासून मुक्त होतो. तांबड्या चित्रकाच्या चूर्णाचें तीनदां नस्य द्यावें. त्या योगें सर्व रोगांपासून मुक्त होतो. तांबडा चित्रक व चिंचबे यासभोंवतीं चित्र-

... व रुईचीं पानें लाऊन पुटपाक करावा. मंडूककल्प—मोठ्या नदी-... समुद्रामध्यें, सरोवरांत, मोठ्या ड बक्यांत दहा पुरुष खोलीवर ...डुक रहातात. त्यांत सर्व वर्णाचा. अति स्थूल, पुष्कळ काळ ...रा, बिळांत राहणारा असा बेडूक शरदृतुंत बाहेर येऊन ... ठिकाणीं रहातो. त्याच्या डोक्यामध्यें एक महारत्न असतें, ...विषांचा नाश करणारें आहे. त्याचा संग्रह केला असतां मृत्यु व ... येत नाहीं. ज्या खजिन्यांत हें रत्न असेल तेथें संपत्ति रहाते. ... स्पर्श केलेल्या उदकानें स्नान केलें असतां दहा प्रकारचे विषांचा ...होतो. त्याचा स्पर्श केला असतां किंवा तेलांत तो घालून तेल ...करून त्याचें सेवन केलें असतां वात, गुल्म, उदररोग, नेत्रशूळ, ...पीडा यांचा नाश होतो. श्रीफलकल्प—बेलांच्या फळांतील बिया ...त्यांचें सूक्ष्म चूर्ण करावें. व त्रिफळयाच्या काढ्याच्या त्या ... सात भावना द्याव्या; नंतर त्याचें यंत्रानें दाबून तेल काढावें. ...तुपाच्या गवलेल्या भांड्यांत ठेऊन तोंड बंद करून जमिनींत ... ठेवावें. एक महिन्यानंतर तें काढावें. नंतर शुभ दिवशीं ... देऊन कोठा शुद्ध करून वद्य अष्टमी किंवा चतुर्दशी-... योग असतां रहाण्याच्या घरामध्यें एक तोळा तेल प्यावें. ...त्यावर साळींचा भात व दूध असें भोजन करावें. एका दिवसांत तो ...न् होऊन बहिरेपणा, त्याचा अंधत्व, यांचा नाश होतो. दोन दिव-... सर्व रोगांचा नाश होतो. चवथ्या दिवशीं हजारों ग्रंथ धारण करतो. ...व्या दिवशीं तो सारस्वत होतो. सहाव्या दिवशीं तो नर ब्रह्मदेवासारखा ...तो. सातव्या दिवशीं तो सर्वज्ञ व प्रियदर्शन, वेदवेत्ता. ज्ञाता, श्रीयुक्त, ...र पपूष सारखी कांति ज्याची, असा होऊन व वळीपलित रोगांनें ... असा हजार वर्षे जगतो. "मनुः ॐ नमो वीरजननी स्वाहा". ...-नें अभिमंत्रण करून नंतर तें तेल सेवन करावें. लांगली कल्प.—आतां ... नागाचा उत्तम कल्प सांगतों. कांगली नांवानें प्रसिद्ध असी ही

औषधी सर्वांत उत्तम आहे. डांगरीचें मूळ व गंधक एकत्र करून त्याचा तांब्याच्या पत्र्यांस लेप करावा. (. . .) हें औषध प्रशस्त आहे. पाण्यांत खब्बानाग उगाळून त्याचा हातास लेप करावा.हस्ताचा स्पर्श स्त्रीला करतांच ती द्रवते. सर्व द्रावयोगामध्यें शिवानें सांगितलेला हा राजमंत्र आहे. त्याच्या सिद्धीकरतां खालील मंत्राचा १०८ वेळां जप करावा. "ॐनमो भगवते उमामहेश्वराय स्त्रीणां भगद्रे पातय स्वाहा हर ठठः" हाताला खब्बानागाचा लेप करून तो सर्व अंगास लावला असतां युद्धामध्यें भीमाचाही दर्प हरण होतो. देवदालीकल्प-देवडांगरीचें फल, दूध, मध, व तूप याचा महिनाभर अंगास लेप केला असतां द्रावण होतें. मूळ व फळ यांसह देवडांगरीचें सूक्ष्म चूर्ण करून एक तोळ्याप्रमाणें ऊन पाण्याबरोबर प्यावें. त्या योगें प्लीहा, भगंदर, वात, गुल्म, कामला, यांचा नाश होतो. गोमूत्राबरोबर प्यालें असतां सर्व कुष्ठांचा नाश होतो. देवडांगरीचा रस, गंधक, मनशीळ यांच्या योगानें सर्व धातूंचीं भस्में होतात व पाऱ्याचाही बंध होतो. रक्तगुंजाकल्प.– पुष्यार्क असतां तांबड्या गुंजेचें मूळ उपटून काढावें. त्याचा लेप सर्पदंशावर केला असतां तात्काळ विषाचा नाश होतो. तें मूळ तोंडांत धरून सभेंत गेलें असतां दुष्टांचा मुखस्तंभ व मतिस्तंभ होतो. तें मूळ कमरेस बांधलें असतां मेलेला गर्भ पोटांत असेल तर प्रसूति होते. तें मूळ आपल्या पंचमलांबरोबर ज्याला द्यावें तो निश्चयानें वश होतो. तें मूळ व रिंगणीचें फळ ह्यांचा मधाबरोबर शिस्नास लेप केला असतां स्त्रीचें द्रवण होतें. ती मोह पावते व वश होते. तें मूळ गळ्यांत बांधलें असतां कृमीचा नाश होतो. त्या मुळाचा लेप केला असतां नाडीव्रणाचें शोधन होतें. त्या मुळाला आपल्या शुक्रधातूची भावना द्यावी, व जिला तें खावयास दिलें ती स्त्री निश्चयानें वश होते. तें मूळ कमरेस बांधलें असतां सर्व ग्रहांची पीडा दूर होते. गुंजांचें पीठ बारीक करून त्याचा लेप लांकडांच्या पादुकांना करावा. कांहीं विघ्नाशिवाय तो मनुष्य एक कोस जातो. ७४(. . . .) ७५ साळ काढून टाकलेलें

…ी घेऊन चूर्ण करावें व सात दिवस माणसाच्या मूत्रांत भिजवावें. …शाच्या भांड्यांत घालून उन्हांत ठेवावें. त्यांतून तेल निघेल तें …ाचा पादुकांना लेप करावा. बेहड्याच्या पानाच्या रसाबरोबर … मुळाचें चूर्ण आठ दिवस खलावें; त्याचें अंजन केलें असतां तो …शाचादिक अनेक कौतुकें पाहतो. पांढऱ्या गुंजांच्या रसांत पांढरें …वावें. त्या सुतांची वात करून ती पेटवावी, व त्याचें काजळ धरावें. …जळाचें अंजन केलें असतां दिवसास नक्षत्रें पहातो. पांढऱ्या गुंजे- … उत्तर नक्षत्रीं उत्तरेकडील आणावें. त्याच्या योगें बाणांचा …होतो. पांढऱ्या गुंजांच्या रसानें सर्व अंगास लेप करावा व नंतर …ांमधून गेलें असतांही तो जळत नाहीं. "मनुः ॐ वज्रकारिणे …रुस्वाहा," या मंत्रानें पांढऱ्या गुंजेचें मूळ मंत्रऊन टाकलें असतां … अग्नि पेटविला तरी अन्नाचा पाक होत नाहीं. "मनु. ॐ नमो महा …न्हि रक्षस्वाहा." पांढऱ्या गुंजेचें मूळ कुसुंब्याच्या रसांत वाटून त्या- …ाला रंग द्यावा. तें वस्त्र अंगासभोंवती गुंडाळलें असतां मोठ्या …पाण्यांतही पाहिजे तसा उभा राहतो. खालील मंत्रानें अभिमंत्रित …ा योग करावा. याला जलस्तंभ म्हणतात. "ॐ नमो भगवते रु- … स्तंभय ठः ठः ठः" पुष्यार्कीं असतां पांढऱ्या गुंजेचें मूळ विधिपूर्वक … नंतर मुखीच्या रसाबराबर वांटून मधाबरोबर अंजन करावें. त्या …मनुष्य जमिनींतील द्रव्य व दिवसास तारे पाहतो. मंडूक ब्राह्मीक- …कृष्णपक्षांत पुष्यनक्षत्रयुक्त अशा दिवशीं मुळासह ब्राह्मीचीं पानें … त्याचें बारीक चूर्ण करावें. सात दिवस याचें सेवन केलें असतां … रोगांचा नाश होतो. सात सप्तकें याचें सेवन केलें असतां मनु- …देही होतो व सर्व रोगांपासून मुक्त होऊन विषवृक्षावरील बांदें, …, विषयांचा नाश करणारें आहे. उत्तराषाढा नक्षत्रीं विषवृक्षावरील … मुळी घेऊन हातांत धारण केलें असतां स्थावर व जंगम विषा- …ा होत नाहीं. मोहाच्या झाडावरील बांदें धान्यांत ठेवलें असत

धान्यवृद्धि करणारें आहे. पळसाच्या झाडावरील बांदें दुधाबरोबर सेवन केलें असतां (. . .) धूमकेतूप्रमाणें नाश करते. अंकोलाच्या झाडावरील बांदें धान्यांत ठवलें असतां धान्यवृद्धि करतें. निंबाच्या झाडावरील बांदें वश्य करण्याच्या हेतुनें दुसऱ्याच्या घरांत ठेवलें असतां जन्माचा वैरी असेल तरी वश होतो. बोरीच्या झाडांवरील बांदें दुधाबरोबर सेवन केलें असतां कुष्ठाचा नाश होतो. आंवळीच्या झाडावरील बांदें हाताला बांधलें असतां कलिचा नाश होतो. आशाभारवि वृक्षावरील बांदें हातांत घेतलें असतां द्यूतांत जिंकतो. (....) जांभळीच्या झाडावरील बांद्यानें चूर्ण करून ताकाबरोबर प्यालें असतां विषाचा नाश करतें. हातांत ठेवलें असतां युद्धांत व कलहांत जय होतो. पुष्य नक्षत्रीं तिंदुक वृक्षावरील बांदें वनांतून आणून अंगावर धारण केलें असतां तरवारीच्या धारेचाही स्तंभ होतो. (....) **बाकुचीकल्प.**—बांवची, त्रिफला. सुंठ, मिरीं, पिंपळी, चित्रक, घाणेरा करंज, निंबावरील बांदें, हीं गोमूत्रांत वाटून लावलीं असतां अठरा प्रकारच्या कुष्ठांचा तत्काल नाश होतो. बांवच्या व त्याच्या निम्मे हिंग, सिंदुर, पारा, हीं घेऊन ऊन पाण्याबरोबर प्यालें असतां सर्व कुष्ठांचा नाश होतो. ऊन पाण्याबरोबर बांवचीचें चूर्ण व सुंठ, मिरीं व पिंपळीचे चूर्णासहित सेवन केलें असतां शूळाचा नाश होतो. गुळाबरोबर बांवचीचें चूर्ण घेतलें असतां वाताचा नाश होतो. **रुदंतीकल्प.**—रुदंती नामानें विख्यात अशी औषधी चण्याएवढ्या पत्राची व जींतून पाण्याचे बिंदु गळत आहेत अशी प्रख्यात असून ती जरा व रोगांचा नाश करणारी आहे. ती चार प्रकारची पिंवळी, तांबडी, पांढरी, असते. काळी व त्या रुदंतीला शुद्ध पक्षामध्यें शुभ दिवशीं आणून सांवलींत वाळवून जितेंद्रिय पुरुषानें तिचें सेवन करावें. पहिल्यानें विरेचन देऊन नंतर एक तोळाप्रमाणें हें औषध तूप—मधाबरोबर एक महिना सेवन करावें. जीर्ण झाल्यावर दूधभात जेवित जावें. याप्रमाणें केलें असतां तो पुरुष सुदृढ, तेजस्वी होऊन

रोगांपासून मुक्त होतो. वलीपलित रोग यांपासून मुक्त होऊन दीर्घायु होतो. रुदंतीचें बारीक चूर्ण करून कडू भोपळ्यांत ठेवावें. एक प्रमाणें शुभ दिवशीं तूप व मध यांबरोबर सेवन करून पथ्याहार व गाईच्या दुधाचें सेवन करून राहिलें असतां सहा महिन्यांनीं मनुष्य वज्रदेही होतो. रुदंतीच्या पंचांगाचे चूर्णाचें भक्षण एक तोळा तूप व मधाशीं केलें असतां सर्व रोगांचें निवारण होतें, वलीपलितरहित होऊन शंभर वर्षे जगतो. याच्या भक्षणानें, पानानें, केल्यानें व लेपानें विषाचा नाश होतो. दुसरा मदनच कीं काय होतो: दुधाबरोबर ब्राह्मीचें चूर्ण एक महिना सेवन केलें असतां रोगाचें निवारण होतें. दोन महिन्याच्या सेवनानें तो जमिनींतील द्रव्य पहातो. तीन महिन्याच्या सेवनानें तो अदृश्य होतो, चार महिन्यांनीं देवादिकांचीं विमानें पहातो, सहा महिन्यांनीं आकाशांत जाण्याचें सामर्थ्य येतें. एक वर्ष या कल्पाच्या सेवनानें दुसरा शंकरच कीं काय असा मनुष्य होतो. या ब्राह्मीच्या रसाच्या योगानें पिशाच, राक्षस इत्यादिकांची पीडा होत नाहीं. त्याच्या सेवनानें वांझेला पुत्रप्राप्ति होते. ब्राह्मीचा मुळासहित पाला घेऊन त्याचा कल्क करून तूप-मध बरोबर सेवन केला असतां जलोदर, गुल्म, शूल, यांचा नाश होतो. तसेंच कुष्ठ, भगंदर, श्वास कास, याचा नाश होतो. "ॐ अमृतोद्भवाय अमृतं कुरु" या मंत्रानें अभिमंत्रित करून ब्राह्मीचें सेवन करावें. शुक्ल पक्षीं शुभ दिवशीं ब्राह्मीचीं पानें व मुळें घेउन सावलींत वाळवून चूर्ण करावें. तें गाईच्या दुधाबरोबर सेवन केलें असतां सर्व रोगांचा नाश होतो. **बंदाककल्प.**—बांडगुळाचा कल्प हस्त नक्षत्रावर झाडावरील बांद्याचें धारण केलें असता तें स्त्रिया, राजा यानां वश करणारें आहे. बाहाव्याच्या झाडावरील बांदें विशाखा नक्षत्रीं काढून धारण केलें असतां अग्नीपासून त्याच्या गृहाला भय रहात नाहीं. वडावरील बांदें रोहिणी नक्षत्रीं हातांत धरलें असतां कीर्तिवर्धक आहे. पिंपळावरील

बांदें रेवती नक्षत्रीं रोगांचा नाश करणारें आहे. निर्गुंडीवरील बांदें भ-रणी नक्षत्रीं काढून दुधाबरोबर प्यालें असतां तत्काल बुद्धि देणारें आहे. सौम्याकीं बांदें सर्व जनांना मोहणारें आहे. पूर्वाषाढा नक्षत्रीं रुदंतीच्या मुळाचें चूर्ण, वावडिंग, बचनाग, टाकणखार, तगर, पिंपळी यांच्या लेहाने द्रावण होतें. पालेयकल्प.—पालेयाचीं पानें व फळें एरंडासारखींच असतात. सर्व रोगांचा नाश करणारा असा त्याचा कल्प मीं सांगतों. पालेयाच्या पानांचा रस घेऊन त्यांत पारा व अभ्रक यांचा एकरात्र खल करावा. ह्मणजे तत्काळ त्याची पिंडी होते. नंतर भात्यानें फुंकून ती तापविली असतां पाऱ्याचें बंधन होतें. पालेयाचा कंद आणून त्याचे तुकडे करून ह्मशीच्या दुधाबरोबर एक प्रहर भिजवावे. व नंतर सांवलींत वाळवावे. त्यांपैकीं रोज एक तोळा याप्रमाणें भक्षण केलें असतां क्षुधा व तृषा यांची पीडा होत नहीं. हा सिद्ध योग पूर्वी नागार्जुनानें सांगितला आहे. हें औषध घेतानां "ॐ नमो भगवते अमृतार्णव मध्य संस्थिताय मम शरीरेअमृतं कुरुस्वाहा", असा मंत्र ह्मणावा. पंचांगनिंब कल्क—पुष्य नक्षत्रीं व निंबाला फळें येतात त्यावेळीं निंबाचीं फळें, पानें, मुळें, त्वचा घेऊन, सांवलींत वाळवून चूर्ण करावें, व खैराच्या काढ्यानें भावना द्याव्या. नंतर चित्रक, वावडिंगें, व्याधिमात्रक, बिब्बा, हरीतकी, आंवळकाठी, गाईचें दूध, कासविंद्याचें बी, पिंपिळी, मिरीं, हळद, दारुहळद, लोहचूर्ण, हीं समभाग एकत्र करून त्याच्या चूर्णाला माक्याच्या रसाची भावना द्यावी. वरील निंबाचें चूर्ण व हें चूर्ण समभाग घेऊन त्यापैकीं एक तोळा चूर्ण दुधाबरोबर मिळवून प्यावें. किंवा हें चूर्ण शुभ दिवशीं व शुद्ध कोठा असतां पाण्याबरोबर प्यावें. तें प्यालें असतां तत्क्षणीं जीर्ण होतें. नंतर यथेच्छ भोजन करावें. दोन तीन महिने याचें सेवन केलें असतां अठरा प्रकारचीं कुष्ठें, वात, गुल्म, पित्त, या रोगांचा नाश होतो. सर्व मेहांचा नाश होतो. व अपमृत्यूनें रहित असा पांचशें वर्षें

जगतो. हें पंचनिंब रसायन तत्काळ प्रतीति देणारें आहे. तृणज्योति-कल्प—ही वनस्पती रात्रीं प्रज्वलित दिसते व तृणा सारखी असते. १ हिचें मूळ घेऊन तें दुधामध्यें ठेवलें असतां तत्काळ दुधाचा वर्ण लाल होतो. तें दूध सात दिवस प्यालें असतां अंगाला सुरकुत्या पडणें व केश पिकणें ह्या विकारांपासून मुक्त होतो. हें सेवन करतांना दुधाबरोबर नियमित आहार सेवन करावा. खारट व आंबट पदार्थ वर्ज करावे. असें केलें असतां तो सोळा वर्षांच्या तरुणासारखा दिसून एक हजार वर्षें जगतो, २ तृणज्योती चें मूळ घेऊन त्याच्या समभाग पारा व गंधक घ्यावा, व एकत्र करून माहाळुंगाच्या रसाबरोबर खलून करावें, नंतर त्याचा लेप तांब्याच्या पत्र्यास करून तीन पुटें दिलें असतां तांब्याचा वर्ण सुवर्णासारखा होतो. ३ तृणज्योतीच्या मुळांना म्हशीच्या लोण्याचा लेप करावा. कापिलेच्या तुपामध्यें हीं मुळें ठेऊन शिवालयांत माणसाच्या नरोटीमध्यें ठेऊन त्याचें काजळ वद्य-पक्षातील अष्टमी व चतुर्दशीला धरावें. नंतर साधकानें शुचिर्भूत होऊन यथाविधि पूजन करून नंतर त्या काजळाचें अंजन केलें असतां तो अदृश्य होतो. श्वेतार्ककल्प—पुष्यार्क असतांना पांढऱ्या रुईचें मूळ काढलें असतां तें सर्व सिद्धि देणारें होतें. १ पांढऱ्या रुईच्या पंचांगाचें चूर्ण करून तें तूप व मध यांचे बरोबर भक्षण करावें. जीर्ण झाल्यावर साठ्यासाळीचा भात दुधाबरोबर खावा. तेल व आंबट वर्ज करावें. याप्रमाणें एक महिना सेवन केलें असतां वलीपलित रोगानें रहित असा होउन मोठें बल व वीर्य प्राप्त होतें. २ पांढरी रुई व गोरोचन यांचा तिलक डाव्या हाताच्या करांगुलीनें कपाळावर केला असतां क्षणांत त्रैलोक्याचा क्षोभ करतां येतो, व तो तिलक पहातांच शत्रु बलहीन होतात. ३ पांढऱ्या रुईचें पंचांग घेउन सांवलींत वाळवून त्याचें चूर्ण करावें. त्यापैकीं एक तोळा चूर्ण, तूप व मधाबरोबर याप्रमाणें एकवीस दिवस केलें असतां धारणाशक्ति व धैर्य वाढतें. एक

महिन्यानें सर्व रोगांनीं रहित होतो. दोन महिने सेवन केलें असतां सर्व रोगांनीं रहित होऊन तरुण हत्ती सारखें बल प्राप्त होतें, व सूर्यासारखी कांति होते. व तो सोळा वर्षांच्या तरुणासारखा होऊन हजार वर्षें जगतो. सहा महिन्यांच्या सेवनानें तो अमर होतो. ह्या कल्पाचें सेवन करीत असतां दुग्धाहार करावा. वारा, ऊन, हीं वर्ज करावीं. तिखट, आंबट व तेलकट तसेंच तुरट व खारट पदार्थ वर्ज करावेत. याप्रमाणें राहिलें असतां सर्व सिद्धी प्राप्त होते. शुंठीकल्प-१ चांगली पिठूळ सुंठ घेऊन तिचें वस्त्रगाळ चूर्ण करावें, व गूळ, मध, गाईचें तूप, यांत तें मर्दन करावें; नंतर तुपानें रावळलेल्या भांड्यांत तें ठेवून त्याचें तोंड बंद करून धान्याच्या राशींत पुरून ठेवावें. एक महिन्या-नंतर तें काढून रोज एक तोळाप्रमाणें सात दिवस सेवन केलें असतां देहशुद्धि होते व सर्व रोगांचा नाश होतो. सहा महिने सेवन केलें असतां तो मनुष्य ३०० वर्षें वांचतो व बृहस्पतीप्रमाणें बुद्धिवान् होऊन सर्व शास्त्रांत निष्णात होतो. नागार्जुनानें सांगितलेल्या या कल्पाला अमृतकल्प असें ह्मणतात. पाठाकल्प-पहाडमूळ तोंडांत धारण केलें असतां खड्गधारी सैन्याचें निवारण होतें. तूपाबरोबर त्याचें सेवन केलें असतां सर्पाच्या विषाचा नाश होतो. कमरेस, किंवा शेंडीला बांधलें असतां विद्युत्पात बाधा होत नाहीं. ह्याच्या योगानें सर्वांशीं प्रियत्व प्राप्त होतें. मंत्र " ॐ नमो माहेश्वरी सिद्धेश्वरी चेचः हुंफट स्वाहा." पहाडमूळ दुधाच्या भांड्याच्या गळ्यांत बांधलें असतां लागलेंच दुधाचें दहीं होतें. पुष्य नक्षत्रीं पाहाडमूळ आणून ठेवावें; तें मुखांत धारण केलें असतां (...) शस्त्रास्त्रांची पीडा होत नाहीं. भृंग-राजकल्प भृंगराजाचे (गोरखमुंडी)- पांढरा, तांबडा व हिरवा असे तीन प्रकार आहेत. शुक्लपक्षांत पुष्य नक्षत्रीं सूर्य असतां मूळ व पल्लव यांसहित भृंगराज आणून सावलींत वाळवून चूर्ण करावें व शुभ दिवशीं शुभ नक्षत्रीं तें तुपाबरोबर सेवन करावें व जितेंद्रिय राहून तें जीर्ण झाल्यावर दुधभात

... सहा महिने याचें सेवन केलें असतां वलीपलिताचा नाश
होतो. तूप व मधाबरोबर सेवन केलें असतां, सर्व रोगांनी रहित होतो.
...बरोबर दिलें असतां पलिताचा लवकर नाश होतो. वातावर
... व पाणी याबरोबर द्यावें. जलोदरावर ताकाशीं द्यावें; दह्यांबरोबर
गुल्म... द्यावें. तूप व मध यांबरोबर दिल्यानें कुष्ठ व सर्व रोगांचा नाश
होतो. श्रीशंकरानें सांगितलेल्या ह्या मंत्रानें मूकदंबवृक्ष मंत्रित करून
... मंत्र " ॐ अमृतोद्भवाय अमृतं ये कुरु ठठः "। धात्रीकल्प. १
आंवळे व तीळ समभाग घेऊन चूर्ण करावें व तूप मधाबरोबर तें एक
...र सेवन करावें. या योगानें सरस्वतीची सिद्धि प्राप्त होऊन
... मनुष्यालाही तारुण्य प्राप्त होतें. २ आंवळे व पळसपापडी
... समभाग चूर्ण करून अग्निबल पाहून निजते वेळीं खावें.
...र ऋतूमध्यें आंवळे व त्याच्या समभाग अश्वगंध व तिळ यांचें
चूर्ण घेऊन एकत्र करून तूप—मधाबरोबर एक महिनापर्यंत सेवन केलें
असतां, वृद्धालाही तारुण्य प्राप्त होतें. १ कोष्ठाचें चूर्ण रोज एक तो-
ळाभर तूप व मधाबरोबर एक वर्षपर्यंत सेवन केलें असतां दिव्य देह
होतो. १ बाळहरडे, वेखंड, कुष्ठ, पिंपळी, सुंठ, वडाची साल किंवा
...ले, ब्राह्मी, सांखवेल, यांचें समभाग चूर्ण घेऊन तुपाबरोबर एक तो-
ळाभर सेवन करावें, म्हणजे वलीपलितरहित होतो. सात दिवस
सेवन केलें असतां बुद्धिवान् होतो. चवदा दिवसांनीं वेदवेत्ता होतो व
एकवीस दिवसांनीं कवि होतो. गंधककल्प.—ईश्वर म्हणाले, हे देवी,
... रीतीनें गंधकाचे पुष्कळ योग होतात ते योग सांगतों. हे देवी
देवदानव क्षीरसागराचें मंथन करीत असतां दिव्य सारभूत महाशक्तिवान्
असें अमृत उत्पन्न झालें. त्याच्या गंधानें सर्व देवता मोहित झाल्या.
त्याला गंधक असें नांव प्रख्यात असून तो जरा व दारिद्र्य याचा
नाश करतो. हे प्रिये, गंधक पिंवळा, पांढरा, काळा व लाल असा चार

प्रकारचा आहे, व यांचा अनुक्रमें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असा वर्ण आहे. रोग्याला वमनविरेचन देऊन नंतर शुभ मुहूर्त नक्षत्रयुक्त दिवशीं परमेशपूजा करून, खालीं सांगितल्लेया प्रयोगानें या गंधकरसायनाचें सेवन करावें. पथ्यकारक अन्न, साठ्यासाळी, गहूं, मुळे, तित्तिर पक्ष्याचें मांस, बकऱ्याचें मांस, काळे मूग, तूप, खडीसाखर, दूध, ताक हें सेवन करावें. अपथ्यआहार, तिखट, कडू, तुरट पदार्थ, तेल, कांजी, राई, स्त्रीसेवन, प्रवास, वाईट वारे, हीं वर्ज करावीं. तसेंच हरीक, व कुळीथ यांचें सेवन करूं नये. पथ्यभोजन करावें. खार व अम्लविपाकी अन्न व द्विदल धान्यें वर्ज करावीं. नंतर खालील मंत्रानें मंत्रित करून गंधक भक्षण करावा. "ॐ नमो भैरवाय अमृतसिद्धाय अमृतसाध्याय जातवेदनंदिभैदेण अमृतत्वं कुरुष्वमां स्वाहा ॥ वायुवेगिनी सिद्धीं कुरु कुरु स्वाहा." गंधक त्रिफळाचूर्ण, माका, हीं समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करावें. तें एक वर्ष सेवन केलें असतां चंद्र तारे आहेत तोंपर्यंत तो जगतो. तीन भाग पारा व चार भाग गंधक घेऊन दारुका यंत्रानें त्याचें भस्म करावें. एक वर्ष सेवन केल्यानें तो माझ्यासारखा पराक्रमी होतो. त्याच्या मलमूत्रानें तांब्याचें सोनें होतें. २ एक पल गंधक रोज सेवन करावा. गंधक व त्रिफळा एकत्र करून तूप व मधाबरोबर सेवन केलें असतां एक महिन्यानें सर्व महारोगांचा नाश होतो. ३ पारा व गंधक यांचा निर्गुडीच्या रसांत खल करावा. त्याच्या सेवनानें अठरा प्रकारचीं कुष्ठें, विष व जरा यांचा नाश होतो. ४ पारा व गंधक सुगंधि रसामध्यें मर्दन करून तांब्याच्या पत्र्यांना लेप केला असतां तीन पुटांनीं तांब्याचें सोनें होतें. (....) गंधकाचें पुनर्नव्याबरोबर सेवन केलें असतां तिन्ही प्रकारच्या विषांचा नाश होतो. आंवळ्याच्या रसाबरोबर घेतला असतां अजीर्णाचा नाश होतो. गुळाबरोबर प्रमेहाचा नाश करतो. पाण्याबरोबर सर्व व्याधींचा नाश करतो. गंधकाचें चूर्ण पांच पळें घेऊन तिप्पट माक्याच्या रसांत घालून वाळवावा. तें चूर्ण व बाळ-

हरड्या[illegible] चूर्ण हें तूप व मध यांबरोबर दोन महिने सेवन केलें असतां वृद्ध मनुष्यही तरुण होतो. ज्योतिष्मतीकल्प कैलासशिखरावर सर्व [illegible] श्रेष्ठ असे श्रीशंकर बसले असतां देवी पार्वती परम भक्तीनें त्यांला प्रणाम करून ह्मणाली, हे भगवन्, सर्व मनुष्यें घोर अशा पातकांनीं क्लेश पावत आहेत. त्यांच्या हिताकरितां त्यांना सुखावह होईल व ज्या [illegible] हे देवेश, सर्व मनुष्यांना आनंद होईल, त्यांना सिद्धि प्राप्त [illegible] ते परम गतीला जातील असा उपाय सांगा. देवीनें असें [illegible] असतां, श्रीशंकर ह्मणाले हे महाभाग्यवान देवी, लोकांना विस्म-[illegible] व सर्व रसायनांत अत्युत्तम असा विख्यात जो ज्योतिष्मती कल्प [illegible] ऐक. चांगल्या दिवशीं, शुभ योगीं व शुभ नक्षत्रीं (माळकांगो-[illegible] कुंकुमाक्षता, अर्घ्यपाद्य व रक्ततंदुल, रक्तचंदन, तांबडीं फुलें यांनीं इष्ट देवतेचें पूजन करावें; व इष्ट देवतांचा मंत्र ह्मणून यथाविधि अर्घ्यपाद्य, [illegible] करून नंतर उत्तराभिमुख होऊन त्या ज्योतिष्मतीला सुगंधि [illegible] व केशराचा लेप करावा, व तांबूल सेवन करून आनंदित स्वस्थ चि-[illegible] योग्य संस्कारांनीं त्या औषधीची पूजा करून तिच्या बिया [illegible] उन्हांत सुकवाव्या. नंतर त्याचें चूर्ण करून तेल काढावें; [illegible] त्यांत दूध व मध घालून पाक करावा व तेल शेष राहिल्यावर [illegible] जायफळ, अंकोल, कुष्ठ हीं समभाग चूर्ण करून त्यापैकीं एक [illegible] चूर्ण करून त्या तेलांत घालून स्निग्ध भांड्यांत ठेवावें. व [illegible] तोंडावर मुद्रा करून तें भांडें धान्यराशींत पुरून ठेवावें. [illegible] एकवीस, तीस, सत्तर, नव्वद किंवा शंभर किंवा त्या-[illegible] अधिक दिवसांनीं काढून शुभ दिवशीं, शुभ मुहूर्तावर, तारा [illegible] चंद्रबल असतां आन्हिक कर्मे करून व शुचिर्भूत होऊन [illegible] तें प्यावें. त्याच्या योगानें पाहिल्यानें बेशुद्धी येत जाते; नंतर [illegible] शुद्धीवर येतो. नंतर त्याला मध घातलेलें दूध प्यावयास द्यावें. [illegible] र्ण झाल्यावर साळ्यासाळीचा भात दुधाबरोबर खावा. या

ामाणें रोज करावें. व [illegible]य आहार सेवन करावा. त्या योगानें सूर्या-
ारखा कांतिमान् दिव्य दे[illegible]. अश्रुत अशीं शास्त्रें तो जाणतो
। गरुडाप्रमाणें लोकांमध्यें दिवसास तारे पहातो. निजला असतांही
ाब्द ऐकतो. अष्टादश कुष्ठांचा तसाच सर्व रोगाचा नाश होतो. हें
फल, एक महिना सेवन केलें असतां मिळतें. दुसऱ्या तिसऱ्या इत्यादि
मासामध्यें जीं फळें मिळतात, तीं दुरात्मे त्यांना दुर्लभ अशीं फळें
तुला सांगतों ऐक. तीन महिने यथाविधि सेवन केलें असतां तो मनुष्य
यक्ष, राक्षस व गंधर्व यांना पूज्य होतो. महान् घोर अशा पापमार्गानें
जाणारे ह्मणून जे प्रसिद्ध आहेत ते सर्व याच्या सेवनान परम गतीला
जातात. चार महिन्याच्या सेवनानें जें फल होतें तें ऐक. देव, यक्ष,
किन्नर, नाग, सर्प (...) चवथ्या महिन्याचें सेवनाचें काय फल तें
ऐक. जो पथ्यकारक भोजन करून औषधाचें सेवन करतो तो पुण्य
श्लोकांत श्रेष्ठ होऊन सर्व-ऐश्वर्य-संपन्न होतो. व स्वर्ग लोकांत तो
ब्रह्मदिनपर्यंत रहातो. त्याच्या मलमूत्राचा तांब्याच्या पत्र्यांस
लेप करून पुट केले असतां त्याचें सोनें होतें. व तो महासिद्ध
असा दिव्यदेही होऊन व शंकरासारखा महावीर्यवान् होऊन
सर्व जगामध्यें संचार करतो. सात महिन्याचे सेवनानें जितेंद्रिय, जितक्रोध,
सर्व प्राण्यांच्या हितकरितां रत, व विष्णूचे जोंपर्यंत दिवस आहेत तोंपर्यंत तो
जगतो. धर्म-अधर्मानें तो लिप्त न होतां देवाप्रमाणें रहातो. आठ महिन्यांनीं
तो दिव्यस्वरूप मोठा तेजस्वी, दिव्यरूप धारण करणारा होऊन निर्वा-
णपदाला पावतो. हें रसायन परम दिव्य असून गोपनीय आहे. नऊ म-
हिन्यांच्या प्रयोगानें तो इच्छारूप धारण करणारा, मोठा धैर्यवान्,
चिंतामणिसारखा, इंद्र, वायु, चंद्र, ब्रह्मा, विष्णु, रुद्र, यांपैकीं पाहिजे तें
रूप धारण करणारा होतो. ज्योतिष्मतीचें पंचांग तूपमधाबरोबर सेवन
केलें असतां किंवा त्रिफला, गोमूत्र, हळद, दारुहळद, वावडिंग, चित्रक,
ांवची, सुरस यांनींयुक्त असें घृत सिद्ध करून त्याच्या सेवनानें कुष्ठा-

...चा नाश होतो. व मुखरोगांचा नाश होतो. ... ( ... ) कल्प. १ देवडांगरीचा रस व त्याच्या दुप्पट आवळ्यांचा रस घेऊन लोखंडाच्या भांड्यांत ...वाली आंवळीच्या सुक्या काष्ठांचा मंदाग्नि देऊन पचन करावा. ...नंतर त्याचें नस्य करून दुधाचा आहार करावा. त्यायोगें अपस्मार, क्षय, कुष्ठ व वात यांचा तत्काळ नाश होतो. सात किंवा दाहा दिवसांच्या सेवनानें प्रेत, राक्षस व भुतें यांची बाधा होत नाहीं. देवडांगरीचा रस, मध, पारा यांचें नस्य केलें असतां वंध्येला अपत्यप्राप्ति होते. ३ देवडांगरीचा रस, मध, तूप, आंवळ्याचा रस ( ... ) ह्याच्या सेवनानें ... बुद्धिवान् व वेदवेत्ता होतो. ४ देवडांगरीचा रस, तूप व मध यांबरोबर एक अहोरात्र सेवन केलें असतां ( ... ) ५ पानांसह देवडांगरी घेऊन तिचें पीठ करून गोळी करावी व सांवलींत वाळवावी. व श्रीशंकराला नमन करून रोज प्रातःकाळीं भक्षण करावी. त्या योगानें ...गुल्म व इतर दुसरे रोग यांचा नाश होतो. ६ देवडांगरीच्या ...ंगाचें बारीक चूर्ण करून तुपाबरोबर सात दिवस प्यावें. त्या योगानें ... प्राणी वश होतात, व स्त्रियांना तो प्रिय होतो. ७ देवडांगरीचा ... घेऊन त्यांत पांढरी मोहरी व रिंगणी मिळवून गोळ्या कराव्या. व ...र्ण पत्रांत वेष्टन करून तें शेंडीला बांधावें. त्या योगानें राजे, स्त्रिया, पुरुष, हे वश होतात. त्या योगें सर्व रोग व राजभय यांचा नाश होतो. ...योगें सर्व रसाचें द्रवण होतें. पाऱ्याची शुद्धि होते. ( ... ) गुंजा ...र गोळ्या कराव्या व त्या पैकीं एकेक भक्षण करावी. जीर्ण झाल्यावर भोजन करावें. आंबट व खारट वर्ज करावें. दुध व साळीचा भात खावा. याप्रमाणें एक महिना सेवन केलें असतां अमरत्व प्राप्त होतें व तो प्रतिरुद्रासारखाच होतो. शुक्लपक्षीं पौर्णिमेला पुष्य योग व शुभ दिवस असतां तिथिपूर्वक बलिदान करून देवडांगरीचें पंचांग आणावें. त्याचा रस समभाग तूप व मधाबरोबर घ्यावा या प्रमाणें सात दिवस केलें असतां तो मनुष्य बुद्धिवान् होतो. एक महिन्याच्या

योगानें अमर वर्ष ... शुद्ध अष्टमी व चतुर्दशीला आठ जार मंत्र होम करावा व जितेंद्रिय राहुन देवदालीला नमस्कार करून प्रदक्षिणा करून उपटावी. "ॐ नमो भगवते ईश्वराय सोमसं वाय देवदालीं नमः ... ॐ महेशाय ... ॐ भूताधिपतये ... ॐ अमृत ... ॐ मांरक्ष स्वाहाः क० देवदाली हाभूताधिपतये न० महा बलाय स्वाहा अत्रं" ॥ अथ भक्षण मंत्रः ॐ व प्रयत्नेन निर्विघ्नं जायते. ॐ नमः स्वाहा. सातदां जप करून शुचि-र्भूत होऊन पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे मुख करून देवदाली उपटावी व कुटून त्याचा रस काढावा. नंतर तो घेऊन दुग्धाहार करावा. शुभवारीं व शुभ दिनीं वमन विरेचन देऊन नंतर याचें सेवन करावं. याप्रमाणें एक महिना सेवन केलें असतां जमिनींतील द्रव्य पहातो. व तेजस्वी होऊन हजार वर्षें वांचतो. तीन महिन्यांनीं तो सूर्यासारखा तेजस्वी होतो. पांच महिन्या-च्या सेवनानें श्रीशंकराला पहातो. तसेंच विष्णु, ब्रह्मदेव वगैरे दिव्य गामी जे त्यांना पहातो. व एका निमिषमात्रांत तो हजारों योजनें जातो. श्रीशंकर ह्मणतात. हे पार्वती, मी दुसरा एक प्रयोग तुला सांगतों. देवदालीच्या समभाग पांढरी रिंगणी घेऊन त्यांचे सेवन (...) बरोबर स्त्रीनें घेतलें असतां पुत्रप्राप्ती होते. देवडांगरीचा रस, तूप, मध, क्षीर. वृक्षाचा चीक, हीं एकत्र जो पितो तो अनेक स्त्रियांबरोबर रममाण होतो. देवडांगरीचा रस, तूप, मध, आंवळ्याचा रस, याबरोबर घ्यालें असतां तो बुद्धिवान् व वेदवेत्ता होतो. देवदालीच्या मुळांचें सूक्ष्म चूर्ण करावें. व त्यापैकीं एक तोळा चूर्ण ऊन पाण्याबरोबर सेवन करावें. त्या योगें गुल्म, उदर, प्लीहा, कुष्ठ, भगंदर, कामलादि महा-रोगांचा नाश होतो, यांत संशय नाहीं. देवदालीचें चूर्ण व असकंद हीं एकत्र करून तुपाबरोबर भक्षण केलें असतां तें उत्तम वशीकरण आहे. तो ज्या स्त्रीची इच्छा करील तिचा पति होतो. पांढरी मोहरी, देवदाली, पांढरी रिंगणी, हीं एकत्र करून त्याचें सेवन केलें असतां अनेक स्त्रिया

ण्यास समर्थ होतो यांत संशय नाही. बिजोरा रस आपल्या हातानें काढून तो ज्याला देईल तो तत्काल वश होतो. देवदालीचा रस व काळ्या गाईचें दूध एकत्र करावें. त्या योगें पाण्याचें बंधन होतें. कर्पूरासारखें होतें. देवदालीचा रस कतकीचा व रक्त याचें डोळ्यांत अंजन करावें त्यायोगें तो सर्व भूतें पहातो. देवदालीचा रस कपिल गाईच्या दुधाबरोबर प्याला असतां वंध्येलाही पुत्रप्राप्ति होते. हे जे प्रयोग सांगितले, ते कोणास सांगूं नयेत, गुप्त ठेवावे. अशी परमेश्वराची आज्ञा आहे. एरंडकल्प.–श्रीशंकर पार्वतीला ह्मणतात. हे कमलपत्राक्षि मी अत्यंत उत्तम असा एरंडकल्प सांगतों. एरंड रक्त, पीत, इत्यादि चार रंगाचा आहे. त्याचें तेल रविवारीं विधिपूर्वक घ्यावें. शुद्ध पारा व गंधक तांबड्या एरंडाच्या तेलांत मिळवून तें लोखंडाच्या भांड्यांत एक प्रहर मर्दन करावें. (....) त्या तेलानें शिशाच्या (....) तें तेल मध व गंधक एकत्र करून तें जमिनींत एक महिना ठेऊन नंतर काढावें. व रोज सकाळीं चार निष्कप्रमाणें घ्यावें. एक महिन्याच्या प्रयोगानें बालसूर्यासारखी कांति होते. कोठा शुद्ध करून गुरूच्या वचनानें तें सेवन करावें. दुग्धाहार करावा. सत्यभाषी व जितेन्द्रिय रहावें. दोन महिन्याच्या प्रयोगानें तो मनुष्य हजार वर्षें वांचतो. तीन महिन्याच्या सेवनानें चंद्रतारा आहेत तोंपर्यंत वांचतो. सहा महिन्याच्या प्रयोगानें त्याला ब्रह्मदेवाचें आयुष्य प्राप्त होतें. एक वर्षाच्या प्रयोगानें तो विष्णुपूज्य होतो. बारा वर्षांच्या सेवनानें तो जीवन्मुक्त होतो. सोळा एरंडाचें तेल व काळ्या गाईचें दूध एकत्र करून कोष्टशुद्धि झाल्यावर घेतलें असतां तो देवानांही पहातो. कपिला गाईचें दूध, मध व तेल एकत्र करून त्यांत पारा खरला असतां बद्ध होतो. (—) त्या बंग भक्षणानें तो आकाशगामी होतो. अंजन केलें असतां सप्तपातालें व भूमीचा सूर्य यातें पहातो. सर्वांजन नांवाचा हा सिद्धयोग आहे. या योगानें देवदैत्यांना अदृश्य असा होऊन विष्णुलोकांत संचार

करतो: पांढऱ्या एरंडाचीं मुळें पुष्यार्कीं असतां घ्यावीं व तीं कापराबरोबर पांढऱ्या एरंडयांच तेलांतच वाटावीं. त्याचें अंजन नेत्रांत केलें असतां सतपातालाचें दर्शन होतें. सिद्धयोगानें सांगितलेल्या या अंजनाला सिद्धांजन ह्मणतात. हें सिद्धी देणारें आहे. ( .... ) एरंड्या ( .... ) मनशीळ, शुद्ध पारा, कुचले फळांचा द्रव ही एकत्र करून अंध मुशीमध्यें ठेवावीं. व सांबर व खैर यांच्या निखाऱ्यांवर त्याला आंच द्यावी. त्या योगें पारा बद्ध होतो. ( .... ) पांढऱ्या गाईच्या दुधाबरोबर एक निष्कप्रमाण गाईचें तूप मिळवून हें मूळ घ्यावें. व दुग्धाहार करून जितेन्द्रिय रहावें. याप्रमाणें एक महिना केलें असतां दिवसा तारे पाहतो. दोन महिन्यांनीं चंद्रासारखा निर्मळ होतो. तीन महिन्यांच्या प्रयोगानें खेचरत्व प्राप्त होतें. सहा महिन्यांनीं तो पाताळ पहातो. एक वर्षाच्या प्रयोगानें तो ब्रह्मदेवाचे आठ दिवस जगतो. पिवळ्या एरंडाचें मूळ पुष्यार्कीं आणून सावलींत वाळवावें. व दुधाबरोबर वाटावें. व त्यांत सुंठ, मिरीं, पिंपळी, त्रिफळा, खडीसाखर मध, तूप घालून स्निग्ध भांड्यांत घालून जमिनींत पुरावें. एक महिन्यानें काढून त्यापैकीं रोज एकनिष्कप्रमाण खात जावें. ( .... ) आनंदित मानसानें रहावें. याप्रमाणें एक महिन्याच्या प्रयोगानें तो वलिपलित यानें वर्जित होतो. तीन महिन्याचे प्रयोगानें चंद्र व नक्षत्रें आहेत तोंपर्यंत जगतो. एक वर्षाच्या प्रयोगानें देवांसह रममाण होतो.

मुसळीकल्प.--हे देवेश्वरी, मी तुला उत्तम असा मुसळीकल्प सांगतों सुवर्णासारखीं जिला पिवळीं फुलें येतात, खजुरीच्या झाडाप्रमाणें जिला पानें आहेत, जी अतिरम्य दिसते, व जी फार पांढरी, अशी मुसळी त्या मुसळीचें मूळ घेऊन सावलींत वाळवून चूर्ण करावें. व एक तोळा चूर्ण रोज सकाळीं मूत्र व मधाबरोबर घ्यावें. जीर्ण झाल्यावर दूधभात जेवावा. अपथ्य अन्न वर्ज करावें. याप्रमाणें सहा महिने केलें असतां वृद्धालाही तारुण्य व बुद्धि प्राप्त होते. मुसळीचें चूर्ण दुधाबरोबर प्यालें

ंभर वर्षेंपर्यंत शंभर स्त्रियांचा उपभोग घेण्याचें सामर्थ्य येतें.

औषधी-कल्पलता समाप्ता.

## उपसंहार.

ीय औषधीविद्येचा पुनः प्रसार होण्यास निरनिराळ्या प्रसारांत ेचा शोध हा एक महत्वाचा भाग आहे. त्यासंबंधानेंच हें पु- आहे. औषधांसंबंधाचे जुने ग्रंथ, वर्णनांसहित मिळत नसल्यानें अडचण पडते. तथापि मिळणाऱ्या साधनांचा उपयोग करून ही एकप्रकारचा फायदा आहे. सारग्राही होऊन हा प्रयत्न हिजे. औषधीकल्पलता आह्मांस मिळाली ती फार अशुद्ध प्रत नसल्यानें शोधन करण्यास मोठी अडचण अशी स्थिति —तेवढी व तशीच, होईल तितका बेतानें सुधारून आह्मीं नवैद्यांत छापली होती. पुढें कांहीं शोध लागला. पण म्हण- ा उपयोग झाला नाहीं. तथापि तिचें बरें—वाईट भाषांतर कावें या हेतूनें या भागांत तें, मूळासह दिलें आहे.

ील प्रयोग कित्येक चमत्कारिक आहेत. त्यांचा उपयोग कर- नाहीं. रोगविषयक जेवढा चिकित्सेचा भाग आहे तेवढ्या- देऊन वागल्यास इचा पुष्कळ उपयोग आहे. वशीकरण वगैरे लक्ष्य देण्याचें कारण नाहीं. त्यांतील रहस्य काय आहे तें ार्मिक विद्वानांशिवाय इतरांस कळणें दुस्साध्य आहे आह्मीं इच्या ्रती मिळविण्याचा प्रयत्न करीत आहों, त्या मिळूनही शुद्ध ल्यास, तिसऱ्या आवृत्तीच्या वेळीं आह्मी या ग्रंथावर विशेष न शोधन करणार आहों. परमेश्वराची इच्छा असल्यास हा इष्ट ास जाईल. शुभं भवतु.